


नोंदणी क्र. एफ.१६०१४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

मे - जून - जुलै २००७

'उत्तर नव' भारत

विकासाची विविध प्रतिमाने



The Indian Jigsaw Puzzle






अनुक्रमणिका

# पुरुषप्रधान व्यवस्थेची ऐसी की तैसी आणि बाईमाणसाच्या रिलेची धामधूम

**वंदना लीला**

सगळं काही स्पष्ट आठवतंय. १९९९ साल होतं. नव्या २१ व्या शतकाची पहाट दिसू लागली होती. २० व्या शतकात माणसानं केलेल्या कमाईचं आणि २१ शतकातले अपेक्षित बदल, आधुनिक विचार स्वीकारण्याची गरज याचं मोजमाप पोटतिडीकीनं केलेल्या वेगवेगळ्या लेखनातून गाजत होतं.

माझ्या वयानं पन्नाशी गाठली होती. मोठ्या हौसेनं धावाधाव करून विणलेल्या संसाराच्या भरतकामात हरतऱ्हेचे रंग भरून झाले होते. अनेक प्रकारे ते सजवून मन त्यातूनही मुक्त होऊन पुढं धावत होतं. कुटुंबालाच केवळ आनंदाचं निधान मानून मन तृप्त (!) झालं होतं. सुखाच्या दुःखाच्या, त्यागाच्याही अनेकानेक छटा बघत होते. स्वत्त्वाचं थोडंबहुत भान (ते ही या वयात!) आलं होतं. संवेदनेची अनोखी धार बोलण्या वागण्यात, कामात विचारात लखलखत होती. (गमतीची गोष्ट ही की ती लखलख माझ्यात मावत नव्हती आणि इतरांना पेलवत, मानवत वगैरे नव्हती.) शिकण्याच्या निमित्तानं बरीच वर्ष घरापासून दूर राहिल्यामुळं सगळे निर्णय स्वतःच घ्यायच्या सवयीमुळं ऐन तरुण वयातही डोळसपणा आला होता. योग्य-अयोग्याचं भान होतं. सणवार, रीतीभातींच्या फालतू (फालतूच) संस्कारांपासून वाचले होते. त्यात कबीर, तुकाराम आणि एम०ए० ला घेतलेल्या हिंदी विषयानं भर घातली. त्यावेळी हे सगळं कसं उत्तम जुळून आलं बरं, याचं आज आश्चर्यही वाटतं. विचार, बोलणं आणि वागण्यातील एकवाक्यतेबाबतचा आग्रह यातून जगण्याचा कणा, मजबूत आणि ताठ झाला होता.

पुढं, नोकरीत आल्यावर कॉलेजातल्या मुलांना शिकवता शिकवता पुन्हा झालं हे की, 'आपणच आपले तपासनीस !' जगण्याची घडण पक्की झाली. आतबाहेर पारदर्शी राहण्याची सवय तर लागलीच, पण निमूटपणा गेला. धाडस आलं. एकटेपणा सोसण्याचं ही. आपणच शिकवलेल्या मूल्यांचं, तत्त्वज्ञानाचं हसं होताना बघून मन तडफडावं. आपल्या जागी आपण ठीक असूनही जबाबदार अध्यापक वर्गातूनही शिक्षणाची टवाळी केली जावी याचा त्रास होऊन चिडचिडलेपणा आणि मग एकटेपणा !

या सर्व समाजजीवनात दिसणाऱ्या चित्रात कुणी एका जातीधर्माचे अशी वर्गवारी नाही करता येणार. पण जागतिकीकरणाच्या रेट्यातून आलेल्या संधी साधूपणाच्या स्पर्धेत कुठेकुठे एखाद दुसऱ्या स्त्रियाही होत्याच. पण मूळ गोष्ट एकच. नातेवाईकांत, घरात, बाहेर समाजपुरुष नावाचं पात्र अखंड, सतत समोर येत होतं. शेकडो वर्षांची पोसलेली प्रवृत्तीच ती ! नात्यातला एकही पदर न सोडता माझा माग काढीत होता तो. आणि अंतर्बाह्य 'माणूस' म्हणून जगण्याचा लढा जणू संचारला होता माझ्यात.

आता लढा म्हणाल, तर माझे वडील सैन्यात होते. शत्रूशी लढण्यात ते आघाडीवर होते. पण वडील झाले तरी ते पुरुष होते. जीव गेला तरी समाजव्यवस्थेशी तडजोड करीत जगायला भाग पाडणारा पुरुष. त्यांच्याच सोयीची आणि अंगवळणी पडलेल्या व्यवस्थेशी त्यांना राग असण्याचं कारणच नव्हतं. हे बापलेकीच्या नात्यापलीकडे गेल्यानंतरच वास्तव मला कळालं. हे सगळं उमजणं काही सुखाचं नव्हतं. नात्यातल्या निर्मळतेला, आश्वासकतेला जाणारे तडे, नवीन नजर आणि समजही देऊन गेले. आणि मग सगळंच नव्यानं बघतो आहोत या भावनेतून तटस्थपणे बघण्या ऐकण्याचा अभ्यासही सुरु झाला. स्वतःकडेही अर्थात !

तर वडिलांचा युद्धभूमीतला शत्रूही पुरुषच. एकमेकाशी लढून वगैरे झाल्यावर जो जिंकला असेल त्यानं दुसऱ्याची 'भूमी' काबीज केली असेल. त्या नव्या भूमीवर 'स्वतःचे' नियम, रीत-रिवाज, संस्कृती रुजवली असेल. जो हरला असेल, तो स्वतःच्या असलेल्या भूमीत कायमच वरचढ असेल. लढवैय्या ! अर्थात, युद्धातील आक्रमणं आणि साम्राज्याची हाव, ही पुरुषप्रधान व्यवस्थेचाच विस्तारलेला परीघ आहे. त्यामुळं पराजित झाला तरी घर नावाची स्वतःच्या मालकीची सत्तासंस्था असतेच त्याची. हरल्यावरही आपल्या घरी तो नाकाम नसतो. सतत नंबर एक ! वरचढपणा हा त्याचा, पर्यायानं त्यानं घडवलेल्या समाजाचा स्वभावच.

अशा त्या समाजातली २१ व्या शतकातली मी, एक बाईमाणूस ! कोण, कुठली, नाव, गाव काहीच महत्त्वाचं नाही. एक बाई, थोडीबहुत जाग आलेली. आपल्या ताकतीचा, क्षमतांचा अंदाज आलेली. आपली आपल्याशी ओळख पटलेली.

माणूस ! जात-धर्म, स्त्री-पुरुष या पलीकडे जाऊन केवळ माणूसपण नावाची असलेली गोष्ट किती निरागस, सरळ, स्वाभाविक नाही का ! सूर्य उगवल्यावर सगळं स्वच्छ स्पष्ट दिसावं अगदी तसं. पण माणूसपणाचा न्याय मागताना इथं आयुष्य नावाची सुंदर आणि आनंद देणारी गोष्ट विद्रोहात, आक्रोश आकांतात बदलून जाते. इतिहासात घडलेल्या राजवटी, सत्तापालटाची तीच तीच होत असलेली आवर्तनं हा कशाची प्रतीकं आहेत!

विवाहसंस्थेवरील विश्वास आणि श्रद्धा उडून जावी असे या व्यवस्थेतील नातेसंबंध ! नवरा नावाचा जोडून (की बांधून ?) दिलेला पुरुष त्याच्या दुर्दैवानं मृत झाला तर तिचं जगणं कठीणच. व्यवस्थेची इच्छा म्हणून तेव्हा सतीप्रथेचं, केशवपनाचं हत्यार तिच्या विरोधात. पण ती त्यातूनही जगलीच. हत्यारं तरी किती तिच्या विरोधातली ! लग्न नावाचा सुगंधी सजावटीच्या वातावरणातला, मिष्ठान्न भोजन पंक्तींनी भरगच्च भरलेला, हास्य-विनोद आणि संगीत मैफिलींनी हलका फुलका वाटणारा, हा समारंभ म्हणजे 'शुगर कोटेड' हत्यारच ! धक्का बसेल कदाचित पण असते एकेकाची नजर किंवा अनुभव. काय करावं याचं ! तेच सारं दिसावं, शोषणाच्या छटा आणि वेगवेगळ्या युक्ती बघून मन खुरटून जावं. अशा कमी-अधिक फरकाच्या कथा घरोघरीच.

पण बाई बांधील होणे, मोठी रक्कम देऊन वर कायमची नोकरही. वंश चालवते. नाही चालवला तर दुसऱ्या बाईचा हक्क आहे ह्या कायद्यात. ती सुंदर हवी, कुणाच्याही ध्यानी येणार नाही अशी स्वतःच्या मनाला मुरड घालणारी असावी. आजच्या काळात तर पैसा, मुलं देऊन वर हरकाम्या आणि हरहुन्नरीही असावी (व्यवस्था सुधारलीये ना !) अशी अपेक्षा.

सतीप्रथा, केशवपन संपलं. नवाकाळ सुरु झाला. बाईवरच्या नियंत्रणासाठी नव शस्त्र परजलं व्यवस्थेनं. व्यवस्था चालवणारी ही प्रवृत्ती फार

(मुखपृष्ठ क्र० ३ वर)

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६० । अंक ८-९-१० । मे - जून - जुलै २००७
ज्येष्ठ - आषाढ - श्रावण शके १९२९
वार्षिक वर्गणी २०० रुपये.
या अंकाची किंमत रु. ६०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचं ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्य-निष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियत-कालिकाला अनुदान दिले असले तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच, असे नाही.






## अनुक्रमणिका



लेखक संपर्कासाठी अतिथी संपादकांशी संपर्क साधावा.

# अतिथी संपादकीय

देवदत्त दाभोलकर

मागील अंकात प्रकट केल्याप्रमाणे हा अंक 'लोकशाही समाजवाद' या विषयावर केंद्रित आहे. नवभारतचा ऑक्टोबर, नोव्हेंबर, डिसेंबर हा अंकही या विषयावरील चर्चेला आवाहन करणारा होता. या दोन्ही अंकावरील चर्चासत्र वाई येथे २७, २८ मे रोजी होईल. लोकशाही व समाजवाद या विषयांशी संबंधित अन्य काही घटनांचा विचारांचा समावेश येथे एकत्रित केल्यामुळे हा मे-जून-जुलै असा त्रैमासिक जोड अंक आहे.

जे० पी० नाईक जन्मशताब्दी ५ सप्टेंबर रोजी पूर्ण होते. 'नवभारत' चा यापुढील अंक (जोडअंक) त्यानिमित्त विशेषांक म्हणून प्रसिद्ध होईल व त्यातील विषयावर चर्चासत्र सहभागींच्या सोयीप्रमाणे सातारा, वाई वा पुणे येथे १ व २ सप्टेंबर रोजी (शनिवार-रविवार) होईल. आगामी काही कार्यक्रमांचीही आखणी व्हावी अशी अपेक्षा राहील. उपस्थित राहू इच्छिणाऱ्यांनी आधी संपर्क साधल्यास सोयीचे.



सप्टेंबरच्या अंकाबरोबर 'नवभारत'चे हीरक वर्ष पूर्ण होत आहे. 'न वसेत् वासरत्रयम्।' असा संन्यासी, अतिथी या विषयींचा संकेत आहे. मी फक्त 'संवत्सरत्रयम्' एवढाच फरक केला आहे. सुहृद् - समीक्षक - वाचक मानून घेतील ही आशा.

अनुक्रमणिका

# चर्चासत्रांविषयी

## 'उत्तर-नव' भारत
## विकासाची विविध प्रतिमाने

संयोजक : नवभारत मासिक, प्राज्ञपाठशाळा, वाई
अलदा निकेतन, सातारा (अलदा : अच्युत लक्ष्मण दाभोलकर, १८९३-१९५५)
(या खेरीज अन्य कोणा व्यक्तीचे, संघटनेचे उत्स्फूर्त सहकार्य आल्यास त्याचाही सामार स्वीकार करण्यात येईल.)

चर्चासत्रांविषयीची निवेदने व सूचना या आधीच्या अंकातून आलेल्या आहेत. यापुढील संदर्भात :

१. 'नवभारत'चा हा अंक 'लोकशाही समाजवाद' यावर आहे. त्याच्या आधारे व येतील त्या नव्या टिपणांच्या आधारे या विषयावर वाई येथे २७, २८ मे २००७ रोजी चर्चासत्र होईल.

२. सप्टेंबर २००७ च्या पहिल्या आठवड्यात सहभागी होऊ इच्छिणाऱ्यांच्या सर्वसाधारण सोयीच्या दिवशी जे. पी. नाईक जन्मशताब्दीच्या निमित्ताने 'उत्तर-नवभारतात भारतीय जनतेचे शिक्षण : नवे संदर्भ, समस्या व उत्तरे' या विषयावर सातारा, वाई वा पुणे येथे दोन दिवसांचे चर्चासत्र होईल. या चर्चासत्रासाठी प्रा. देवदत्त दाभोलकर यांच्याशी संपर्क साधावा.

३. 'समाजवादी शील आणि विश्वस्तवृत्ती' यावरील कृति-चर्चासत्र आधी योजिल्याप्रमाणे एस०एस० जोशी स्मृतिदिनी (१ एप्रिल २००७) साधना सभागृह, पुणे येथे संपन्न झाले. त्याचा वृत्तांत या अंकात अन्यत्र आहे. (पृ० ५७-५८)

४. डॉ० वसंत पेठे यांच्या 'गरीबीचे अर्थशास्त्र' यावरील चर्चासत्र १ व २ ऑक्टोबर रोजी सातारा येथे होईल.

कोणत्याही चर्चासत्रात सहभागी होऊ इच्छिणाऱ्यांनी आधी शंभर रुपयांची मनिऑर्डर सचिव, प्राज्ञपाठपाळा मंडळ यांच्याकडे केल्यास त्यांना चर्चासत्राविषयी टिपणे पाठविली जातील.

संपर्कासाठी पत्ते -

**प्रा. देवदत्त दाभोलकर**
**निवास :** शांतिनिकेतन
४३, गुरुकृपा हौ. सो.
शाहूनगर, सातारा ४१५००१
दूरध्वनी : (०२१६२) २२०३७८
E-mail : ndabholkar@rediffmail.com

**प्रा. यशवंत कळमकर**
**निवास :** २४१०-क, सोनगीरवाडी,
दूरध्वनी कॉलनी रस्ता, वाई ४१२८०३
दूरध्वनी : (०२१६७) २२२७०४
**कार्यालय :** सचिव, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई
दूरध्वनी : (०२१६७) २२०००६

## सर्वोदय

# सत्याग्रहाची जन्मशताब्दी

प्रा० चंद्रकांत पाटगावकर

जगाच्या इतिहासात अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठी निःशस्त्र जनतेच्या हातात अहिंसेच्या मार्गाने प्रतिकार करण्याचे नवीन साधन महात्मा गांधींनी उपलब्ध करून दिले. ते म्हणजे सत्याग्रह.

दक्षिण आफ्रिकेतील गोऱ्या सरकारने भारतीय लोकांविरुद्ध एक काळा कायदा पास केला होता. 'ब्लॉक ऑफ' पासड् बाय द व्हाईट गव्हर्नमेंट फॉर दि ब्लॅक पीपल!

दक्षिण आफ्रिकेतील मूळ नागरिकांवर जबरदस्ती करून ब्रिटिश व युरोपियन लोकांनी शेतमळे केले. त्यात काम करणे स्थानिक लोकांना तितकेसे जमत नव्हते. भारतावरील आपल्या साम्राज्यसत्तेचा वापर करून बिहार, तामिळनाडू वगैरे भागातील अनेक स्त्री-पुरुष शेतमजुरांना तिथल्या मळेवाल्यांकडे काम करायला पाठवले. प्रत्येकाला करार म्हणजे ॲग्रीमेंट करावे लागे की मी पाच किंवा दहा वर्षे तरी काम करीनच. ॲग्रीमेंट या शब्दाचा अपभ्रंश होऊन अशा मजुरांसाठी 'गिरमिटी' हा शब्द रूढ झाला. तसेच तिथे व्यापार करायला काही भारतीयांना सरकारने प्रोत्साहन दिले. पण सत्तेत व व्यापारात भारतीयांना कसलाही वाव मिळू नये या दृष्टीने तिथले गोरे सत्ताधारी भारतीयांवर अनेकविध जाचक बंधने घालत असत. अनेक वर्षे तो अन्याय निमूटपणे सहन केला. गांधीजी वकिलीच्या कामासाठी तेथे गेले. या अन्यायी कायद्यांविरुद्ध भारतीयांनी लढले पाहिजे असे गांधीजी म्हणू लागले. भारतीयांनाही ते पटू लागले.

दक्षिण अमेरिकेत व्यापारासाठी गेलेल्या भारतीयांमध्ये आणि गोऱ्या इंग्रज व्यापाऱ्यांमध्ये स्पर्धा होती. गोऱ्यांचे संरक्षण करण्यासाठी गोऱ्या सरकारने हा काळा कायदा पास केला.

हा जुलमी व अन्यायी कायदा मोडण्याचा निर्णय दक्षिण आफ्रिकेतील भारतीयांनी घेतला तो दिवस होता ११ सप्टेंबर १९०६. हाच शांततामय मार्गाने अन्यायाच्या प्रतिकाराचा म्हणजे सत्याग्रहाचा जन्मदिवस ठरला.

दक्षिण आफ्रिकेतील गोऱ्या सरकारच्या या काळ्या कायद्याची सर्वच कलमे काळी होती.

ट्रान्सवालमध्ये असलेल्या हिंदी लोकांनी आपली नावे नोंदणी ऑफिसमध्ये पुन्हा नोंदवून घ्यावीत आणि त्या अर्जाबरोबर आपला फोटोही लावावा. प्रत्येक भारतीयाला अशा तऱ्हेने एक परवाना दिला जाईल. याविरुद्ध पुष्कळ अर्जविनंत्या झाल्या; परंतु त्याचा उपयोग न होता अशा तऱ्हेचे नवीन परवाने घ्यायचे मान्य केले. म्हणजे आता सर्वांना नवीन परवाने घेणे आले. अतिशय शांतपणे व एकजुटीने असे हे काम गांधींच्या देखरेखीखाली उरकण्यात आले. आता तरी सरकार ठीक वागेल अशी कल्पना होती. परंतु सरकार एवढ्यांवर स्वस्थ बसले नाही. या नोंदणीला कायदेशीर पाठिंबा मिळावा म्हणून एशियाटिक बिल पास करून घ्यायचे, असे सरकारने ठरवले. ट्रान्सवाल सरकारच्या २२ ऑगस्ट, १९०६ च्या गॅझेटमध्ये हे बिल-ऑर्डिनन्स प्रसिद्ध झाले होते. ते गांधींच्या हातात आले आणि वाचता वाचता गांधींना धक्का बसला; कारण हे बिल म्हणजे हिंदी लोकांचा नाश अटळ होता. त्यामुळेच हा हिंदी लोकांच्या जीवनमरणाचा प्रश्न होता

या बिलाची कलमे गांधी वाचू लागले :

१. प्रत्येक भारतीयाने (स्त्री, पुरुष किंवा आठ वर्षावरील मूल), ज्यांना ट्रान्सवालमध्ये रहायचे असेल त्यांनी आपले नाव नोंदणी अधिकाऱ्याकडे नोंदवून त्याबद्दल एक प्रमाणपत्र नोंदणी अधिकाऱ्याकडून घ्यावे, नोंदणी करताना त्या माणसाने आपले जुने प्रमाणपत्र अधिकाऱ्याला द्यावे. आणि नोंदणीच्या अर्जाबरोबर आपले नाव, राहण्याची जागा, जात व वय लिहावे; पण त्याचबरोबर नोंदणी अधिकारी त्या व्यक्तीच्या अंगावरच्या विशेष खुणा (Marks) नोंदवून घेईल. जो कोणी हिंदी माणूस असा तऱ्हेने विशिष्ट तारखेपूर्वी नोंदणीबद्दलचे प्रमाणपत्र घेणार नाही, तो ट्रान्सवालमध्ये राहण्याचा आपला हक्क गमावून बसेल. जी व्यक्ती अर्ज करण्यास चुकेल त्या व्यक्तीला कायद्याने गुन्हेगार ठरविण्यात येऊन त्याबद्दल दंडाची किंवा तुरुंगाची शिक्षाही होऊ शकेल, एवढेच नव्हे तर कोर्टाला वाटल्यास त्या व्यक्तीला हद्दपार करता

अनुक्रमणिका








येईल.

२. पालकांनी आपल्या आठ वर्षावरील मुलांना ऑफिसमध्ये आणून त्यांची रीतसर नोंदणी करून घ्यावी, अशी नोदणी करून घेण्यास पालक जर चुकला तर त्याला कायद्याप्रमाणे शिक्षा केली जाईल.

३. अशा प्रकारचे प्रमाणपत्र व्यक्तीला सतत जवळ बाळगावे लागेल. व्यक्ती ऑफिसमध्ये असेल किंवा रस्त्याने चालत असेल किंवा वाहनातून प्रवास करीत असेल तरीही एखाद्या पोलिस-अधिकाऱ्याने प्रमाणपत्र मागितल्यास ते दाखविणे त्या व्यक्तीला भाग पडेल, तसे दाखविता न आल्यास तोही गुन्हा समजला जाईल.

४. अशा प्रकारच्या प्रमाणपत्रांची पाहणी करण्याकरिता एखादा पोलिस-अधिकारी खाजगी घरातसुद्धा प्रवेश करू शकेल.

५. सरकारी कार्यालयात भारतीय माणसाचे काम असेल किंवा तो कोर्टात गेला असेल, तर तेथेही त्याने प्रमाणपत्र दाखविल्यास त्याचे काम होईल.

गांधींच्या मते, अशा प्रकारचा स्वतंत्र नागरिकांच्या बाबतीत केलेला कायदा जगात कोठेही नसेल. द. आफ्रिकेतील बागा व शेतीत काम करण्यासाठी भारतातून कंत्राटी पद्धतीने नेण्यात आलेले कष्टकरी स्त्रीपुरुष तसेच लाखो रुपयांची ज्या व्यापाऱ्यांची संपत्ती आहे, इस्टेट आहे अशा लोकांना हाताचे ठसे द्यायला लावणे किंवा हद्दपार करण्यासारखी शिक्षा समोर उभी असणे हे अतिशय भयंकर होते. भारतामध्ये जे गुन्हेगार जाती-जमाती म्हणून नोंदविलेले आहेत, त्यांच्या बाबतीत जे कायदे ब्रिटिश राजवटीत होते ते साधारण वरील प्रकारचे होते.

हाताच्या ठशांविषयी हेन्री या एका पोलिस अधिकाऱ्याचे पुस्तक गांधींनी मुद्दाम वाचले आणि त्यांना असे आढळले, की हाताचे ठसे घेणे हे फक्त फौजदारी गुन्ह्यांमधील गुन्हेगारांनाच आवश्यक आहे.

दुसऱ्या दिवशी भारतीय लोकांची एक लहानशी सभा गांधींनी आयोजित केली आणि त्यांना अगदी थोडक्यात या होऊ घातलेल्या कायद्यांचा सारांश सांगितला आणि गांधींप्रमाणेच हजर असलेल्या प्रत्येक व्यक्तीला धक्काच बसला. एक गृहस्थ तर एकदम उठून उभे राहिले, त्यांना राग आवरत नव्हता. ते म्हणाले, 'जर माझ्याकडे कोणी येऊन माझ्या पत्नीचे प्रमाणपत्र मागू लागला तर मी त्याला जागेवरच ठार करीन. मग काहीही होवो!'

गांधींनी त्याला अतिशय शांत राहण्याचा सल्ला दिला आणि ते म्हणाले, 'जर हा कायदा पास झाला आणि आपण त्याला निमूटपणे शरण गेलो, तर दक्षिण आफ्रिकेतील हिंदी लोकांचे अस्तित्वच खलास झाले म्हणून समजा! हिंदी लोकांनी असा कोणताही गुन्हा केलेला नाही, की ज्यामुळे अशा प्रकारचा अपमानास्पद कायदा आपल्याविरुद्ध व्हावा.'

**११ सप्टेंबर, १९०६**

११ सप्टेंबर १९०६ ला एम्पायर थिएटरमध्ये फार मोठी सभा आयोजित करण्यात आली. या कायद्याची बातमी हळूहळू सर्वांच्या कानावर गेल्यामुळे सभेला इतकी गर्दी झाली की संपूर्ण थिएटर गच्च भरले होते. अब्दुल गनी अध्यक्षस्थानी होते. हे ब्रिटिश इंडियन असोसिएशनचे चेअरमन होते आणि एका मोठ्या फर्मचे मॅनेजर होते. या सभेमध्ये सर्व परिस्थिती गांधींनी विशद केली आणि काही ठराव पास झाले. त्यामध्ये ठराव क्र. ४ प्रमाणे हा कायदा पास झाला तर तो लोकांनी मानायचा नाही आणि त्याकरिता जरूर तो त्रास सहन करण्याचा निश्चय प्रगट केला. सर्व सभेचे कामकाज हिंदी किंवा गुजराथी भाषेत झाले. त्यामुळे कुणाला समजण्यास अडचण पडली नाही. या ठरावावर अनेक लोक बोलले. हाजी हबीब नावाच्या एका मोठ्या व्यापाऱ्याने ठरावाला पाठिंबा देताना सांगितले, 'आपण हा ठराव ईश्वराला साक्षी ठेवून पास केला पाहिजे.'

गांधींनी "ईश्वराला साक्षी ठेवून ठराव पास करावा" हे वाक्य ऐकले आणि ह्याचा अर्थ किती खोल आणि व्यापक आहे, हे सभेला सांगण्याचे त्यांनी ठरविले. गांधी म्हणाले -

आपण पास केलेले दुसरे ठराव आणि ईश्वराला साक्षी ठेवून पास केलेला हा ठराव याच्यामध्ये फार फरक आहे. आपले अस्तित्वच धोक्यात येणार असल्यामुळे या ठरावाचा आपण गांभीर्याने विचार केला पाहिजे आणि आत्ता हाजी हबीब यांनी ज्या एका विशेष गांभीर्याने आपण ठराव पास करावा असे म्हटले त्याला तर फारच मोठा अर्थ आहे; तसेच ठराव पास करणाऱ्यावरही अतिशय मोठी जबाबदारी येऊन पडत आहे हे आपल्याला लक्षात घ्यावे लागेल. ही जबाबदारी काय आहे, त्याकडे मी आपले लक्ष वेधू इच्छितो. नावे निराळी असली तरी आपण एक ईश्वर मानतो. आणि ईश्वराच्या

अनुक्रमणिका

नावाने किंवा त्याला साक्षी ठेवून ठराव पास करणे ही साधी गोष्ट नाही. ती एक प्रकारची शपथ आहे. अशी शपथ एकदा घेतल्यानंतर जर आपण ती मोडली तर ईश्वरासमोर आपण अपराधी ठरतो. माझे व्यक्तिगत मत असे आहे की; जो मनुष्य विचारपूर्वक अशा तऱ्हेने शपथ घेतो आणि नंतर ती मोडतो, तो त्याचा मनुष्यत्वाचाच हक्क गमावून बसतो. आणि पारिपत्य होण्यास योग्य ठरतो. म्हणून हाजी हबीब यांनी सुचविल्या-प्रमाणे ठराव पास करणे ही अतिशय गंभीर गोष्ट आहे. आपण प्रौढ जाणते लोक आहात. म्हणून या ठरावाचा व्यापक अर्थ मला समजला नाही, असे कोणी म्हणू शकणार नाही. अशा प्रकारची शपथ घेण्याचे प्रसंग क्वचितच येतात. माझ्या मते, भारतीयांच्या दक्षिण आफ्रिकेतील वास्तव्यामध्ये तो क्षण आज आला आहे. परंतु प्रत्येकाने स्वतःबद्दल पूर्ण विचार करुन नंतर हा ठराव पास करण्याला माझा पाठिंबा आहे, असे म्हणावे. नाहीतर या तऱ्हेने ठराव पास करण्याला माझा पाठिंबा नाही, असे म्हणण्यास हरकत नाही.

'याचा परिणाम काय होईल?'

'शक्यता आहे, की हा कायदा पास केला जाणार नाही, किंवा त्यात बदल केला जाईल. त्या परिस्थितीत आपल्याला त्याग करण्याचा प्रश्न उद्भवत नाही. परंतु कायदा पास झालाच तर अतिशय बिकट परिस्थितीला आपल्याला तोंड द्यावे लागेल. आपल्याला तुरुंगवास सोसावा लागेल. लाठीमारही होईल. अपमान सहन करावा लागेल. सक्त-मजुरीची शिक्षा झाल्यास कष्टप्रद कामेही करावी लागतील. आपली मालमत्ताही जप्त केली जाण्याची शक्यता आहे. आपल्यापैकी काहीजण अतिशय जुलमामुळे एखादेवेळी मागे येतील. लढा कदाचित दीर्घकाळही चालेल. पण एक गोष्ट मी तुम्हाला निश्चयपूर्वक सांगतो की, जोपर्यंत मूठभर तरी लोक या शपथेप्रमाणे लढा देण्यास तयार आहेत, तोपर्यंत या लढ्याचा एकाच प्रकारचा शेवट आहे आणि तो म्हणजे आपला जय!

आता मी माझ्या व्यक्तिगत जबाबदारीबद्दल दोन शब्द. कदाचित अगदी शेवटपर्यंत फार थोडे लोक या परीक्षेत उतरतील; पण आता अशा माझ्यासारख्याला एकच मार्ग खुला आहे आणि तो म्हणजे मरण पत्करणे; परंतु या कायद्यापुढे न नमणे, हे मी कोणताही मोठेपणाचा आव आणून बोलत नाही, म्हणून त्याबद्दल कृपया गैरसमज करून घेऊ नये.'

वरील भाषण संपवून गांधी खाली बसले. सभेमध्ये काही क्षण अगदी शांततेत गेले. गांधींचा प्रत्येक शब्द लोकांनी ऐकला. नव्हे तो हृदयापर्यंत गेला. सभेचे अध्यक्ष उभे राहिले त्यांनीही सर्व परिस्थिती लोकाना स्पष्ट केली आणि नंतर सर्व सभेने हात उंच करून ईश्वराला साक्ष ठेवून हा ठराव पास केला.

योगायोग असा की, तिसऱ्या दिवशी अचानक एम्पायर थिएटर आग लागून खाक झाले आणि लोकांना तो शुभ शकुन वाटला. ते म्हणाले, "ज्याप्रमाणे तो हॉल जळून खाक झाला त्याप्रमाणे हा कायदाही खलास होईल."

या चळवळीला नाव काय द्यावे याच्यावर थोडा विचार झाला. त्या वेळेपर्यंत निष्क्रिय प्रतिकार (Passive resistance) असा शब्दप्रयोग प्रचारात होता. परंतु तो योग्य वाटत नव्हता. या चळवळीमध्ये त्यापेक्षा काहीतरी अधिक आहे, हे जाणवत होते. म्हणून आपल्या वर्तमानपत्रात योग्य नाव सुचविणाऱ्याला गांधीजींनी एक बक्षीस जाहीर केले. त्याप्रमाणे अनेक नावे सुचविली गेली. मगनलाल गांधी यांनी सदाग्रह हे नाव सुचविले. तो शब्द बरा वाटला. पण त्यामध्ये अधिक सुधारणा करून नंतर गांधींनी स्वतः 'सत्याग्रह' हे नाव प्रचारात आणले.

## प्रमाणपत्रांची आहुती

१६ ऑगस्ट १९०८ जोहान्सबर्ग येथील हमेदिया मशिदीचे आवार लोकांनी भरून गेले होते. एक मोठे लोखंडी भांडे जळत्या निखाऱ्यांनी भरून एका कोपऱ्यात ठेवण्यात आले होते. सभेला सुरुवात होणार इतक्यात सायकलवरून शासनाकडून तार घेऊन एक मनुष्य आला. तारेत म्हटले होते -

'भारतीय लोकांच्या निर्णयाबद्दल सरकारला दुःख होत आहे व सरकार आपल्या निर्णयावर पक्के आहे.' ही तार सुरुवातीलाच वाचून दाखविण्यात आली. गांधींनी परत एकदा झालेली तडजोड, त्याप्रमाणे हिंदी लोकांनी उचललेली पावले, तरीही सरकारचा काळा कायदा रद्द न करण्यातला अडमुठेपणा, पत्रालाही उत्तरे न देणे वगैरे सर्व गोष्टी निवेदन केल्या. आणि आता पुढचे पाऊल म्हणून प्रमाणपत्रे जाळणे, हाच मार्ग उपलब्ध आहे हे स्पष्ट केले. पण त्याचबरोबर याचे परिणाम भोगण्याकरिता दिव्य करावे लागेल, याची यथार्थ कल्पना दिली. ज्यांनी प्रमाणपत्रे जाळण्याकरिता दिली आहेत,

परंतु विचारात बदल झाला असेल तर त्यांनी ती मागेही घ्यावीत, असे सुचविले, गांधींचे भाषण चालू असताना अनेक लोक ओरडून सांगत होते, 'प्रमाणपत्रे जाळा, आम्हाला ती परत नकोत.'

सभेच्या अध्यक्षांकडे दोन हजार प्रमाणपत्रे जाळण्याकरिता आली होती. प्रथम अध्यक्षांनी काही प्रमाणपत्रे आगीत टाकली. सर्व लोकांनी एकदम जल्लोष केला. नंतर गांधी उठले, त्यांनी प्रमाणपत्रे आगीत टाकली मात्र, त्यांच्या हातावर पोलिसांनी एकदम लाठ्या मारल्या. गांधी आडवे पडले; पण सावध होते. हळूहळू ते उठले. हात थरथरत होते, आणि पुन्हा तशाच स्थितीत आणखी काही पत्रे आगीत टाकली. त्यांच्या हातावर पोलिसांनी इतक्या लाठ्या मारल्या, की गांधी बेशुद्धच झाले. त्यांना डोक्यावरही जखम झाली. मात्र सर्व प्रमाणपत्रे अग्नीच्या भक्ष्यस्थानी पडली.

लोकांचा उत्साह शिगेल पोहचला. वर्तमानपत्रांचे बातमीदार हजर होते. त्यामध्ये लंडनमधील 'डेली मेल' चे बातमीदार होते. त्यांनी अतिशय सविस्तर बातमी आपल्या वर्तमानपत्राकडे पाठविली, त्यामध्ये या प्रसंगाची तुलना त्यांनी अमेरिकेतील बोस्टन चहा पार्टी (Boston Tea Party) या प्रसंगाशी केली होती. त्या ठिकाणी सर्व ब्रिटिश साम्राज्याची सत्ता अमेरिकेत वसलेल्या युरोपियन लोकांविरुद्ध खडी होती. बलशाली सत्तेला अमेरिकनांनी आव्हान दिले. ब्रिटनच्या सरकारने अमेरिकन लोकांवर अन्याय कर लादला होता. बोस्टन येथे झालेल्या चहा-पार्टीत सगळ्यांनी त्याचा निषेध केला. त्यातून अमेरिकन स्वातंत्र्य युद्ध सुरु झाले व यशस्वीही झाले. आफ्रिकेत तर तेरा हजार निःशस्त्र भारतीय लोकांविरुद्ध बलशाली ट्रान्सवाल सरकारने हात उगारला होता. भारतीयांचा विश्वास फक्त आपले उद्दिष्ट न्याय्य आहे यावर होता आणि म्हणूनच ईश्वरावर त्यांची श्रद्धा होती.

१९०६ साली सुरु झालेला हा सत्याग्रह दीर्घकाळ चालत अखेर १९१४ साली या जगातल्या पहिल्या सत्याग्रहाचा विजय झाला. जनरल स्मट्स् आणि गांधीजी यांची बोलणी होऊन हा काळा कायदा मागे घेण्यात आला.

दक्षिण आफ्रिकेतील सत्याग्रह यशस्वी केल्यानंतर १९१५ साली गांधीजी भारतात परतले. भारतातील स्वातंत्र्यलढ्याचे नेतृत्व लोकमान्य टिळकांच्या निधनानंतर महात्मा गांधीजींनी केले. १९२०, १९३०, १९४०, आणि १९४२ असे लढे भारतीय जनतेने केले! १९२० च्या असहकार आंदोलनास चौरीचौरा येथील पोलिसांच्या हत्येचे गालबोट लागताच गांधीजींनी असहकाराचे आंदोलन मागे घेतले. ऐन भरात आंदोलन आलेले असतानाही ते अहिंसेच्या मार्गानेच चालले पाहिजे यासाठी गांधीजींनी सहकारी नेत्याची नाराजी पत्करुन आंदोलन थांबवले.

१९३० साली मिठाचा सत्याग्रह करण्यासाठी साबरमती ते दांडी पदयात्रा केली. सागर किनाऱ्यावर जाऊन चिमूटभर मीठ उचलले.

उचललेस तू मीठ मूठभर
साम्राज्याचा खचला पाया!
असे उद्गार कवींनी काढले.

ज्या ब्रिटिश साम्राज्यावर सूर्य कधीही मावळत नव्हता त्या साम्राज्याला चिमूटभर मीठ उचलून सत्याग्रहाच्या मार्गाने गांधीजींनी जबरदस्त हादरा दिला. या मिठाच्या सत्याग्रहात भाग घेणारे निःशस्त्र सत्याग्रही सागर किनाऱ्यावर येऊन परकीय सरकारला कर न देता मीठ तयार करीत. पोलिसांचा लाठीमार होई. मुठी रक्तबंबाळ होत. परंतु मुठीत घट्ट पकडलेले मीठ सुटत नसे!

१९४० साली गांधीजींनी वैयक्तिक सत्याग्रह पुकारला. पहिले सत्याग्रही त्यांनी घोषित केले - आचार्य विनोबा भावे!

८ ऑगस्ट १९४२ रोजी 'छोडो भारत' चा आदेश गांधीजींनी ब्रिटिशांना दिला. सरकारने गांधीजींना व सर्व नेत्यांना पकडले. नेत्यांच्या अनुपस्थितीत तरुणांच्या नेतृत्वाखाली जनतेने ९ ऑगस्ट १९४२ पासून स्वयंस्फूर्त आंदोलन उभारले.

४० कोटी निःशस्त्र भारतीय जनतेने यशस्वी केलेले हे सत्याग्रहाचे साधन त्यानंतर अमेरिकेचे निग्रो नेते डॉ. मार्टिन ल्युथर किंग यांनी यशस्वीपणे वापरुन गोरे विरुद्ध काळे ही अन्यायी वंशभेद व्यवस्था संपवली.

आजही भारतात स्वातंत्र्योत्तर काळातही अन्याय व जुलुमाविरुद्ध लढ्यांसाठी याच सत्याग्रहांचा वापर निःशस्त्र जनता करत आहे.

मंदिर प्रवेश सत्याग्रह, महाडचा चवदार तळे सत्याग्रह, महाकाय धरणांमुळे विस्थापित होणाऱ्या गरीब जनतेच्या पुनर्वसनासाठी सत्याग्रह, विदेशी कोकाकोला विरुद्ध

सत्याग्रह, एन्रॉन विरुद्ध सत्याग्रह या व भविष्यात यापुढे होणाऱ्या सर्व सत्याग्रहांचे प्रेरणास्थान शंभर वर्षांपूर्वी म. गांधीजींनी जन्म दिलेल्या दक्षिण आफ्रिकेतील सत्याग्रहच असणार आहे.

### तात्त्विक भूमिका

अन्यायाचा प्रतिकार केलाच पाहिजे. पण त्यासाठी अन्याय करणाऱ्या माणसाचे जीवनच संपवले पाहिजे असे नाही. विरोध अन्याय्य कृती व प्रवृत्तीला करायला हवा. अन्याय करणाऱ्या व्यक्तीवर सूड उगवायचा, किंवा अन्यायाचे मूळच नष्ट करण्यासाठी त्याला जिवे मारायचे - हे बरोबर नाही. याबाबत म. गांधी व जगभरच्या विचारवंतांनी खूप खोलात जाऊन विचार केला आहे. आपण जीव निर्माण केला नाही, करु शकत नाही. मग दुसऱ्याचा जीव घेण्याचा आपल्याला काय अधिकार आहे? कुणाचाही जीव न जाता अन्यायाचे निराकरण करायला हवे. तो सत्याग्रहाचा हेतू व मार्ग आहे.

दुसरे असे की अमूक एक गोष्ट अन्यायाची आहे व मी म्हणतो तेच सत्य आहे असे मला आज वाटत असले तरी माझ्या विचारबुद्धीला मर्यादा आहेत. इतर कुणाच्याही प्रमाणे प्रश्नाचा मी आजवर जो विचार केला तो सर्वांग परिपूर्ण असेलच असे नाही. म्हणून माझे म्हणणे योग्य व न्याय्य आहे हे मीसुद्धा तपासत राहिले पाहिजे. सामनेवाल्याची बाजू समजावून घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे. त्याच्याशी संवाद चालू ठेवला पाहिजे. मात्र ते बेमुदत नाही. ठरावीक कालमर्यादेपर्यंत चर्चा, वाटाघाटी करुन प्रश्न सुटला तर उत्तम. नाही तर मी आत्मक्लेशाच्या मार्गाने अन्यायाचा प्रतिकार करावा. त्यामुळे माझी बाजू कमकुवत तर नाही ना, तिच्यात माझ्या स्वार्थाचे हीण मिसळलेले नाही ना - हे मी तपासत रहावे. मी दुसऱ्याला त्रास न देता आत्मक्लेश करून घेतो आहे हे पाहून सामनेवाला व समाजातले इतर लोक माझ्या मागणीकडे अधिक तत्परतेने, निकडीने पाहू लागतात. जास्तीतजास्त लोकांचा माझ्या म्हणण्याला पाठिंबा मिळाला म्हणजे सामनेवाल्याला ते मान्य करावे लागेल.

शस्त्राचा मार्ग अवलंबताना गुप्तता पाळावी लागते. म्हणजे माझी बाजू कशी न्यायाची आहे हे लोकांना समजावून सांगण्याला मर्यादा पडतात. शस्त्रांसाठी पैसा मोठ्या प्रमाणावर लागतो. तो उघडपणे, कायदेशीर मार्गाने मिळवता येत नाही. सामनेवाल्यांच्या किंवा इतरांच्या खजिन्यावर दरोडे घालावे लागतात. अलिकडे अंमली पदार्थांचा चोरटा व्यापार जगभर चालतो. काही दहशतवादी संघटना त्यातून पैसा मिळवतात. शस्त्राबरोबर अशी गैरकृत्यांची मालिका सुरु होते. सर्वांत वाईट म्हणजे आपापसात मतभेद झाले की एकेकाळचे जिवलग सहकारी हे परस्परांचे कट्टर शत्रू बनतात. जगातल्या बहुतेक सशस्त्र क्रांत्यांत तसे घडले. त्यामुळेच आपले मुख्य उद्दिष्ट साध्या करण्यात त्यांना यश आले नाही.

यासारखे दोष व धोके शांततामय मार्गात नाहीत. मात्र तो कष्टाचा आहे, वेळ घेणारा आहे. मुख्य म्हणजे माझी सर्व बाजूंनी कसोटी लागते. मी म्हणतो ते खरोखरच पूर्ण न्यायाचे आहे, त्यात सूडबुद्धीचा किंवा संकुचित स्वार्थाचा लवलेशही नाही अशी खात्री असावी लागते. माझ्या कामचुकारपणावर पांघरुण घालण्यासाठी, विशेष सवलती मागण्यासाठी मी ते करीत नाही. मी जे मागतो ते माझ्यासह सगळ्या समाजाच्या फायद्याचे आहे असे मला वाटले पाहिजे व दुसऱ्याला पटवून देता आले पाहिजे.

सत्याग्रहीने सदा सत्याची उपासना केली पाहिजे. आपले कर्तव्य चोखपणे बजावले पाहिजे. म्हणूनच बापू म्हणतात, 'मेरा रास्ता आसान नहीं है, लेकिन जीत पक्की है।'

☑ ☑ ☑

***With goodwill towards all,***
***with malice towards none***
***with firmness in the right,***
***as God grants us to see the right.***
***- Lincoln***

*सर्वांविषयी सद्‌भाव*
*कोणाविषयीही आकस नाही*
*सत्याचा आग्रह*
*सत्य ? आपल्या ईश्वरदत्त आकलन शक्तीप्रमाणे.*

गांधीजी 'कोणाही विषयी आकस नाही' याच्याही पलीकडे गेले होते. शत्रूविषयीही आंतरिक खरेखुरे प्रेम त्यांना अभिप्रेत होते.

- देवदत्त दाभोलकर

अनुक्रमणिका







# धीरेनदा आत्मकथा

१९२८ मध्ये बार्डोली सत्याग्रहाच्या बातम्या वाचनात आल्या. तिथल्या संघटनेबद्दल वाचले तेव्हा वाटले की अयोध्या भागातही असे संघटन होऊ शकते. याच सुमारास आरोग्यलाभ करण्यासाठी तीन महिने काश्मीरमध्ये राहणे झाले. तेथे श्री. कृष्णदास गांधींशी बरीच चर्चा करण्याचा योग आला. मी खालीलप्रमाणे योजना बनवली -

१. अनेक गावांच्या केंद्रस्थानी आश्रम स्थापन करुन् खेड्यांतील तरुणांना कताई व धुलाई शिकवणे आणि त्यांच्याद्धारा खेड्यांत काम करणे.

२. वस्त्रस्वावलंबनाचे काम प्रमुख मानणे. मात्र सोबतच ग्रामसफाई, प्रौढ शिक्षण, ग्रामसेवक दलाचे संघटन, पंचायतींची स्थापना आणि स्त्रीशिक्षण इ. खेड्यांच्या सर्वांगीण सुधारणेचे कार्यक्रमही हाती घेणे.

३. खेड्यांतील लोकांना सर्व प्रकारचे शिक्षण आणि मार्गदर्शन देणे.

काश्मीरहून परत आल्यावर मी श्री. शंकरलाल बँकर यांच्यासमोर ही योजना ठेवली त्यांना ती आवडली आणि चरखा संघातर्फे तिचा खर्च उचलण्याचे त्यांनी मान्य केले.

यासाठी आम्ही रासना गाव निवडले. रासना व आसपासच्या गावांत मी खूप फिरलो आणि लोकांशी योजनेबाबत चर्चा केली. जेव्हा वाटले की लोकांना योजना नीट कळली आहे, तेव्हा कताई-धुनाईचे काम सुरु केले. मग रात्रशाळा सुरु केली. पुढे स्त्रियांसाठी विद्यालयही सुरु केले.

रासना येथे कामाची जुळवाजुळव मी करीतच होतो. तेवढ्यात १९३० चे आंदोलन सुरु झाले. खादीची मागणी इतकी वाढली की खादी-उत्पत्ती कार्यातच बुडून जावे लागले. पुढे बंगालमध्ये या कामासाठी जावे लागले.

१९३०-३२ आणि १९३३-३४ या काळात इतके काम केले की शरीर ते सहन करु शकले नाही. मी अत्यंत अशक्त झालो होतो. विश्रांतीसाठी तरी एखाद्या खेड्यातच का जाऊ नये असे वाटले. मित्रांना याबाबत लिहिले आणि त्यांनी रणीवां गाव निवडले.

रणीवां फैजाबाद जिल्ह्याच्या मध्यभागी असलेले अगदी लहान गाव होते. एकूण पन्नास घरे असतील. रस्ता नसल्याने बाहेरच्या जगाशी फारसा संबंध नव्हता. काँग्रेस-बद्दलही तेथील लोकांना काही माहिती नव्हती. मी माझ्या सहकाऱ्यांना असेच गाव निवडायला सांगितले होते, जेथे कोणत्याही प्रकारचे सार्वजनिक कार्य होत नसेल. माझ्या आरोग्याच्या दृष्टीनेच मी तसे सांगितले होते. परंतु दोन-तीन महिन्यांच्या वास्तव्यानंतर मला त्याच क्षेत्रात काम करावेसे वाटले, आणि स्वावलंबन कार्याच्या प्रसारासाठी मी एक योजना बनवली. अशा रीतीने रणीवां येथे आश्रमातर्फे ग्रामसेवा केंद्र सुरु करण्याचे ठरले.

कार्यक्रम कोणता घ्यायचा? मी पाहिले की शेकडो वर्षांच्या गरिबीमुळे ग्रामीण लोक अगदी अचेतन झाले आहेत; जोपर्यंत त्यांच्या जीवनात आम्ही चेतनेचा संचार करणार नाही, तोपर्यंत कोणताही कार्यक्रम यशस्वी होणार नाही. आणि यासाठी त्यांच्या जीवनाच्या प्रत्येक अंगाची एकाच वेळेस सेवा करणे आवश्यक आहे. आम्ही जर फक्त गावच्या स्वच्छतेचा कार्यक्रम घेतला, तर आयुष्यभर गल्ल्या व साफ करीत राहू आणि त्यांच्या जीवनात कोणतेही परिवर्तन आम्हाला घडवून आणता येणार नाही. केवळ चरख्याचे काम केले तरी तसेच होईल. १९२९ मध्ये गांधीजी मेरठला आले होते तेव्हा त्यांनी आम्हाला सांगितले होते, "तुम्ही फक्त कत्तिनांपासून सूत घेऊन खादी विकली तर काहीच केले नाही असे होईल. तुम्हाला प्रत्येक कत्तिनाला स्वराज्यवादी बनवायचे आहे." म्हणून, योजना जरी मी वस्त्रस्वावलंबनाची बनवली होती, तरी ग्रामसंघटनेचा सर्वांगीण कार्यक्रमच हाती घेण्याचा इरादा होता.

सुरुवातीला सहकाऱ्यांनी कार्यक्रमासाठी उत्सुकता प्रकट केली तेव्हा मी सांगितले की गावात गावकऱ्यांसारखे राहणे हाच कार्यक्रम आहे. गावात गावकऱ्यांसारखे राहू लागू आणि तेथल्या समस्यांबद्दल सजग राहू तर कार्यक्रम आपोआप समोर येईल, असा मला विश्वास होता. जे काम ज्या क्रमाने समोर येईल, त्याच क्रमाने करणे त्या क्षेत्रासाठी सर्वोत्तम ठरेल. म्हणून सुरुवातीला आम्ही लोकांना चरखा चालवून आपल्या सुताचा कपडा वापरण्याची शिकवण देऊ लागलो, आणि त्याचबरोबर त्यांच्यामध्ये वावरताना, वेगवेगळ्या गोष्टींची चर्चा करताना देशाची परिस्थिती आणि त्याबद्दल गावकऱ्यांचे कर्तव्य याबाबतही बोलू लागलो.

अनुक्रमणिका






आमचे केवळ राहणेही गावकऱ्यांना अनेक गोष्टी शिकवत होते. जात्यावर दळणे, स्वयंपाक करणे, घराची डागडुजी करणें, भांडी घासणे, झाडझूड करणे ही कामे प्रतिष्ठित घरातले, तेही पुरुष करू शकतात, असा विचारच कधी लोकांच्या मनाला शिवला नव्हता. हळूहळू या कामांबद्दल घृणेची भावना कमी होऊ लागली. लोक कामात आम्हाला साथ देऊ लागले. अशा प्रकारे तीनएक महिन्यांत गावातील प्रत्येकाशी आमचा परिचय झाला. प्रत्येक कुटुंबात आमचे स्थान निर्माण झाले. लोक आमच्याशी सुखदुःखाच्या गोष्टी करू लागले, सल्लामसलत करू लागले.

होळीच्या निमित्ताने आम्ही ग्रामसफाईचा कार्यक्रम घेतला. आणि नंतर सफाईबद्दल लोकांना सतत सांगू लागलो. लोकांना होमिओपॅथीची औषधे देणेही सुरु केले. त्यामुळे पाच-सहा गावांतल्या लोकांशी परिचय झाला, आणि तेथे चरखेही चालू लागले. बरेच चरखे चालू लागले तेव्हा विणाईचीही व्यवस्था केली. विणाईच्या कार्यक्रमाने अनेक फायदे झाले. गावकऱ्यांना एक नवी गोष्ट पाहायला मिळाली. उद्योगाचे वातावरण निर्माण झाले. विणाईसाठी एका ब्राह्मण घरात जागा मिळाली आणि तेथे मुसलमान विणकर बसू लागला, हीदेखील त्या भागासाठी विशेष गोष्ट होती. गावातल्या गरीब ब्राह्मण तरुणांना विणाई शिकण्यासाठी आम्ही तयार केले. हे त्यांच्या दृष्टीने मोठ्या धाडसाचेच काम होते. पुढे चरखे बनवण्याचे कामही आम्ही सुरु केले. रूढिवादी विचारांऐवजी श्रमनिष्ठा निर्माण झाली. आपल्या गरजा पूर्ण करण्यासाठी अनेक उद्योग करता येतात, आणि त्याद्वारे गावातील गरिबी आणि बेकारी दूर होऊ शकते याचे दर्शन लोकांना झाले.

गावात साबण बनवणेही आम्ही सुरु केले. त्यामुळे कपड्यांची स्वच्छताही वाढली. जवळच्या गावात रोज संध्याकाळी रामायण-पाठ सुरू केला. लोक त्यानिमित्ताने एकत्र येऊ लागले. आमचा एक सहकारी त्यांना वर्तमनपत्रही वाचून दाखवू लागला. हळूहळू २५ गावात रात्रशाळा सुरू झाली. आमच्या कार्यक्षेत्राचा अनेक गावांत विस्तार झाला.

मला थोड्या दिवसांनंतर जाणवले की लोकांना केवळ होमिओपॅथीची औषधे देणे पुरेसे नाही. अशाने लोक कधीही स्वावलंबी बनणार नाहीत. जुन्या, असाध्य रोगांवर आम्ही अवश्य उपचार करावा, परंतु सामान्य ताप, खोकला, सर्दी, फोड वगैरेंचा उपचार गावकऱ्यांना स्वतःला करता यावा. यासाठी त्यांना गावात उपलब्ध वनस्पतींचा उपयोग सांगावा, यासाठी आम्ही पुस्तके मागवून अभ्यास करण्याचा प्रयत्न केला, परंतु तो फारसा सफल झाला नाही. मला दिसले की गावातल्या लोकांना, विशेषतः म्हाताऱ्या स्त्रियांना, पुष्कळ इलाज माहीत असतात. ग्रामसेवकाने असे इलाज सावधपणे लिहून घेतले, त्याबाबत प्रयोग करुन आजमावले, तर एक प्रकारची संपूर्ण चिकित्सा प्रणाली तयार होऊ शकते. निसर्गोपचाराला याची जोड दिली पाहिजे अशी माझी भावना आहे.

रणीवांमध्ये आम्ही एक वर्ष पूर्ण केले तेव्हा आमचा कार्यक्रम ६-७ गावांमध्ये पसरला होता आणि त्यापेक्षाही दूरच्या गावकऱ्यांशी परिचय झाला होता. गांधीजींना जेव्हा कळले की आम्ही अनेक गावांत काम करीत आहोत तेव्हा त्यांनी मला सेवाग्रामला बोलावून घेतले. त्यांचे मत होते की ग्रामसेवेचे काम एका गावापुरतेच मर्यादित ठेवावे. नाहीतर कार्यशक्ती विभागली जाऊन कुठेच यश मिळणार नाही. माझा मात्र असा अनुभव होता की ग्रामीण लोकांमध्ये एका निश्चित गतीनेच परिवर्तन होऊ शकते; कितीही प्रयत्न केला तरी तो वेग वाढवता येत नाही. म्हणून एका गावात बसले काय किंवा अनेक गावांशी संपर्क ठेवला काय, काळ तेवढाच लागणार. अनेक गावांशी संपर्क केल्याने आमच्या वेगवेगळ्या कार्यक्रमांत वेगवेगळी रुची असलेले लोक सामील होतील आणि त्यांच्या आधाराने काम पुढे नेता येईल. आणि याला वेळ तेवढाच लागेल जेवढा एका गावात काम करायला लागेल. अनेक कार्यक्रमांसाठी वातावरण तयार व्हावे लागते. एखाद्या क्षेत्रात असे वातावरण तयार होऊन लोकांना एकमेकांचा आधार मिळू शकतो. आम्ही रणीवां गावात सर्वात जास्त वेळ घालवला, परंतु सर्वात कमी संपर्क असलेल्या चतुरपट्टी गावात सर्वात जास्त चरखे चालू लागले. आणि आश्रमाला लागून असलेल्या केवाडी गावात एकही चरखा चालू होऊ शकला नाही.

गांधीजींशी माझी तीन दिवस चर्चा चालली. परंतु आम्ही सहमत होऊ शकलो नाही. शेवटी ते म्हणाले - "जा, आपल्या पद्धतीने काम कर. अनुभव तुला माझे म्हणणे शेवटी पटवून देईल." त्यांचा आशीर्वाद घेऊन मी परतलो.

सुरुवातीला आम्ही तीन जण रणीवांला आलो








होतो. त्यांची संख्या वाढली. व्यापही वाढला. म्हणून स्वतंत्र आश्रम बांधण्याचे ठरले. जवळच्या जंगलातला एक भाग मला पसंत पडला. जंगल साफ करण्याच्या आणि जागा समतल करण्याच्या कामात आम्ही लागलो, लोकही आमच्या मदतीला आले.

आश्रमाचा प्रभाव वाढू लागला, तशी सरकारी अधिकाऱ्यांची वक्रदृष्टीही आमच्याकडे वळली. आमच्या संपर्कातील लोकांना पोलिस धाक दाखवू लागले.

लखनौ काँग्रेसमधील खादी-ग्रामोद्योग प्रदर्शनीच्या कामासाठी मी गेलो असताना माझे सहकारी करणभाई यांना एक वर्षापूर्वी केलेल्या भाषणाबद्दल राजद्रोहाच्या आरोपाखाली अटक करण्यात आली. मी घाबरुन पळून गेलो आहे असा प्रचार सुरू झाला. दमन-चक्र सुरू झाले. आश्रमाला जमीन देणाऱ्या लालताप्रसादजींचे मुखियापद हिरावून घेण्यात आले. त्या भागातल्या सरकारी पंचायतीचे ते सरपंचही होते; ते पदही काढून घेण्यात आले. परंतु दोन वर्षे प्रयत्न करुनही सरकारला दुसरा सरपंच करता आला नाही.

वर्षभरापूर्वी पोलिस शिपायाला पाहून लोकांना कापरे भरत असे, ते गाव सोडून पळून जात. त्याच लोकांनी धैर्याने दमनचा सामना केला, आणि आश्रमाला ते मदत करीत राहिले. १९३३ मध्ये जवाहरलालजींनी माझ्या एका पत्राला उत्तर देताना लिहिले होते - "मी एक गोष्ट तुम्हाला सांगून ठेवतो. खेड्यात तुम्ही कोणतेही काम करा, पण त्याचा जर काही वास्तविक प्रभाव जनतेवर पडत असेल तर अधिकारी तुम्हाला ते काम करु देणार नाहीत." रणीवांमध्ये हेच घडत होते.

यातून एक लाभही झाला. लोकांचे साहस व प्रेम यांची परीक्षा झाली. आमच्या सहकाऱ्यांचीही कसोटी झाली. करणभाई निर्दोष सुटले. मीही लखनौहून परतलो. कामाला पुन्हा वेग आला. रणीवां केंद्राने एका संस्थेचे रूप घेतले.



१९३७ मध्ये प्रांतिक कायदेमंडळाच्या निवडणुका झाल्या. स्वातंत्र्याच्या पहिल्या पडावावर पोचण्यासाठीचा हा संघर्ष होता. म्हणून आश्रमाला यात पूर्ण शक्तीसह सहकार्य करावे लागले. निवडणुकीदरम्यान गावोगाव फिरावे लागले. प्रत्येक श्रेणीतील लोकांशी संपर्क झाला.

निवडणुकीत काँग्रेसचा विजय झाला. परंतु काँग्रेसला मत दिल्याबद्दल जमीनदारांनी रयतेला छळणे सुरु केले. लोकांमध्ये घबराट पसरली. अधिकारी, पोलिस जमीनदारांनाच साथ देत. अन्याय, छळाची अनेक प्रकरणे आम्हाला हाताळावी लागली.

उत्तरप्रदेशात काँग्रेसचे मंत्रिमंडळ बनल्यानंतर स्थानिक पंचायतींच्या संघटनेचे काम आमचेकडे आले. परंतु आम्ही पाहिले की पंचायतींचाही स्वतःवर विश्वास नव्हता. पंचायतींची पद्धत मोडून अनेक वर्षे झाली. प्रत्येक गावात पोलिस व जमीनदारांची माणसे होते. गावातील कुशल, योग्य, बुद्धिमान व्यक्ती गाव सोडून गेल्याने नेतृत्वाचा प्रश्नही होता. आम्ही विचार केला की जर शिकलेल्या, सद्‌भावना असलेल्या तरुणांना ग्रामोद्यागांचे प्रशिक्षण दिले आणि त्यांच्या घरात उद्योगकेंद्रे सुरु केली तर गावातील मध्यम श्रेणीच्या बेकारीची समस्या सुटेल आणि गावातील बुद्धिजीवींना गावातच रोखता येऊन ग्रामआंदोलनासाठी स्वाभाविक नेतृत्वाचा विकास करता येईल. मी या दृष्टीने एक ग्रामोद्योग विद्यालय स्थापन करण्याची योजना बनवून काँग्रेस सरकारला पाठवली. सरकारने ती मंजूरही केली.

ग्रामोद्योग विद्यालयाचे काम रुळावर आल्यानंतर आम्ही पुन्हा चरख्याच्या कामाकडे वळलो. गावागावात आम्ही चरखा विद्यालये उघडली. आमच्या लक्षात आले की ग्रामोद्योगांचा कितीही प्रसार केला तरी गावांची स्थिती सुधारणार नाही. रिकाम्या वेळासाठी चरखाच उपयोगी पडू शकतो. चरखा विद्यालयांमुळे आमचा संपर्क वाढला आणि ग्रामसंघटन कार्याला मदत झाली. यामुळे पंचायतीही जागृत होऊ लागल्या.

ग्रामसुधारणेसाठी उद्योगासोबतच शिक्षणाची गरज आम्हाला अधिकाधिक जाणवू लागली. पंचायतींमार्फत शाळा चालाव्या असा प्रयत्न आम्ही सुरु केला. या रात्रशाळा असत. रात्रशाळेतल्या मुलांची विचारपूस केल्यावर कळले की ती दिवसभर मुख्यत: गुरे चारण्याचे काम करीत होती. आणि गुरे किती? एक किंवा दोन! एक-दोन लोकांनी गावातली गुरे चारण्याचे काम केले असते तर सगळी मुले शिक्षणासाठी मोकळी होऊ शकली असती; परंतु या सगळ्या गोष्टींची व्यवस्था मोडकळीला आली होती.

रात्रशाळांमुळे अक्षरज्ञानाखेरीज गावात सामाजिक जीवनाची सुरुवात झाली. रात्रशाळेच्या शिक्षकांना आम्ही ग्रामोद्योग शिकण्यास उत्तेजन दिले.

आता स्त्रीशिक्षणाच्या कल्पनाही साकार कराव्या असे माझ्या मनाने घेतले. गावात सगळीकडे पडदा होता. प्रयत्न करुन चौथी पास एक भगिनी मिळाली. तिला प्रमुख करुन मुलींची शाळा सुरु केली. प्रतिष्ठित घरातील तिसरी-चौथी पास सुनांचा शोध घेऊन त्यांना हे काम करण्यास राजी करावे, त्यांना तीन वर्षांचे प्रशिक्षण द्यावे, अशी एक योजना मी बनवली. त्यातून त्यांची पडदा प्रथा कमी होईल, चरखा व घरगुती उद्योगांचे ज्ञान होईल. देशदुनियेची माहिती होईल, ग्रामीण समस्यांची माहिती होईल, मुलांचे पालन व प्रसूतिविज्ञान यांचा परिचय होईल, अशी कल्पना होती. ही कल्पना साकार करण्यासाठी मला कठोर परिश्रम करावे लागले. ५० स्त्रीसुधार केंद्रांच्या माझ्या योजनेने मित्रांमध्ये खळबळ माजली. त्यांना त्यात धोका दिसला. मित्रांना समजावणे, त्यांच्या टीकेचे उत्तर देणे, खेड्यात लोकांनी मुली-सुनांना पाठवण्यासठी राजी करणे, ही सगळी कामे करावी लागली. '५० महिलांचे एक शिक्षण-शिबीर शेवटी नोव्हेंबर १९३९ मध्ये फैजाबादमध्ये सुरु झाले. यात अविवाहित मुलीही होत्या. प्रतिष्ठित घरातील लोकांनी जुन्या रुढी तोडून, आमच्या विश्वासावर मुली-सुनांना पाठवले. ही मोठी क्रांतिकारी गोष्ट होती.

पहिल्यां दिवशी स्त्रिया आल्या त्या घूंगट काढून, आणि सोबत मुलांना घेऊन. माझे सहकारी हे पाहून घाबरुनच गेले! ते म्हणू लागले - मुले घेऊन यायला बंदी करा. मी त्यांना हसून म्हणत असे - 'सगळे ठीक होईल.' स्त्रियांमध्ये काम करायचे आणि झमेल्याला घाबरायचे, असे कसे चालेल? आणि त्यांच्यासोबत मुले नसतील असे कसे होईल? स्त्रियांसाठी कोणतीही योजना मुलांना वेगळे काढून करता येणार नाही. घरी त्यांना मुलांकडे लक्ष द्यावे लागेलच. त्याचे ज्ञानही तर स्त्री-शिक्षणात द्यायलाच हवे.

माझ्यासमोर मुख्य अडचण होती ती म्हणजे माझ्यासोबत काम करणारी कोणतीच भगिनी नव्हती. परंतु ही अडचणही दूर झाली. मी पाहिले की कंबर बांधून एखादे चांगले काम करायला प्रारंभ केला तर परमेश्वर सगळी व्यवस्था हळूहळू करतो. 'सगळ्या सोयी झाल्यावर काम सुरु करु.' ही वृत्ती मला कधीच कळली नाही. असा विचार केला तर कोणताच क्रांतिकारी कार्यक्रम चालू शकत नाही. सेवकाचा आपल्या योजनेचे औचित्य आणि व्यावहारिकता यांवर विश्वास असला पाहिजे. त्याचा स्वतःवर विश्वास असला पाहिजे. मग शुभकार्य सुरु करुन टाकायला पाहिजे. साधने हळूहळू मिळत जातील. या सिद्धांतावर माझा दृढ विश्वास होता. झालेही तसेच. चार महिन्यांनंतर शिबिरातल्या स्त्रियांना पाहून लोक आश्चर्यचकित झाले!

माझी बहीण सुचेता आणि एक भगिनी यांनी या कामाला वेळ दिला होता. त्याचा लाभ घेऊन मी खेड्यांमध्ये या योजनेचा प्रचार करण्याचे ठरवले. या भगिनी सभांमध्ये स्त्री-सुधारणेवर बोलत आणि नंतर स्त्रियांशी बोलत. या कार्यक्रमामुळे खेड्यांत अनुकूल वातावरण निर्माण झाले. एका गावात एक गृहस्थ मला म्हणाले- "भाईजी, मी आजच माझ्या सुनेचे तोंड पाहिले." महाराष्ट्रात ही फारशी मोठी गोष्ट नसेल, परंतु अयोध्या भागात ही फार मोठी क्रांती होती.

स्त्री-शिक्षणाला यातून फार मोठी चालना मिळाली. एक वर्षभराचा कार्यक्रम यशस्वी झाला. परंतु पुढच्या वर्षी सरकारने (काँग्रेस सरकार तेव्हा राहिले नव्हते) काम आपल्या हाती घेण्याचे ठरवले. त्यांना स्त्रियांवर माझा प्रभाव पडायला नको होता. म्हणून शिबिराच्या जबाबदारीतून मी मुक्त झालो.

१९४० मध्ये आम्ही ग्रामसंघटन योजनेचे पुढचे पाऊल उचलले. थोड्या शिकलेल्या तरुणांना कागद उद्योगाचे प्रशिक्षण देऊन उद्योगकेंद्रे सुरु केली. मात्र एप्रिलमध्येच मला अटक झाली.

१०-महिन्यांनंतर तुरुंगातून माझी सुटका झाली तेव्हा मी पाहिले की २३ उद्योग केंद्रे काम करीत होती. त्या तरुणांचे यश पाहून भोवतालच्या लोकांमध्ये आशा आणि विश्वासाचा संचार होऊ लागला. सीमित साधनांनीही, प्रयत्न केला तर आपण आपली परिस्थिती बदलू शकतो, असे त्यांना जाणवू लागले होते.

या उद्योगांचा एक संघ बनवण्याचा मी प्रयत्न केला. त्याला अन्य कामांचाही जोड दिली. मात्र एवढ्यात ऑगस्ट क्रांतीची धूमधाम सुरु झाली. आश्रम जप्त झाला. सगळे कार्यकर्ते तुरुंगात गेले. सरकारने आमच्या सगळ्या रचनात्मक कामाची पाळेमुळे खणून काढण्याचा प्रयत्न केला.

अनुक्रमणिका

परंतु, मी नंतर तुरुंगातून बाहेर आलो तेव्हा पाहिले की त्या तरुणांचे काम चालूच राहिले होते. सुरुवातीपासूनच स्वावलंबनाची दृष्टी ठेवल्यामुळे, आश्रम जप्त झाला तरीही, त्यांचा आत्मविश्वास कमी झाला नाही; उलट आत्मनिर्भरतेची वृत्ती वाढली.

तुरुंगात तीव्र विचारमंथन होत होते. गुलामी व शोषणामुळे झालेल्या उत्पादक मजुरांच्या स्थितीबद्दल आमची चर्चा होत असे. समाजात संपत्ती निर्माण करण्यासाठी रक्त आटवणाऱ्यांना दोन वेळच्या खाण्याची भ्रांत असावी आणि थेंबभर घाम न गाळणाऱ्यांनी ऐषआराम करावा, ही स्थिती कधी पालटणार? मनात याचा सारखा विचार चालू असे.

१९४५ मध्ये अशा स्थितीत मी तुरुंगातून बाहेर आलो. सेवाग्रामला पोचलो. तेव्हा गांधीजींची रचनात्मक कार्याचे स्वरूप व भावी दिशा यांबद्दल कार्यकर्त्यांशी चर्चा चालू होती. इंग्रज लवकरच जाणार, या पार्श्वभूमीवर गांधीजी विचार करीत होते. चरखा शोषण-निराकरणाचे आणि अहिंसक समाज-स्थापनेचे साधन व्हावे, नयी तालीमचा विकास व्हावा असे विचार त्यांनी मांडले. समग्र ग्रामसेवेचा कार्यक्रम त्यांनी पुढे ठेवला आणि त्यासाठी श्रमाधारित स्वावलंबी जीवन जगून सात लाख खेड्यांत समग्र ग्रामसेवा करण्यासाठी सात लाख तरुणांची मागणी करणारे आवाहन केले. एका नव्या दर्शनाचे द्वारच गांधीजींनी या गोष्टींद्वारे जणू उघडून दिले.

वर्ग-विषमतेचे निराकरण व्हायला हवे हे सर्व विचारकांना मान्य आहे. वर्गसंघर्षाने ते निराकरण होणार नाही अशी माझी धारणा होती. नव्या क्रांतीच्या वाहकांनी आपल्या पुरुषार्थाने स्वावलंबी बनून श्रमिक वर्गात विलीन व्हावे, या गांधीजींच्या विचाराने एक नवी क्रांतीकारी दिशा दाखवली. वर्गभेदाच्या निराकरणाचा हाच खरा मार्ग आहे हे स्पष्ट झाले.

गांधीजींच्या आवाहनाला प्रतिसाद देणाऱ्या तरुणांचे एक शिबीर सेवाग्रामला चालवण्याचे ठरले. मलाही त्यात बोलावे लागले. त्यात मी शोषणाच्या स्वरूपाचे जे विश्लेषण केले, ते ऐकून अनेकांना आश्चर्य वाटले. 'हुजूर' आणि 'मजूर' हे शब्द त्या शिबिरातच निघाले. मी प्रच्छन्न कम्युनिस्ट झालो आहे असाही काहींनी आरोप केला.

परत आल्यानंतर मी गांधी आश्रमातील माझ्या सहकाऱ्यांशी चर्चा करू लागलो. मी सांगू लागलो की लोकांमध्ये प्रवेश करून शोषण-निराकरणाचा कार्यक्रम जर आपण चालवला नाही तर, इंग्रज गेल्यावरही देशाचे सरकार शोषक वर्गाच्या हाती जाईल आणि ते निहित स्वार्थांचेच रक्षण करील. मग शोषण-निराकरणाचा कार्यक्रम चालवणेही कठीण होईल. इतिहासाचा दाखला आहे की विदेशी सरकार एखाद्या देशातील नागरिकांचे जितके दमन करू शकते, त्यापेक्षा स्वदेशी सरकार आपल्या विरोधकांचे जास्त दमन करू शकते. विदेशी राज्यात देशातील सगळी जनता, मनातून का होईना, विरोधात असते; परंतु स्वदेशी राज्यात सरकारचे संरक्षण प्राप्त असलेला वर्ग त्याच्या दमनकार्यात साथ देतो.

रणीवां आश्रम पोलिसांनी जप्त केला होता. तो परत मिळाला तेव्हा पाहिले की पोलिसांनी तो पूर्ण उद्ध्वस्त केला होता. थोड्याफार इमारती फक्त उभ्या होत्या. त्यांचीच डागडुजी करून आम्ही कामाला सुरुवात केली.

मी सहकाऱ्यांना सांगत असे की जोपर्यंत गावात नेतृत्व-स्वावलंबन आणि व्यवस्था-स्वावलंबन साधणार नाही, तोपर्यंत गाव दुसऱ्यांच्या तोंडाकडेच पाहत राहील. आता याबाबत प्रत्यक्ष प्रयोग करण्याचा अवसर आल्यावर मी त्या दिशेने गांभीर्याने विचार करू लागलो. रणीवां आश्रमाची पूर्ण जबाबदारी स्थानिक लोकांनी घ्यावी असा प्रयत्न मी सुरू केला.

या दरम्यान कॅबिनेट मिशन आले, निवडणुका होऊन पुन्हा काँग्रेस मंत्रीमंडळ उत्तरप्रदेशात सत्तारूढ झाले. मला पुन्हा फैजाबाद जिल्हा विकास समितीचा अध्यक्ष व्हावे लागले. या वेळी सगळे काम सहकारी समित्यांमार्फत करण्याचे मी ठरवले. अशा समित्या स्थापन होऊ लागल्या.

परंतु माझ्या लक्षात आले की या समित्यांमध्ये गावातील सर्व वर्गातील लोक आले नाहीत. ब्रिटिश साम्राज्यवादाचे दलाल राहिलेले लोकच प्रामुख्याने आले. सरकारतर्फे होणाऱ्या सगळ्या कामांवर याच लोकांची पकड आहे आणि तेच आपली स्थिती मजबूत करीत आहेत असे मला दिसले. परिस्थितीचा अधिक सखोल अभ्यास करण्यासाठी मी जिल्ह्यातील ग्रामीण भागात फिरू लागलो. जितका खोल गेलो, तितके मला वाटू लागले की आम्ही सुधारणेची जी काही कामे करीत होतो त्या सगळ्यांमधून गावातील शोषक व अत्याचारी वर्गच मजबूत होत होता. पोलिस व अधिकारी त्याच वर्गातील असल्याने त्यांनाच साथ देतात. त्या स्थितीवर मी अनेकांशी







अनुक्रमणिका

चर्चा करीत असे, परंतु समाधानकारक उत्तर मिळेना. मला वाटे, अजून पक्के स्वराज्य आले नाही, म्हणून अधिकाऱ्यांवर आमचे फारसे नियंत्रण नाही. परंतु नंतर पक्के स्वराज्य आल्यानंतरही परिस्थितीत बदल घडून आला नाही. प्रयत्न पुष्कळ केले, पण सगळे वांझ ठरले.



इंग्रजांच्या राज्यात कॉंग्रेस समित्या गरिबांवरचे अन्याय दूर करण्याचा प्रयत्न करीत असत. परंतु इंग्रज हटल्यावर आम्ही त्यांची जागा घेतली. तेच कर्मचारी, तीच कार्यपद्धती आणि म्हणून तीच परिस्थिती! मी पाहिले की खेड्यांत गरिबांवर अन्याय करणारे आणि नंतर अधिकाऱ्यांशी हातमिळवणी करून आमच्या दमन करणारे लोक आता कॉंग्रेसचे सभासद बनू लागले आहेत. मी पाहिले की आमचे जुन्या सहकाऱ्यांचाही अधिकारप्राप्ती झाल्यानंतर जनतेसोबतचा संपर्क क्षीण होत आहे, लोकांच्या कष्टांबद्दल ते उदासीन होऊ लागले आहेत परिणामी खेड्यांतील जनता असहाय झाली आहे.

सरकारच्या सोबतीने होणाऱ्या ग्रामविकास-कार्यातून मुक्त होण्याचा मी प्रयत्न केला, पण मंत्र्यांनी मला सोडले नाही. होईल तितके मी करीत राहिलो.

परिस्थितीचा मी जसजसा अधिक अभ्यास करू लागलो तसे माझे ठाम मत होऊ लागले की हे स्वराज्य जनतेचे राज्य न होता एका गटाचे राज्य होऊ शकेल आणि तो गट हुकुमशाही प्रस्थापित करू शकेल. भांडवलदार व शोषकांचे संघटन मजबूत होऊ लागले होते; आणि आमचे चांगले-चांगले सहकारी भ्रम, मोह वा लोभाला वश होऊन त्यांच्या जाळ्यात अडकत होते. ही स्थिती पाहून माझे धाबे दणाणले. या स्थितीचा सामना करण्याचे सामर्थ्य माझ्यात कुठले? पळून जाणे हा पलायनवाद ठरला असता. मग काय करावे? काही सुचेना!

एका बाजूला श्रमाचा अभ्यास सुरु होता. दुसरीकडे सहकाऱ्यांसोबत वर्ग परिवर्तनाबद्दल चर्चा होत असे. वर्गपरिवर्तन केवळ श्रम-साधनेद्वारा होऊ शकत नाही; स्वावलंबनाच्या पायावरच होऊ शकते. ते कसे साधाणार याची चिंता संतत असे. आमचे सहकारी या दृष्टीने प्रयत्न-प्रयोग करू लागले. मी त्यांना सांगत असे की तुमची संशोधनपद्धती अशी असावी, ज्यात सगळे लोक सामील होऊ शकतील; त्याशिवाय आमची साधना समाजपरिवर्तनाचे साधन बनू शकणार नाही.

याच सुमारास विनोबांची पदयात्रा मुंगेर जिल्ह्यात आली. खादीग्रामला ते चार दिवस थांबले. प्रादेशिक भूदान समितीच्या कार्यकर्त्यांचे संमेलन तेथे झाले. विनोबांनी पवनारला अनेक दिवस साम्यसोगाची साधना केली होती. मी त्यांच्याशी चर्चा केली. त्यांच्याशी सहमती झाल्याने मला आनंद झाला. विनोबांनी माझ्या सहकाऱ्यांशीही संवाद केला. त्यांनी सांगितले - 'अभ्यास मुख्य वस्तू नाही, विचार मुख्य वस्तू आहे. विचार पक्का असेल तर तो कोणत्या ना कोणत्या प्रकारे अभ्यासाद्वारा शक्तिशाली बनतोच' सर्वांना या चर्चेने खूप प्रेरणा मिळाली.

विनोबा गेल्यानंतर खादीग्राम परिवारासाठी मी दोन गोष्टी सुचवल्या. पहिली गोष्ट, सर्वांची मजुरी समान असावी. दुसरी गोष्ट म्हणजे शरीरश्रम व बौद्धिक श्रमाचे मूल्य समान असावे. भारतात शेतमजुरांची जी कमाल मजुरी आहे ती सगळ्यांनी घ्यायची, असे ठरले.

प्रत्येक कार्यकर्त्याने उत्पादन, व्यवस्था व शिक्षण ही तिन्ही कामे करावी असे ठरले. या सिद्धांतानुसार कार्यकर्त्यांच्या सहचारिणींना तयार करण्यासाठी प्रयत्न झाला. स्त्री-पुरुष दोघांनीही उत्पादक श्रम करावेत, हा नियम पूर्वीपासूनच होता. मातीच्या टोपल्या उचलणे, संडास-सफाई अशी कामे खालची मानली जातात. या कामांवर मी विशेष जोर दिला, वर्गपरिवर्तनाच्या दिशेने हे पहिले पाऊल होते. कार्यकर्त्यांनी मजुरीच्या पैशात निर्वाह करण्याचा प्रयत्न सुरु केला. याचा लाभ म्हणजे स्त्रियांमध्ये आत्मसन्मानाची भावना निर्माण झाली. लवकरच आमच्या सहकाऱ्यांच्या ध्यानात आले की केवळ समान मजुरीने साम्ययोग साधना होऊ शकत नाही. म्हणूनच विनोबा सहभोगावर जोर देतात. मजुरी समान असली तरी कुटुंबातील सदस्यांची संख्या वेगळी असल्यामुळे, तसेच आरोग्य इ. वर कोणाचा जास्त खर्च झाल्याने साम्याची सिद्धी होत नाही. म्हणून मित्रांनी ठरवले की आपला एक परिवार मानायचे. मुले, आरोग्य, विवाह ही सामूहिक जबाबदारी मानायची. संस्थेकडून वर्षाकाठी २८ दिवस सुट्टी मिळत असे. तिचेही एकत्रीकरण करून ती वापरण्याचे त्यांनी ठरवले, व त्यासाठी संस्थेची मंजुरीही मिळवली.

आम्ही जे काही करीत होतो, ते म्हणजे साम्ययोगाच्या दिशेचा शोध तेवढा होता. केवळ स्वावलंबी बनल्यानेही साम्ययोगाची साधना होणार नाही. काही लोकांनी उन्नत साधनांचा वापर करून स्वावलंबन साधले व ते समानरूपाने उत्पादनाचा उपभोग घेऊ लागले. तरी आसपासचे लोक पुरेशा साधनांआभावी खालच्या स्तराचे जीवन जगत असतील तर तो साम्ययोग होणार नाही.

खादीग्रामच्या प्रयोगाने अनेकांना आकृष्ट केले, प्रेरणा दिली. आमचे मित्र, मिळालेल्या थोड्याशा यशानेही संतुष्ट होते. १९५४ -५५ मध्ये हा मार्गशोध चालला. प्रयोगातून नवे सुचत गेले आणि त्यानुसार आम्ही कार्यक्रमातही बदल करीत गेलो.

१९५४ मध्ये मी सर्वसेवा संघाचा अध्यक्ष बनलो, तेव्हापासून खादीग्राम कार्यकर्त्यांचे प्रशिक्षण केंद्र बनले.

त्या भागात पाण्याची समस्या गंभीर होती. पाण्याची नीट व्यवस्था झाल्याशिवाय त्या क्षेत्राची आर्थिक स्थिती सुधारणार नाही, हे लक्षात आले. प्रथम सरकारी विकास योजनांची मदत घेण्याचा प्रयत्न केला. पण खालच्या कर्मचाऱ्यापासून घाटण्यापर्यंत धावपळ करूनही काही परिणाम झाला नाही. सरकार व काँग्रेसच्या विरोधामुळे स्थानिक कर्मचारी हतबल होते. सरकारच्या असहकारामुळे आमच्या कामाला मदतच झाली, कारण आम्ही मग लोकशक्ती संघटित करण्याचा विचार करू लागलो. १९५४ मध्ये आम्ही 'पाणी संमेलना'चे आयोजन केले. लोकांना हे नावही नवे होते. अशाप्रकारचे संमेलन पूर्वी कधीच झाले नव्हते. लोकांना श्रमशक्तीद्वारा पाण्याची व्यवस्था कशी करता येईल, याचा विचार संमेलनात झाला. पंधरा हजार लोकांनी संमेलनात भाग घेतला.

देशाचे पुढारी जनतेला आवाहन करीत असतात की त्यांनी सरकारी योजनांना सहकार्य करावे, म्हणजे योजना सरकारची आणि सहकार्य लोकांनी करायचे! ही का लोकशाहीची भाषा झाली? योजना लोकांची असली पाहिजे; मदत सरकारने केली पाहिजे. म्हणून, लोकांच्या जागृत पुरुषार्थाला साथ देऊन सरकारने पाण्याची व्यवस्था करावी, असे म्हणण्याची वेळ आली आहे असे मला वाटले. मी पाटण्याला गेलो आणि त्यावेळचे अर्थमंत्री अनुग्रहबाबू यांना भेटलो. मला वाटले की त्यांना भेटल्याने काम होईल.

चर्चेत ते जे बोलले ते लोकशाहीच्या संदर्भात अत्यंत धोकादायक होते. ते म्हणाले, "असे आहे धीरेनभाई, राजकारण अशी गोष्ट आहे, जी देशात विधायक काम होऊ देत नाही, तर एका पार्टीतही वेगवेगळे गट आहेत. ही पार्टीबाजी आम्हा लोकांना इतके गुंतवून ठेवते की आम्ही खरी मदत करू शकत नाही."

मी म्हणालो, "पण आम्ही तर कोणत्याही पार्टीत नाही."

ते म्हणाले, "तेवढ्याने काय झाले? तुम्ही आमच्या पार्टीत नाही ना? एवढे पुरेसे आहे."

हे बोलताना त्यांच्या चेहऱ्यावर दुःखाची छाया होती. मात्र पार्टीत असल्यामुळे ते अगतिक होते.

आमचा उद्देश काही शेतीसाठी पाण्याची व्यवस्था करणे हा नव्हता. ती तर केवळ मार्गातली एक अडचण होती. म्हणून आता ती समस्या सुटण्यासाठी समझोता केला तर स्वतंत्र लोकशक्ती संघटित करण्याच्या उद्देशापासून बहकत जाऊ, असा मी विचार केला. स्थानिक पुरुषार्थाच्या आधारावरच पुढे जाण्याचा प्रयत्न आम्ही सुरू केला.



याच सुमारास जवळच्या पेंगही गावात जमीनदारांनी दलितांना जमिनीवरून बेदखल करण्याचे प्रकरण घडले. आम्ही हा प्रश्न हाती घेतला. जमीनमालक, पोलिस अधिकारी, पुढारी - सगळे गरीब मुसहरांविरुद्ध एकत्र आले. आम्ही भूदान-ग्रामदानवाले या भागात अशांतता आणि बंडाळी पसरवीत आहोत, अशा प्रकारची कागदपत्रेही बनवण्यात येऊ लागली. पोलिसांनी फौजदारी केस करून अकरा मुसहर आणि आमच्या एका सहकाऱ्याला अटक केली. सर्व सेवा संघाला सर्व माहिती देण्यात आली. बेदखलीच्या प्रश्नावर सर्वसेवा संघाचे धोरण काय असावे याची चर्चा झाली. शेवटी ठरले की आज कोर्टाच्या बहिष्काराचे आंदोलन आपल्याला करायचे नाही आणि कायदेशीर कारवाईमध्ये अडकायचे नाही. तेव्हा प्रत्येक प्रकरणाचा स्वतंत्र विचार करून निर्णय घेण्यात यावा. सर्वसेवा संघाकडून अशा रीतीने स्पष्ट मार्गदर्शन मिळू शकले नाही. विनोबांशीही चर्चा करण्यात आली. त्यांनी सुचवले की खटला लढू नये; निवेदन देऊन

सर्वांनी तुरुंगात जावे.

मला हाच मार्ग योग्य वाटला. आम्ही समाजाला नैतिक स्तरावर उभे करू इच्छितो; दंडशक्तीच्या आधारावर नव्हे. विनोबांचा सल्ला व्यावहारिक आणि नैतिक - दोन्ही दृष्टींनी मला योग्य वाटला.

परंतु जयप्रकाशजी व अन्य नेत्यांचे मत पडले की असे करणे राष्ट्रीय सरकारला अडचणीत आणल्यासारखे होईल. खादीग्रामच्या साथींना हे पसंत पडले नाही, तरीही ते त्यांनी मान्य केले. खटला चालला.

मी पाहिले की स्वराज्य मिळाल्यानंतर गरिबांना काँग्रेसचा आधार राहिलेला नाही. गरिबांचे दमन व शोषण वाढले आहे. गरीब अधिक भयभीत झाले आहेत. माझे पक्के मत झाले की सध्याच्या शासनपद्धतीत गरिबांना न्याय मिळणे कठीण आहे.

बेदखलीच्या घटना अनेक ठिकाणी घडत होत्या, मी त्या संदर्भात बिहारमध्ये अनेक ठिकाणी गेलो. भूदन समित्यांना बेदखलीविरुद्ध प्रयत्न करायला सांगितले.

शासनमुक्तसमाजाबद्दल आम्ही बोलतो तेव्हा लोकांना भीती वाटते की यामुळे गरीब दडपले जातील. ही अगदी उलटी गोष्ट आहे. संघटित सैन्य व पोलिस यांच्याद्वारा गरिबांचा छळ होऊ देण्याऐवजी त्यांना स्वतंत्रपणे त्यांचा मुकाबला करू दिला तर ते अधिक चांगल्या प्रकारे तो करू शकतील. गांधीजींनी इंग्रजांना भारत सोडायला सांगितले होते तेव्हा म्हटले होते की सत्ता सोपवायला योग्य व्यक्ती वा संस्था त्यांना सापडली नाही तर त्यांनी भारताला अराजकतेच्या हवाली करून निघून जावे; कारण संघटित लूट असंघटित लुटीपेक्षा अधिक भयानक असते.

आम्ही तुरुंगात होतो तेव्हा कैद्यांना कांबळ्यांमध्ये लपेटून मारण्याचा प्रघात होता, जेणेकरून त्याला ओरडता येणार नाही आणि शरीरावर माराच्या खुणा दिसणार नाहीत. आज गरिबांनाही कायद्यांच्या कांबळ्यात लपेटून मारले जात आहे. कायद्यांनी सत्तेची पकडच मजबूत होत असते. अन्याय-अत्याचार करणाऱ्यांचेच नातलग लोकप्रतिनिधी असतात. पोलिस आणि मॅजिस्ट्रेट असतात. त्यांचे निहित स्वार्थ प्रभावी होणारच.

पेंगही प्रकरणी आंदोलन फार चालले नाही. परंतु त्याचा परिणाम चांगला झाला. बिहारमध्ये अनेक ठिकाणी भूदान कार्यकर्त्यांनी बेदखलीविरुद्ध आंदोलन केले. फार पुढे जाता आले नाही, पण लोकजागृती झाली.

☑☑

त्या सुमारास खादीग्राममध्ये सुमारे शंभर मजूर मजुरीसाठी येत असत. त्यांच्या शिक्षणाची योजना माझ्या डोक्यात होतीच. नरेंद्रच्या रूपाने त्यासाठी उपयुक्त व्यक्ती मिळाल्यावर रोज संध्याकाळी मजुरांना एक तास शिकवण्याचा कार्यक्रम सुरू झाला.

एक दिवस नरेंद्र म्हणाला, "हे लोक तर मजुरीसाठी येतात. त्यांना शिकवण्यात काही अर्थ नाही. शिकण्यात त्यांना रस नाही. आपण त्याऐवजी खादीग्राममध्ये विद्यार्थ्यांना प्रवेश देऊन त्यांना स्वावलंबनासाठी काम का देऊ नये?" मला जणू नवा रस्ता सापडला. बराच विचार केल्यानंतर मी जाहीर केले की २ ऑक्टोबर १९५५ पासून खादीग्रामला कोणीही मजुरीसाठी येणार नाही. सगळे विद्यार्थी व शिक्षकच राहतील.

श्रमभारतीचा प्रयोग सुरु झाला.

त्या प्रयोगातून पुष्कळ शिकायला मिळाले. परंतु त्या प्रयोगात पुढे गतिरोध निर्माण झाल्याचे मला जाणवू लागले. अनेक सहकारी खादीग्राम सोडून जाऊ लागले होते. बऱ्याच विचारांती माझा निर्णय झाला की खादीग्रामच्या लोकांना आंदोलनाचे वाहक बनायचे असेल तर त्यांना गावागावात पसरावे लागेल आणि जनतेत विलीन होऊन तिच्यामार्फत आंदोलन चालवावे लागेल. ग्रामशाळेत याचे विधायक स्वरूप असेल. हा विचार मी सहकाऱ्यांसमोर मांडूही लागलो.

विनोबांच्या ओरिसा-यात्रेपूर्वी मी ओरिसात फिरावे असा आग्रह गोपबंधू चौधरींनी केला. त्यांच्या आग्रहाने मी ओरिसात फिरलो. ऑगस्ट १९५४ ते ऑगस्ट १९५५ दरम्यान संपूर्ण देशाचा प्रवास घडला. आपल्या भाषणांमध्ये मी श्रमाधारित जीवनपद्धती व नयी तालीमवर सर्वाधिक जोर देत असे. याशिवाय आम्हाला अभिप्रेत क्रांती पुढे जाणार नाही, असा पक्का विश्वास माझ्या मनात निर्माण झाला होता. कार्यकर्त्यांमध्ये यामुळे खळबळ माजणे स्वाभाविक होते. लोक मला असेही सुचवू लागले की श्रमसाधनेचा प्रचार करू नये. त्यामुळे कार्यकर्ते बिचकतील. विनोबांपर्यंत हा विषय गेला. मी

विनोबांना विचारले, "स्पष्ट सांगा की माझे विचार सांगणे मी चालू ठेवू का बंद करू?" विनोबा हसून म्हणाले, "जरूर चालू ठेवा. परंतु अशा पद्धतीने विचार सांगत जा की श्रमाचा अभ्यास न करू शकणाऱ्यांवर प्रतिकूल परिणाम होणार नाही." मी म्हटले, "परंतु भाषा तर माझीच राहील ना?" विनोबा यावर हसले.

देशभराच्या या दौऱ्याने मला एक नवी स्फूर्ती मिळाली. माझी खात्री झाली की आंदोलनाला आता पुढे न्यायचे असेल तर तंत्र व निधीच्या मर्यादांतून बाहेर यावे लागेल. हा विचारही मी मांडू लागलो आणि कार्यकर्ते यामुळेही नाराज होऊ लागले. मात्र अनेक तरुण तंत्रमुक्त व निधीमुक्त राहून काम करण्यासाठी तयारही होऊ लागले.

विनोबांच्या मनातही हा विचार राहिलाच असणार. १९५६ च्या कांचीपुरम् संमेलनात त्यांनी आवाहन केले की आंदोलन तंत्रमुक्त आणि निधिमुक्त करून जनतेच्या हाती सोपवून द्यावे. पळणीच्या सर्व सेवा संघ बैठकीत तंत्रमुक्ती व निधीमुक्तीचा ठराव पारित झाला.

१९५७ मध्ये भूमिक्रांतीचे आवाहन झाले. माझ्या मनात निधिमुक्तीचा विचार बऱ्याच दिवसांपासून घोळत होताच. १९५७ या वर्षात श्रमभारतीच्या सदस्यांनी संचित निधीचा आधार सोडून जिल्हाभर पदयात्रा करीत राहावी असा विचार मांडला. २४ फेब्रुवारीला सगळे साथी पदयात्रेने निघाले. १९५८ च्या १ जानेवारीला ते परतले. खादीग्रामचे काम मध्यंतरी साहजिकच विस्कळीत झाले.

निधिमुक्ती ठरावामुळे श्रमभारतीपुढे स्वावलंबन किंवा सर्वजनाधार हे दोनच पर्याय होते. दोन्ही शक्य झाले नाहीत तर दुसऱ्या एखाद्या संस्थेला ती सोपवणे हा तिसरा पर्याय होता. आमचे क्षेत्र अत्यंत गरीब आदिवासींचे क्षेत्र असल्यामुळे सर्वजनाधाराची कल्पनाही करता येण्यासारखी नव्हती. आणि खडकाळ जमिनीत एवढ्या मोठ्या प्रमाणावर स्वावलंबन साधणेही शक्य नव्हते. शेवटी आम्ही ठरवले की काम विकेंद्रित करायचे आणि खादीग्रामला कृषी व उद्योग - प्रशिक्षण केंद्र बनवून बिहार खादीग्रामोद्योग संघाला सोपवायचे.

माझी वयाची ६० वर्षे पूर्ण झाली होती. आता संस्थागत जबाबदाऱ्यांमधून मुक्त होऊन, संस्थांच्या मर्यादित चौकटी ओलांडून सर्वजनाधाराचा प्रयोग करण्याचा मी निर्णय घेतला.

☑☑

६ एप्रिल १९६० रोजी बलिया (जि. पूर्णिया, बिहार) गावात मी प्रवेश केला. नरेंद्र आणि त्याची पत्नी विद्याही माझ्या प्रयोगात सामील होण्यासाठी आले. सर्वजनाधाराचा प्रयोग करण्याचे मी ठरवले तेव्हापासून नरेंद्र मला कार्यक्रमाबद्दल विचारत असे. मी सांगत असे की स्वावलंबी समाजरचनेच्या दृष्टीने, एखादा कार्यक्रम घेऊन क्षेत्रात जाणे ही योग्य पद्धती नाही. कारण, कार्यक्रमाची चिंता कार्यकर्त्याला योग्य दिशेने नेण्याऐवजी त्याची दिशाभूल करते. गावात काय करायचे, याचा अंदाज गावाचा अभ्यास केल्याशिवाय येऊ शकत नाही. दुसरी गोष्ट म्हणजे, कार्यक्रम कार्यकर्त्यांसाठी नसतो, गावकऱ्यांसाठी असतो; म्हणून त्यांची मनःस्थिती आणि परिस्थिती पाहून कार्यक्रम ठरवला पाहिजे. सुरुवातीला गावात राहणे, सर्वांशी प्रेमाने वागणे आणि परिश्रमी जीवन जगणे पुरेसे आहे. कार्यकर्ते गावात जातात तेव्हा कार्यक्रमांचे आयोजन व व्यवस्थेची जबाबदारी आपल्यावर असल्याचे मानतात. जनाधाराचा विचार केला तरी, आपला निर्वाह जनाधारावर चालावा एवढेच मानतात. परंतु आंदोलन एवढ्याने जनाधारित होत नाही. कार्यही जनाधारित असले पाहिजे. विचारानुसार गावकऱ्यांनी मिळून कार्यक्रम बनवावा; कार्यकर्त्यांचा सल्ला घ्यावा असे झाले पाहिजे.

गावात जाण्यापूर्वी मी एक अट अशी घातली होती की गावातल्या सर्व लोकांनी मिळून एखादे काम सामूहिक व सहकारी पुरुषार्थाने केले पाहिजे. त्यानुसार लोकांनी साठ एकराचा एक प्लॉट सामूहिक शेतीसाठी ठेवला होता. यात मालक-मजूर संबंध राहणार नाही. उत्पादनासाठी दोन गोष्टी लागतात - जमीन आणि मेहनत. गावात काही लोकांपाशी जमीन आहे तर काही लोकांपाशी मेहनत. तेव्हा दोघेही मालक झाले. मालकांच्या सहकार्यातून शेती होईल. वाटप करताना, मेहनतीच्या मालकाला ६०%, जमिनीच्या मालकाला ३०% वाटा द्यायचा व १०% भाग जमिनीच्या सुधारणेसाठी राखून ठेवायचा असे ठरले. ही सहकारी शेती नसून समाज बनवण्याचा प्रयोग होता.

सर्वजन-आधाराचा अर्थ असा आहे की क्षेत्रातील

अनुक्रमणिका

लोकांनी लोकसेवकाचे लक्ष्य समजून घ्यावे, समाजाला त्याची आवश्यकता आहे हे त्यांच्या मनात ठसावे आणि जीवनातला नियमित कार्यक्रम म्हणून सर्वोदयपात्र किंवा संपत्तिदान यांचा त्यांनी अंगीकार करावा.

देणग्या गोळा करून संस्था चालविणे, कार्यकर्त्यांच्या निर्वाहाची व्यवस्था करणे, या गोष्टी नव्या नाहीत. यातून क्रांतीचा जन्म होणार नाही. तो कसा होईल? तो तेव्हा होईल, जेव्हा लोकांच्या लक्षात येईल की आजचा संघर्ष सैनिक-शक्ती आणि लोकशक्ती यांच्यामधे आहे. लोकशक्ती जर विजयी व्हायची असेल तर तिचे काम सैनिकशक्तीच्या आधारावर चालू शकत नाही. म्हणून, ज्यांनी सैनिक शक्तीचे निराकरण करावयाचे ठरवले आहे, त्यांच्या निर्वाहाची काळजी घेतली पाहिजे या भावनेतून लोकांनी द्यावे. ती भिक्षा नसून जीवन-दीक्षा असेल.

म्हणून मी गावकऱ्यांना सांगितले की ग्राम-लक्ष्मीच्या निर्मितीसाठी त्यांनी मणामागे शेर (एक चाळीसांश) धान्य आणि अन्य उत्पादनातून रुपयामागे एक पैसा जमा करावा, आणि यातून लोकसेवकांसाठी सहावा हिस्सा काढावा.

अडचण ही होती की लोकांना समजत नव्हते की या लोकांच्या मोठ्या संस्था आहेत, त्या बाहेरून पैसा आणून क्षेत्रात मोठमोठी विकासाची कामे करतात, पगारी कार्यकर्ते नेमतात, मग या लोकांचा (धीरेंद्रभाई व त्यांचे सहकारी) निर्वाह त्या का चालवू शकत नाहीत? लोकांना सर्वजनाधाराचे तत्त्व समजावे यासाठी आम्ही उपाशी राहण्यापर्यंत वेळ यावी लागली. यामुळे लोकांमध्ये खळबळ माजली.

कार्यकर्त्याला मुख्यत: पाच प्रकारचे आधार असू शकतात -

१. एखाद्या केंद्रीय निधीचा आधार
२. संपत्तिदान किंवा तात्कालिक दान
३. सर्वजनाधार
४. श्रम-आधार
५. आत्माधार

केंद्रीय निधी म्हणजे सरकारी पैसा किंवा गैरसरकारी ट्रस्ट वा फंड. गैरसरकारी निधी तर गांधीस्मारक निधीनंतर आता मोठ्या प्रमाणावर गोळा होणे कठीण दिसते. बाकी जे ट्रस्ट आहेत, त्यांचे आमच्याशी जुळत नाही. कुमारप्पाजी नेहमी म्हणत की प्रत्येक गोष्टींचे काही सहचारी भाव असतात. सरकारी पैशाच्या आधारावर, पगारी कार्यकर्त्यांद्वारा काम केले तर फलित काय निघणार? दंडशक्तीहून भिन्न, हिंसाशक्तीच्या विरोधी, स्वतंत्र लोकशाहीचे अधिष्ठान त्याने होईल का?

दानाच्या आधारावर असलेले कार्यकर्ते लोक-शक्तीनिर्मितीचे काम करू शकतील का हाही प्रश्नच आहे, कारण त्यांचे वेतन कोठून येते हे लोकांच्या डोळ्यांसमोर तर नसेल. व्यावहारिक दृष्टीनेही हे संभवनीय वाटत नाही. सर्वजनाधाराबाबत कार्यकर्त्यांमध्ये हिंमत नाही, आणि हिंमत झाली तरी लोकांमध्ये त्याबाबत चेतना नाही, त्या चेतनेच्या निर्मितीसाठी विशेष पुरुषार्थ करावा लागेल. शरीरश्रमाद्वारे स्वावलंबी होऊन लोकसेवा करणेही अत्यंत कठीण आहे. मध्यमवर्गातून असे कार्यकर्ते क्वचितच निघू शकतील.

आत्माधार म्हणजे आपल्या मित्रांच्या आर्थिक मदतीवर निर्वाह करणे. हे थोड्याच कार्यकर्त्यांना शक्य होईल. स्वाभाविकपणे ते मध्यमवर्गातील कार्यकर्तेच असतील. यातून एक मूलभूत प्रश्न हाही निर्माण होतो की मध्यमवर्गाच्या सेवकत्वातून सर्वोदयाची – अंत्योदयाची क्रांती होईल का?

याबाबत सतत विचार करून मी या निष्कर्षाला पोचलो आहे की आमच्या क्रांतीसाठी गांधीजींनी त्या सात लाख तरुणांची अपेक्षा केली होती, त्यांनी आपले श्रम व लोकांचे प्रेम यांच्या आधारावर गावागावात बसणेच व्यावहारिक आहे. अर्थात श्रम व जनाधाराच्या मार्गाचाच शोध घेतला पाहिजे. आणि लोकांकडून जे घ्यायचे ते शक्यतो श्रमदानाच्या रूपातच घ्यायला हवे.



बलियाला येण्यापूर्वी मी स्वत: त्या भागात फिरून लोकमानसाचा अभ्यास केला नव्हता. ही चूक होती.

उत्तरप्रदेशच्या साथींची इच्छा मी तेथे जावे अशी होती. बरनपूर गावी बसण्याचा योग त्यातून जुळून आला. मी त्यापूर्वी काही अटी ठेवल्या होत्या - लोकांनी कार्यकर्ता परिवारासाठी साडे बिघे (साडेसदतीस एकर) जमीन दान द्यावी. त्यावर सामूहिक शेती करावी, नियमित श्रमदान करावे इ. कस्तुरबा ट्रस्टतर्फे ग्रामसेवा केंद्र व आरोग्य केंद्र चालत होते. तेही बंद करण्यास मी सांगितले. काही काळ तरी संचित निधी-






आधारित संस्थेचे काम बंद व्हावे, तरच गावाचं चिंतन एकाच दिशेने चालेल, असा त्यामागे विचार होता. गावकऱ्यांनी उत्साहाने सगळ्या अटी मान्य केल्या आणि १९६१ च्या अखेरीला बरनपूर ग्रामभारती केंद्र सुरू झाले.

बरनपूर अत्यंत मागासलेले क्षेत्र होते. सर्वोदया-बद्दल लोकांनी फारसे काही ऐकले नव्हते. लोकांनी माझे तर नावही ऐकले नव्हते.

क्षेत्र परिचयासाठी प्रथम पदयात्रा केली. त्यावेळी तीव्र थंडीची लाट होती. पदयात्रा करणे म्हणजे एक तपश्चर्या होती. याचाही लोकांच्या मनावर प्रभाव पडला. १० मार्च ते ८ एप्रिल १९६२ या काळात कटाई-यात्रा करण्यात आली. यातून जनाधाराचा मार्ग मोकळा झाला.

जून १९६२ पासून पाच नव्या सहकाऱ्यांनी स्वावलंबनाच्या साधनेचा श्रीगणेशा केला. ऑगस्ट १९६१ पासूनच काहीजण या भागात फिरू लागले होते. त्यावेळी त्यांच्या जेवणाची व्यवस्था गावकरी आपापल्या घरी करीत. पुढे एप्रिलमध्ये मी गावकऱ्यांना सांगितले की आमची वेगळी व्यवस्था करा. तेव्हा त्यांनी काही धान्य गोळा करून दिले. आमचे सहकारी ते धान्य शिजवून वरण-भाजीशिवायच खात व मस्तीत आपले काम करीत. लोक तर ते पाहून असेही म्हणत - "ह्यांना खाण्यापिण्याची भ्रांत असावी, म्हणून येथे आलेत." अशा रीतीने लोक आम्हाला समजून घेण्याचा प्रयत्न करीत होते आणि आम्ही लोकांना समजून घेण्याचा प्रयत्न करीत होतो.

लोकांनी दान दिलेल्या जमिनीवर आम्ही शेती करू लागलो. आमच्या सहकाऱ्यांना शेतीचा फारसा अनुभव नव्हता. जमीनही नवी होती. आम्ही शेती करू शकू यावर स्थानिक लोकांचा विश्वासही नव्हता. उभे पीक पाहून मात्र लोकांचे मत बदलले. आधी आम्हाला हसणारे शेतकरी येऊन चर्चा करू लागले. आमचा स्वावलंबनाचा प्रयत्न अशा रीतीने व्यापक लोकशिक्षणाचे माध्यम बनला.

लोकांशी परिचय, संपर्क हळूहळू वाढू लागला. दोन वर्षात लोकांना सर्वोदय-विचाराचा चांगला परिचय झाला.

बरनपूर जिल्हा सर्वोदय मंडळातर्फे एक शिबीर घेण्यात आले, त्यात आलेल्या मित्रांनी आमच्या सहकाऱ्यांशी चर्चा केली. त्यातून भूमिसेना दल स्थापन करण्याचे ठरले. असे ठरले की सुरुवातीलाच कार्यक्रमाचा विचार करू नये. महिन्यातून एकदा सर्वांनी एकत्र यावे व प्रश्नांची चर्चा करावी. सदस्यांचे रजिस्टर, पदाधिकारी असे काही राहणार नाही असे ठरले.

भूमिसेनेच्या बैठकांमध्ये शेतीविषयक प्रश्नांची चांगली चर्चा होऊ लागली. 'संघटन अहिंसेची कसोटी आहे' असे गांधीजींनी म्हटले होते. भूमिसेना हा तंत्रमुक्त संघटनाचा प्रयोग होता. चर्चा, चिंतन, सह-अध्ययन हीच त्याची प्रक्रिया होती. अशा प्रक्रियेतून एक वैचारिक बिरादरी तायर होते. जिचा कार्यक्रम सहजपणे नियोजित होतो.

स्वावलंबन साधू पाहणाऱ्या कार्यकर्त्याला सेवेसाठी फुरसत मिळणार नाही ही शंका बरनपूरच्या प्रयोगाने चुकीची ठरली.

मनुष्याचे चिंतन नेहमी बहुमुखी असते. तो कोणत्या ना कोणत्या कामात गुंतलेला असेल तर त्याचे चिंतन वेगवेगळ्या दिशांना जाते. मात्र तो कोणतेही काम करीत नसेल, केवळ चिंतन करीत असेल तर तो पुढे शब्दांच्या जाळ्यात अडकतो. क्रांतिविचाराच्या अभ्यासाच्या कार्यक्रमात तो गुंतलेला असेल आणि त्यासोबतच क्रांती विचाराचे चिंतन करीत असेल तर त्याचे चिंतन क्रांतिकारी होऊ शकेल.

आम्हाला शोषणमुक्त समाज स्थापन करायचा असेल तर वर्गपरिवर्तनाची साधना हाच आमच्यासाठी क्रांतिकारी कार्यक्रम असू शकतो. त्यासोबतच शिक्षण-प्रक्रियेत समाज-सेवा हा आमच्यासाठी क्रांतिकारी कार्यक्रम आहे. जे कार्यकर्ते केवळ उदरनिर्वाहासाठी नव्हे, तर क्रांती-भावनेने स्वावलंबी जीवनाची साधना करतील, त्यांच्यासाठी ते स्वावलंबनच क्रांती-प्रक्रियेचे साधन बनेल.

स्वराज्यानंतर सरकारी व गैरसरकारी लोकसेवकां-बद्दल लोकांना आदर राहिलेला नाही. सरकारी तंत्र, पक्ष किंवा परदेशी संस्थांशी संबद्ध कार्यकर्त्यांचा काही दबदबा असू शकतो, कारण ते लोकांना काही आणून देऊ शकतात. पण आमच्यासारख्यांना कोण विचारणार?

अशा परिस्थितीत, सर्वोदय क्रांती करू पाहणारे काही ठोस आधारावर समाज-परिवर्तन करू इच्छितात, असे दर्शन लोकांना झाले पाहिजे. केवळ प्रचाराने हे होणार नाही. सेवकांनी शेतकऱ्यांप्रमाणे स्वतंत्र जबाबदारी घेऊन त्या माध्यमाने लोकशिक्षण करून त्यामार्फत क्रांतीचा मार्ग प्रशस्त

अनुक्रमणिका

करायला हवा. बरनपूरची भूमिका हीच होती.

आज खेड्यांतून योग्य तरुण शहरांकडे जांत आहेत. गावात त्यामुळे नेतृत्वाचा विकास होत नाही. जोपर्यंत गावात राहून स्वतंत्र पुरुषार्थाद्वारे समाधानकारक आर्थिक व सांस्कृतिक जीवनाची संभावना प्रकट होत नाही, तोपर्यंत लोक गावात थांबणार नाहीत. अशीच परिस्थिती राहिली तर लोकशाहीचा पाया ठिसूळ होईल. म्हणून प्रतिभावान तरुणांनी लोकांमध्ये मिसळून लोकशक्तीचा विकास करावा व शहरांकडे जाणारा प्रवाह अडवावा. असा माझा प्रयत्न राहिला आहे. श्रम व श्रमिक यांना सामाजिक प्रतिष्ठा प्राप्त झाली तरच असे होऊ शकेल.

अत्यंत व्यस्तता असल्यामुळे आणि मुलाबाळांच्या शिक्षणाची व्यवस्था नसल्यामुळे कार्यकर्त्यांच्या मनात शंका डोकावणे स्वाभाविक होते. विचार-प्रचार, लोकसंपर्क, आंदोलन याबद्दलच्या मान्य कल्पना व धारणांचा प्रभाव त्यांच्यावर पडत होता. त्यांचे अन्य साथी त्यांना म्हणत की तुम्ही क्रांतीसाठी काहीच करीत नाही, केवळ आपले पोट भरताहात. देशात कोट्यवधी स्वावलंबी शेतकरी आहेत, तरीही क्रांती होत नाही. आणखी चारचौघांची त्यात भर पडल्याने काय होणार? या शंकांमुळे आमच्या सहकाऱ्यांची निष्ठा डळमळीत होत असे.

मला वाटते, हा समग्र चिंतनाच्या अभावाचा परिणाम होता. एकदा याबाबत कृपलानीजींशीही चर्चा झाली. ते विचार करून म्हणाले - "शिकल्या-सवरलेल्या लोकांनी विचारपूर्वक स्वतः आदर्श शेती करावी, अधिक उत्पादन मिळवावे व स्वावलंबी व्हावे - हे कामच प्रभावशाली आहे. सेवेसाठी आणखी वेगळा वेळ काढण्याची जरूरी नाही."

माझेही मत असेच होते. पण सहकाऱ्यांचे असमाधान कायम राहिले. परिणामी काही जण व्यापक कामासाठी निघून गेले. त्यामुळे थोडे निराशेचे वातावरणही निर्माण झाले. शेतीत मजुरांचा उपयोगही करावा लागला. तरीही उत्पादन त्या भागातील सरासरीच्या दुप्पट आले. शेतीबद्दलचा लोकांचा उत्साह त्यामुळे वाढला.

भूमिसेनेचे कामही वाढू लागले. लोकसंपर्कही वाढला. स्वावलंबी होऊ पाहणाऱ्या कार्यकर्त्यांपाशी विचारप्रचारासाठी वेळ राहणार नाही या शंकेलाही उत्तर मिळाले. खरे महणजे, लोकशिक्षणाची पहिली अट आहे व्यापक जिज्ञासा; आणि आमच्या कामाबद्दल लोकांना जोपर्यंत रुची वाटणार नाही तोपर्यंत त्यांच्यात जिज्ञासा निर्माण होणार नाही.



१९६५ मध्ये सर्वसेवा संघ अधिवेशनाचे वेळी विनोबाजींनी बिहारच्या साथींना म्हटले- "तुम्ही आपल्या प्रदेशात ग्रामदानाचे वादळ (तुफान) निर्माण करू शकत असाल आणि सहा महिन्यांत दहा हजार ग्रामदाने मिळवण्याचा संकल्प करीत असाल तर मी वाहनाचा उपयोग करूनही बिहारचा दौरा करण्यास तयार आहे." कार्यकर्त्यांच्या डोक्यात जणू वीज चमकली. माझ्या मनातही अत्यंत उत्साह संचारला. विनोबाजींची ग्रामदान तुफान यात्रा सुरु झाली तेव्हा माझे चिंतनही त्या दिशेने सुरु झाले.

फेब्रुवारी १९६७ मध्ये बिहारमध्ये दरभंगा जिल्ह्याचे जिल्हादान झाले आणि एक नवी संभावना प्रकट झाली विनोबाजींनी आदेश दिला की मी पूर्ण वेळ दरभंग्यात काम करावे. त्यानुसार मी मधुबनी केंद्रात कार्यकर्ता स्वावलंबन व कृषिग्रामोद्योगच्या प्रयोगांद्वारा कार्यकर्ता-प्रशिक्षण व लोकशिक्षणाचे काम सुरु केले. दौरे चालूच होते.

विनोबाजींची ग्रामदान-तुफान यात्रा बनपूरला येणार होती. त्यावेळपर्यंत किमान ५ ग्रामदाने व्हावीत असे मी सुचवले. स्थानिक लोकांनीच पुढे यावे आणि कार्यकर्त्यांची केवळ शंका-समाधान करण्यापुरती भूमिका असावी, अशा आमची योजना होती. २०-२५ दिवसांच्या प्रयत्नांनी १५ ग्रामदानांची घोषणा झाली.

आमच्या मित्रांना यामुळे आश्चर्य वाटले. मी त्यांना म्हटले की तीन वर्षांपूर्वी जेथील लोकांनी सर्वोदयाचे नावही ऐकले नव्हते, तेथे तीन वर्षांपूर्वी पदयात्रा करताना अनेक गावांत मला थाराही मिळाला नव्हता, तेथे तीन वर्षात अशी परिस्थिती निर्माण झाली की २०-२५ दिवसांत १५ ग्रामदाने झाली. तेव्हा कार्यकर्ते केवळ पोट भरत होते की क्रांती करीत होते हे तुम्हीच ठरवा. स्वावलंबी लोकसेवक स्वावलंबन साधत क्रांतीचे पौरोहित्य करु शकतो; हे जुन्या सहकाऱ्यांना तर पटेलच. बाकीचे साथीही पुनर्विचार करु लागले.

तुफान आंदोलनात शक्ती लावावी व बरनपूरचा

प्रयोग स्थगित ठेवावा असे बरनपूरच्या कार्यकर्त्यांनी ठरवले. विनोबांचेही असेच मत पडले. कार्यकर्ते तुफान आंदोलनात लागले. मात्र क्षेत्रात शेती व भूमिसेनेच्या माध्यमाने काम सुरू राहिले.

या दरम्यान एक घटना घडली. तीव्र दुष्काळाची स्थिती असूनही सिंचन विभागाने कालव्यांत पाणी सोडायला नकार दिला. धानाची शेते सुकू लागली. अर्ज-विनंत्यांचा काही परिणाम झाला नाही. शेवटी शेतकऱ्यांनी एक मोठी सभा बोलावली. उपोषण, घेराव इ. अनेक सूचना आल्या. शेवटी सर्वांनी मिळवून ठरवले की तीन दिवसांनी धरणाचे नियंत्रण आपल्या हाती घ्यायचे. तेथील कर्मचाऱ्यांना सुट्टी द्यायची आणि कालव्यांत पाणी सोडायचे. तयारी सुरू झाली. शेवटी सिंचन विभागाने पाणी सोडले. शेतकऱ्यांच्या सामूहिक शक्तीचा विजय झाला. पुढे बरनपूर प्रयोगाची मर्यादा आली. बिहारमध्ये जास्त वेळ जाऊ लागला. शेवटी सप्टेंबर १९६८ मध्ये बरनपूरचे काम गांधी निधीवर सोपवून आम्ही मुक्त झालो.



दुर्दैवाने बिहार आंदोलनाच्या मुद्द्यावर सर्वोदयातील साथी दोन तुकड्यांत विभागले गेले. मला याचे दुःख होत असे. मतभेदातून मनभेद निर्माण झाले एवढेच नाही, तर बिहार आंदोलनाला विरोध करणारे ग्रामस्वराज्याचे काम सोडून सरकारच्या पोटात गेले आणि आंदोलनवालेही पंतप्रधानांच्या निवडणुकीच्या आव्हानाचा स्वीकार करून भलत्याच दिशेला गेले. यामुळे त्यांच्या आंदोलनावर हळूहळू राजकारणाचा रंग चढत गेला. ग्रामस्वराज्य आंदोलन किती मागे गेले कोण जाणे! असो, जे व्हायचे होते ते झाले.

बाह्य परिस्थितीने प्रभावित न होता मी ग्रामस्वराज्याचा विचार समजावून सांगत सतत फिरत होतो. जून १९७५ मध्ये देशात आणीबाणीची घोषणा झाली. लोक इतके आतंकित झाले की माझ्या कार्यक्रमाच्या पूर्वतयारीसाठी गावात जाणाऱ्यांशी बोलायलाही घाबरू लागले. त्यांना घरात राहू द्यायला तर घाबरू लागलेच. आणि हा आतंक लोकशाही रक्षणाच्या नावाखाली! या स्थितीत मी यात्रा स्थगित करणेच ठीक मानले. नोव्हेंबर १९७६ पासून यात्रा पुन्हा सुरू केली. जाहीर सभा होऊ शकत नव्हत्या. चर्चा-बैठकी होत होत्या. आतंक हळूहळू कमी होत आहे, लोक अधिक चेतन होत आहेत, याचे दर्शन होत होते.

प्रकृती बरी नसल्याने यात्रेत खंड पडत होता, पण यात्रा चालू होती. शेवटी सतत प्रकृती बिघडत राहिल्याने, याला ईश्वराचा संकेत मानून १९७८ मार्च मध्ये यात्रा बंद केली.

२५ वर्षे विनोबांचा एक शिपाई म्हणून काम केले. गांधीजींनी ग्रामस्वराज्याची जी कल्पना जगापुढे ठेवली होती, तिच्या स्वरूपाचे दर्शन विनोबांनी करवले. तिला परिपूर्ण परिभाषा प्रदान केली. भूदान-ग्रामदान आंदोलनात कार्यपद्धती संबंधाने अनेकदा मतभेद झाले. मी माझे मत मित्रांपुढे नेहमी मांडत असे, मात्र शेवटी विनोबांच्या निर्देशानुसार काम करीत असे. असे असूनही माझा मार्ग-शोध स्वतंत्रपणे सतत चालू राहिला. मार्ग शोधाच्या अनुभवाच्या आधारावर मी एवढेच म्हणू शकतो की दंडनिरपेक्ष, शासनमुक्त समाजरचनेचा विचार जगात आम्हा लोकांमार्फतच प्रकट झाला. केवळ प्रकटच झाला नाही, तर ग्रामदानाच्या रूपाने त्यातील संभावनांचे दर्शनही झाले.

इतिहासात गांधीजी ही पहिली व्यक्ती होती, जिने सांगितले की साध्याच्या अनुरूप साधन नसेल तर साध्यापर्यंत कधीच पोचता येणार नाही. स्वातंत्र्य, समता, बंधुता हे साध्य असेल तर साधनही त्यानुसारच असले पाहिजे.

विनोबांसोबत आमच्या वानरसेनेने ग्रामदानाद्वारा ग्रामस्वराज्याच्या स्वरूप-दर्शनाचा प्रयत्न केला. आमच्या लहान हातांनी ग्रामस्वराज्याच्या महावीर हनुमंताचे चित्र तर तयार होऊ शकले नाही, मात्र त्या चित्राच्या रूपरेखेची झलक दाखवण्यात आम्ही निश्चितच यशस्वी झालो. चित्र रेखाटण्याचे काम पुढील पिढ्या करतील.

[आपल्या मौलिक चिंतनातून आणि मार्गशोधाच्या अनुभवातून पुढील पिढ्यांना यासाठी मार्गदर्शन करणारी अनमोल शिदोरी ठेवून धीरेंद्रभाई कालवश झाले.

मार्च १९७८ नंतर प्रकृती अधिकाधिक बिघडतच गेली. शेवटी २१ नोव्हेंबरला संध्याकाळी त्यांनी देहत्याग केला.

देह जाणारच होता; तो गेला. परंतु विचार कायम आहे.]

(लोक-क्रांती पाथेय मधून संक्षेप व अनुवाद पराग चोळकर. साम्ययोग साधना १६ सप्टेंबर २०००)



# साथी मोहनदास करमचंद गांधी

## संजय संगवई

### गांधी व सर्वोदय आजच्या संदर्भात

आज गांधी-विनोबांचं नाव वा त्यांचे विचार, त्यांनी काय केलं याची नव्या पिढीत जाणीवही नाही. उलट गांधी म्हणजे केवळ थट्टेचा विषय मागच्या पिढीतील मध्यम-वर्गीयांचा होता. 'मजबूरी का नाम महात्मा गांधी' किंवा उघड्यावर संडासला जाण्याला 'गांधी परेड' म्हणून टर उडवणं हे लहानपणापासून शहरी मध्यमवर्गीयांत चालत होतं. पु. लं. देशपांडेंच्या 'तुझे आहे तुजपाशी' नं गांधी-विनोबांना व प्रामाणिक कार्यकर्त्यांना हास्यास्पद बनवलं. राजकीय नेत्यांनी गांधी जयंती, मयंतीचे सोहळे करुन, त्यांच्या वर्तनांतून गांधी वा खादीची बदनामी चालवली होतीच. संघपरिवार, भांडवलदार, व्यापारी, आंबेडकरवादी, मार्क्सवादी अशा अनेक वर्तुळांत गांधींचं नाव वा विचार थट्टेचा वा जहरी टीकेचा विषय होता. आजच्या सिनेमा- चॅनलच्या काळात शहरी वा ग्रामीण तरुणांना तर गांधी हे नाव व त्यांचा विचार परक्या ग्रहावरचा वाटतो; किंवा जिथं माहीत आहे, तिथं 'मी नथुराम बोलतोय' हे नाटक वा 'भगतसिंग' चित्रपट यांसारख्या ज्ञानाच्या महामार्गातून त्यांच्याविषयी प्रचंड गैरसमज व त्यातून येणारा शत्रुभाव पसरतो आहे. शिवाजी विद्यापीठाच्या गांधी अध्ययन केंद्रानं काही महाविद्यालयांत विद्यार्थ्यांच्या अशा कार्यशाळा घेतल्या तिथं गांधीजींविषयी या पिढीचा काय समज झाला आहे ते कळत होतं.

हा सर्वच प्रकार भयाण आहे. काही मतिमंद व राष्ट्रद्रोही प्रवृत्तींनी व व्यक्तींनी त्यांना ठार केलं, तर विकास म्हणवल्या जाणाऱ्या उद्धटपणातून त्यांचा विचार मांडण्यात आला. कोणत्याही प्रगत व नव्या विचारांना संपवायचं तर उपेक्षा, निंदा, हत्या व श्रद्धा ही चार हत्यारं असतात असं हजारीप्रसाद द्विवेदींनी 'पाप के चार हथियार' मध्ये म्हटलं आहे. त्यानुसार गांधींचं व्यवस्थित थडगं बांधलं गेलं. त्याचं पर्यटन केंद्र झालं. त्यांच्या नावावर कितीतरी जण जगत आहेत; सत्ताधाऱ्यांच्यात समाविष्ट होत आहेत. भाजप सरकारच्या काळात तर गांधीपर्यटन केंद्र बाकायदा जाहिरातदारांच्या ताब्यात देऊन त्यांचं मनोरंजन केंद्र करण्याची योजना होती. गांधींच्या प्रस्थापित व्यवस्थेच्या संपूर्ण विरोधाचं सरकारी-करणात रूपांतर झालंच, आता त्यांच्या कॉर्पोरेटीकरणाचा धोका आहे.

प्रश्न गांधी-विनोबांच्या वैयक्तिक विधानांचं वर्तनाचं गौरवीकरण वा समर्थन करण्याचा नाही. मात्र त्यांनी काय सांगितलं, त्यातून आजच्या वातावरणात काही अधिक चांगलं परिवर्तन करता येण्याच्या शक्यता मर्यादित होऊ नयेत, म्हणून गांधी-विनोबा व त्यांच्या नव्या परिवेशात पुन्हा सांगायला पाहिजेत. आजच्या बहुतेक जन-आंदोलनांची व त्यांतल्या कार्यकर्त्यांची सर्वोदय विचारांशी नाळ आहे व आजच्या विकासाच्या टप्प्यावर त्याची दखल घेणं गरजेचं आहे. मात्र गांधी व सर्वोदय विचार हा त्याही मर्यादेत न राहता त्या विचारातील अनेक गोष्टी नव्या, विवेकपूर्ण प्रगतीसाठी आवश्यक आहेत, असं पुन्हा पुन्हा जाणवत राहतं. आपल्या जीवनातले वैचारिक-राजकीय, आर्थिक-सामाजिक पर्याय मर्यादित राहू नयेत म्हणून तरी या गोष्टी सांगायला हव्यात.

मोहनदास करमचंद गांधी या व्यक्तीविषयी आठवणींचे कढ न काढता, त्यांच्या विचारातून व कामांतून काय पुढे येतं, त्यावर भर द्यावा किंवा सर्वोदय विचार हा फक्त गांधींचा विचार नाही तर गांधी, विनोबा, जे. सी. कुमारप्पा, जयप्रकाश नारायण यांच्यापासून अण्णासाहेब सहस्रबुद्धे, दादा धर्माधिकारी, आचार्य जावडेकर, तुकडोजी महाराज अशा अनेकांच्या योगदानातून हा विचार विकसित होत गेला हे निश्चित आहे. मात्र ते करतानाही गांधी या व्यक्तीच्या कामातून प्रगट होणारा विचार आजच्या सामाजिक, वैयक्तिक कामाच्या दृष्टीनं अर्थपूर्ण आहे.

गांधीजींच्या संपूर्ण व्यक्तिमत्त्वात सामान्य माणसांना भावेल, त्यांना जवळचं वाटेल असं काही होतं. हा माणूस कुण्या शापीत देवदूतासारखा प्रतिभा-बुद्धी-वाणीचा पिसारा घेऊन जन्मला नव्हता. त्याचं सामान्य असणं, चुकत, धडपडत व स्वतःला सावरत, प्रयोग करत पुढे जाणं याच त्यांच्या प्रभावातील मेख दडली असावी. कुणी एकानं म्हटलं आहे की जी कृती आपणापैकी कुणीही करु शकतो, पण करत

अनुक्रमणिका








नाही, ते गांधी करत होते. तुमच्यासारखेच गोंधळलेल्या अवस्थेतून ते पुढे जात होते. लहानपणी, तरुणपणी अनेक दोलनामय विकारांतून ते स्वत: गेले. विलायतेतही त्यांचे पहिल्यापासून काही स्पष्ट नव्हते. प्रत्येक टप्प्यावर अनुभव-विचारांच्या थपडा खात, शिकत, स्वतःला घडवत, तपासत ते जात राहिले. अनेक गुणदोष, प्रवृत्तींमधून प्रयत्नपूर्वक बदलायचं असा त्यांचा निश्चय राहिला. आयुष्यालाच सत्याचे प्रयोग म्हणून पाहणाऱ्या सतत शिकणाऱ्या, प्रांजल असणाऱ्या या माणसाबद्दल इतर कुणा अचाट बुद्धिमत्ता, वक्तृत्व, नेतृत्व असणाऱ्यांपेक्षा लोकांना आपलेपणा वाटला. गांधींच्या कमजोरीत, त्यांवर मात करत, उठून पुढे जाण्यात सामान्य माणूस आपलं रुप पाहतो व आपल्यालाही तसं घडविता येईल ही आशा त्यात असू शकते. मात्र गांधींना प्रेषित मानून त्यांचं अतिमानवीकरण करणारे त्या प्रक्रियेसाठी अडथळाच ठरतात.

### परिवर्तनाचे शास्त्र

गांधीजी खरे कलंदर यात्रिक (व्हॅगबॉंड) होते - जिथं जाईल, ज्या संदर्भविश्वात जाईल, हा माणूस तिथला होऊन जातो, प्रारंभिक अडचणींनंतर तिथले संदर्भ व चळवळी आत्मसात करतो; द. आफ्रिकेला गेल्यावर तिथल्या समस्या, तिथले युद्धदेखील त्याचं आपलं झालं. तिथल्या लढ्यातच त्यांच्या सत्याग्रहाची सुरुवात झाली. भारतीय परंपरेबरोबरच जॉन रस्किन, टॉलस्टॉय यांना त्यांनी आत्मसात केलं; फिनिक्स फार्मनंतर आफ्रिकेतच टॉलस्टॉय फार्म उभारला. अहिंसा व मैत्री यातून खुलेपणा व दिलदारपणा प्रकट होतो. रोमाँ रोलॉने गांधीजींचं वर्णन करताना त्यांच्या या सुरेख सभ्यतेचा (ब्युटिफुल कर्टसी) उल्लेख केला आहे. गांधीजींचे मित्र कोण व कुठे नव्हते? दक्षिण आफ्रिकेतले व नंतर भारतात आल्यावर त्यांचे गोरे मित्र स्वातंत्र्य व विकासाच्या लढ्याचा महत्त्वाचा पैलू स्पष्ट करतात. अन्याय, शोषणाच्या विरोधात सर्व वंश-जात-धर्म-रंग-वर्ग-प्रदेशांचे लोक सहभागी होतात. महत्त्व त्या वंश-रंगाला नाही तर ही सर्व माणसं कोणत्या मूल्यांना मानतात व त्यासाठी त्याग करण्याची तयारी किती ठेवतात ते महत्त्वाचं आहे. स्वदेशी व स्वातंत्र्य यांचा पुरस्कार करणारा माणूस संकुचित राष्ट्रवादी किंवा वंशवादी कधीच असू शकत नाही, हे गांधीजींच्या मित्रपरिवारावरुन दिसतं. 'साधना'तील 'मोहनमाया' सदरातून रामदास भटकळ त्याचा परिचय करुन देण्याचं मोलाचं काम करीत आहेत. भारतात आज संघर्ष व रचनेचं नवं परिवर्तनकारी राजकारण करीत असलेल्या 'नर्मदा बचाओ आंदोलना' सारख्या संघटना-चळवळींनी भारतातील व जगातील सर्व प्रकारच्या लोकांना अन्यायविरुद्धच्या संघर्षात व खऱ्या विकासाच्या लढ्यात सहभागी केलं आहे. अन्याया विरुद्ध आपण जगभरातील सगळे एक ही समाजवादी चळवळीची मूलभूत धारणा आहेच. विनोबांनी असा उदार, व्यापक, न्याय-समतेचा व प्रेमाचा आंतरराष्ट्रीय वाद 'जयहिंद' या संकुचिततेत अडकण्याऐवजी 'जयजगत' या नव्या घोषणेद्वारे पुढे आणला.

नेल्सन मंडेलांच्या वंशविरोधी लढ्यात काळ्या-बरोबर समतावादी गोरे प्रचंड प्रमाणात सहभागी होते. मंडेलांचे वकील, जवळचे सहकारी, स्वतंत्र द. आफ्रिकेची घटना लिहिणारे अशा अनेक भूमिकांत श्वेतवर्णीय होते व लाखो श्वेतवर्णीय युवक-युवतींनी वर्णवंशवादाविरुद्धचा लढा आपला मानला होता. मंडेलांनी वंशवादाविरुद्ध लढताना कधीही जन्माधारित काळा-गोरा भेद मानला नाही. हा देश सर्वांचा आहे - कृष्ण, गौर व मिश्रवर्णीय, भारतीय व अन्य. गोऱ्यांनी आफ्रिकेबाहेर जाण्याचा प्रश्नच नाही. सर्वजण मिळून हा देश घडवू. गांधी, नेल्सन मंडेलांचा हा खुलेपणा शोषितांच्या हक्कांसाठी लढणाऱ्या इतरांमध्येही येण्याची गरज आज जन्मावरुन पुरोगामी-प्रतिगामी ठरवण्याच्या काळात जास्तच आहे.

केवळ काळे-गोरे हा भेद नाही, तर द. आफ्रिकेतले व भारतातले व्यापारी, मजूर, मध्यमवर्गीय, शेतकरी, नोकरदार, स्त्रिया, तरुणतरुणी, परचुरेशास्त्री, विनोबांसारखे विद्वान, जे.सी.कुमारप्पांसारखे तज्ज्ञ, जमनालाल बजाज, बिर्ला, आगाखान यांच्यासारखे शुद्ध भांडवलदार अशा सर्व स्तरांवर गांधी वावरत होते. प्रत्येकानं त्याच्या कुवत-लायकीप्रमाणं कार्यक्षेत्र निवडलं, त्यांना तिथं पाठवलं. त्यात आश्चर्य वाटावं अशी विविधता आहे - तरीही कुठेतरी एकवाक्यताही आहे. समाजात परिवर्तन करायचं असल्यास परिवर्तनकारी मूल्यं व मुद्द्यांची जाणीव फक्त संबंधित समाज-समूहापुरती (दलित, मागास, विस्थापित, आदिवासी वा शेतकरी, कामगार) मर्यादित ठेवून चालत नाही. नागरी समाजात आपल्या चळवळीचे मुद्दे भिनले तरच अन्यायशोषणाला कायमस्वरुपी व प्रामाणिकपणे आळा बसू

शकेल. त्यांचंही उन्नयन (इमॅन्सिपेशन) होणं यातच सर्वोदय आहे.

त्या दृष्टीनं गांधींच्या अस्पृश्यता निर्मूलन व जातिप्रथाविरोधी कामाकडे पाहिलं पाहिजे. डॉ. आंबेडकर व गांधींचं कार्य हे वेगळ्या बिंदूपासून सुरु होतं. गांधींनी आंबेडकरांप्रमाणे पूर्वास्पृश्यांना संघटित करण्याचा प्रश्नच नव्हता; तसा त्यांनी दावाही केला नाही. त्यांनी त्यांच्या वर्गापासून - सनातनी हिंदू समाजापासून - सुरुवात केली. त्या समाजाने आपला अस्पृश्यांबद्दलचा व जातिव्यवस्थेविरुद्धचा दृष्टिकोन बदलणं आवश्यक होतं. त्यांच्यासाठी अस्पृश्यतेशी जोडलेल्या अस्पर्शभावनेला काढून टाकण्याचे त्यांचे प्रयत्न होते. त्यासाठी या पारंपरिक समाजाला शिव्याशाप देण्याऐवजी त्यांच्यातील उदात्त भाव जागा करण्याचा त्यांचा प्रयत्न होता. गांधींनी अस्पृश्यता व जातिव्यवस्था यांचा निःपात व्हावा असे वारंवार सांगितले. आंबेडकरांच्या भूमिकेबद्दल व कामाबद्दल प्रशंसाही केली. मात्र गांधींना त्यांनी कधीही दावा न केलेल्या कृत्याबद्दल आजपर्यंत दलित नेतृत्वाकडून शिव्याच मिळत आहेत. गांधीजींना बहुधा त्याचाही अदमास असावा, म्हणून ते म्हणतात की आंबेडकर जरी माझ्या तोंडावर थुंकले तरी ते समजण्यासारखे आहे. अर्थात गांधींनी अस्पृश्यता निवारणाला व्यापक विकासाच्या व राष्ट्रनिर्मितीच्या संदर्भात ठेवले, म्हणून त्यांना कुणाला वगळण्याचे राजकारण (एक्स्ल्यूशनिस्ट पॉलिटिक्स) करायचे नव्हते.

स्वातंत्र्य, समानता, विकास व सुखी मानवी जीवनासाठी विशिष्ट प्रकारच्या नैतिक व साध्या जीवनशैलीचा गांधींनी पुरस्कार केला. त्यामध्ये सामान्य माणसांपासून अनेक व्यापारी, अधिकारी, राजे-संस्थानिक सहभागी होते. गांधींच्या या प्रभावाची बुद्धीच्या श्रेष्ठी-वर्णिकातर्फे स्वागताशी तुलना करता येते. आनंदसारख्या शिष्यांनी, या श्रेष्ठीवर्गाने व पुढे अशोकासारख्या सम्राटाने बुद्ध धर्म पसरवण्यास मुख्य मदत केली. बहुजनहितायचे सर्वोदयात सर्वजनहिताय झाले. गांधीवादी संपन्न घरांत गेल्या पिढीपर्यंत बुजुर्ग लोक खादीचे कपडे घालत, आहार-विहारात मितव्ययता असे; अर्थपासून ते त्यांच्या वागण्यात-व्यवहारात किमान प्रामाणिकता, न्यायबुद्धी (फेअर-प्ले) असे आजच्या नवभांडवलदारांप्रमाणे सत्ता-संपत्तीचे भडक प्रदर्शन, मस्ती व नफा हाच एकमेव हेतू, असा मामला अनेकांच्या संदर्भात नव्हता. भारतातील सत्ताधारी-संपत्तीधाऱ्यांच्या वर्तनात समता, न्याय यांची तोंडदेखली का होईना दखल घेण्याची आंतरिक गरज गांधी व सर्वोदयाच्या वेगळ्या प्रकारच्या व्यापकतेमुळे (हेजीमनी!) होती. प्रत्येक घटकाचे हितसंबंध दुसऱ्यात गुंतले आहेत व प्रत्येकानं दुसऱ्याकरता जागा करून देणं हे नैतिक कर्तव्य आहे की एक प्रेरणा (स्पिरीट) व्यापकपणे पसरवण्यात सर्वोदय व गांधी यांच्या कृतीतून व्यक्त होती.

त्याला कुणी त्यागाची व नैतिक भावना म्हणतील - गांधीजी म्हणतात. आजकाल कुणीही या शब्दांना खिजवतं. आता त्यागबिग, नैतिकता जाऊद्या - आपल्याला चांगलं रहायचं आहे, अशा टपल्या मारतो व पुरोगाम्यांच्याही टाळ्या मिळवून जातो. व्यवहार्य रीतीने जरी पाहिलं तरी प्रत्येकानं स्वतःवर मर्यादा घालून घेतल्याशिवाय समता, स्वातंत्र्य, लोकशाही, सर्वधर्मसमभाव वा निधर्मी राज्यपद्धती देखील आणता येणार नाही. परस्परांना समजून घेत त्यांच्यासाठी अवकाश दिल्याशिवाय अहिंसक लोकशाहीकडे व समानतेकडे, शोषणरहिततेकडे वाटचाल करता येणार नाही. सतत हिंसक संघर्ष, यादवी, परस्परद्वेष कलह यांचं लोकशाही व समानता यांच्याशी नातं आहे असे ज्यांना वाटते त्यांनी तो प्रयोग जरूर करून पहावा - किंबहुना तसे प्रयोग चालू आहेतच.

न्याय, समानता इत्यादी मूल्यं नैतिक आहेत. फक्त भौतिक-जडवादी तर्कानं भांडवलशाहीची व वर्चस्वाची मूल्यं बळकट होतील. समानता व न्याय्य वर्तनाचं, दुसऱ्याचं हडप न करण्याचं मूल्य हे नैतिक आहे. त्याचप्रमाणे धर्माचा खरा व अंतिम अर्थ नैतिक वर्तन व दर्शन होईल. यावर गांधी व अन्य सर्वोदयींची श्रद्धा आहे. आपल्या अर्थव्यवस्थेची फेररचना करण्याची ती एक पद्धती आहे, असं कुमारप्पा सांगतात. या नैतिकतेच्या तत्त्वाची पुन्हा प्रस्थापना करणं आजच्या सर्वच समाजवादी, सेक्युलर, बहुजनवादी, लोकशाही व जागतिक लोकशाही-शांततावादी, निःशस्त्रीकरणवादी राजकारणाचा आधार राहणार आहे. आजच्या कार्यकर्त्यांना आपल्या राजकारणासाठी नैतिक मूल्यांनुसार राहणे आवश्यक आहे.

त्यात अहिंसेला प्रमुख स्थान आहे. सत्याग्रहाच्या संकल्पनेतसुद्धा समोरच्याविषयी प्रेम असावे.किमान द्वेष तरी नसावा. हृदय परिवर्तनावर भर द्यायला हवा. हे सांगणे तत्काल मंजूर होणार नाहीच. आजच्या शोषणखोर, विषम व

दमनकारी व्यवस्थेच्या संदर्भात असा आग्रह धरणं फिजूल आहे. मात्र त्या तत्कालिक संघर्षाच्या कालखंडातून बाहेर पडल्यावर समाजाची धारणा, मांडणी कशी होणार? हिंसेतून येणार फक्त प्रति-हिंसा, द्वेषातून आणखी प्रतिद्वेषच पुढे येणार. सर्वांना बरोबर घेऊन, सामाजिक सूड-प्रतिसूडाच्या भावनेला नाहीसे करून परिवर्तन आणण्याची गांधींच्या सामाजिक परिवर्तनाच्या अभियांत्रिकी (सोशल इंजिनियरिंग) व्यवहारातून व त्यामागील तात्त्विक बैठकीतून आजच्या परिवर्तनासाठी कोणत्या पद्धतीची गरज आहे त्याचा विचार करावा लागेल. समाजवाद वा साम्यवादाची स्थापना वा जातिनिर्मूलन, सामाजिक ऐक्य, समानता, समान वाटप, इत्यादी बाबी शेवटी लोकांनी विशेषत: शोषक सत्ताधिकाऱ्यांनी या मूल्यांचा मनापासून स्वीकार करावा म्हणजे हृदयपरिवर्तन होणे) यांवर आधारित आहे ना? बंदुका, कायदे वा शिव्या - अपमान यांचा वापर करूनही शेवटी त्या मूल्यांचा त्या समूहांनी (मनाने) स्वीकार करावा अशीच अपेक्षा असते. मात्र अशा धाकाखाली तशी समानता, न्याय वगैरे आतून येईल अशी शक्यता दिसते का? भूतकाळातील वेगळ्या परिवेशात, वेगळ्या माणसांनी केलेल्या अन्यायाबाबत आज त्या समूहातील कुणावरही तसेच अन्याय-अत्याचार करणं, बहिष्कृत करणं, मशिदी वा मंदिरं पाडणं, जन्मजात पुरोगामी - प्रतिगामी ठरवणं, म्हणजे ती अन्यायी व्यवस्था पुढे चालू ठेवण्यासारखं आहे. आज प्रतिगामी; जमातवादी व फॅसिस्ट संघटना, तसेच पुरोगामी, परिवर्तनवादी, विद्रोही इत्यादी मंडळी या दोन बाजूंच्या वर्तन व तर्कपद्धतीत विचित्र समानता येत आहे; फरक फक्त कोणत्या प्रकारचे शब्द व आवेश उपयोगात आणला जातो तेवढाच! अशातून खरोखर परिवर्तन होणं बाजूलाच राहिलं. अन्याय करणारांना आपल्या अन्यायाची तीव्र जाणीव होऊन, त्यांनी यापुढे तसं न करणं हेच सरतेशेवटी मुक्तीलढ्याचं फलित असेल तर त्याचा टिकाऊ व खरा पाया अहिंसा व हृदयपरिवर्तन हाच असू शकतो. नेल्सन मंडेलांनी द. आफ्रिकेत याचा सुरेख प्रयोग सुरू केला आहे व अन्यायाच्या भुतापासून राष्ट्राला मुक्त करून भविष्याकडे जाण्याचा रस्ता खुला केला.

याचाच दुसरा भाग म्हणजे विरोधी बाजूला असलेल्यांशीही चांगले मानवी संबंध ठेवणं, त्याच्या विचारांना विरोध असला तरी व्यक्तिगत पातळीवर मानवीय दृष्टीनं वागणं, ही लोकशाहीतील प्रथा. गांधीजींसहित स्वातंत्र्यचळवळीतील प्रत्येकाने तसं अनुकरण केलं. पुढे नेहरूंच्या काळात त्याला अशी संसदीय लोकशाहीची परंपरा होती. आपल्या विरोधकांच्या (नाथ पै, डॉ. लोहिया, वाजपेयी यांच्या भाषणाला नेहरू हजर राहत. त्यांतील पटलेल्या मुद्द्यांची प्रशंसा करीत. विरोधकांच्या गुणांची, त्यागाची कदर करणे हे एक लोकशाही मूल्य आजच्या परिवर्तनवादी राजकारण व सिद्धांतातून हद्दपार झाले आहे. सभ्य व लोकशाही समाजाच्या उभारणीसाठी सर्वोदयी विचारांचा आज उपयोग आहे.

### स्वराज्य व स्वातंत्र्य

गांधी व एकंदर विचारआचारांमध्ये स्वातंत्र्य व स्वराज्याचा खरा अर्थ फार वेगळा होता. यापूर्वी सामाजिक सुधारणा (समानता) आधी की राजकीय (स्वातंत्र्य) आधी असा वाद झाला. १९२० नंतर गांधींनी भारतात साबरमती व सेवाग्राम आश्रमांतून जे काही केलं ते या वादांना आपल्या करणीतून क्षुल्लक ठरवत स्वातंत्र्य व स्वराज्याचा नवा अर्थ विकसित केला. आहारापासून आरोग्य, स्वच्छता, मैला-व्यवस्थापन, ग्रामोद्योग, शेती, गोपालन, प्रार्थना, आफ्रिकेतील भारतीयांचा लढा, इंडियन ओपिनियन सारखं नियतकालिक, भारतात स्वातंत्र्याची लढाई, सत्याग्रहाचं नवं उपकरण (शस्त्र नव्हे), यंग इंडिया, हरिजन सारखी साप्ताहिकं असं कित्येक आघाड्यांवर काम चाललं होतं. स्वातंत्र्यापेक्षा महत्त्वाचा सवाल अस्पृश्यता निवारणाचा किंवा हिंदू-मुस्लीम सलोख्याचा आहे; किंवा भुकेला, ग्रामविकासाला, स्वदेशी पंचायत राजला वा धार्मिक सलोख्याला राजकीय स्वातंत्र्याचा सममूल्य ठेवण्याचं कृत्य पाहिलं असतं तर आधी सामाजिक की राजकीय वादाचे म्होरके चकणेच झाले असते.

गांधींनी १९०९ मध्येच हिंद स्वराज्य लिहून भारतीय स्वराज्याचा अर्थ स्पष्ट केला, तोवर कुणीही असा विचार केला नव्हता. त्यांच्या लेखी ब्रिटिशांची सत्ता केवळ राजकीय वर्चस्व वा आर्थिक लूट नव्हती; तर भारतीयांच्या मनातली वस्तुसंचयवादाची (मॅमन वर्शिप) परिणती होती. त्याची एकदा आस लागली की प्रशासकीय वर्चस्व व राज्य हे केवळ बाह्य उपचार असतात. त्यामुळे पाश्चात्त्य विकास पद्धतीच्या अधिक भौतिक सुखासाठी, अधिक वस्तुनिर्मितीसाठी निसर्ग व

अनुक्रमणिका

मानवाच्या असमानतेवर व शोषणावर आधारित उत्पादनाच्या व विकासाच्या पद्धतीला आपण स्वीकारले आहे. जोवर दुखण्याचं निदान या मूळ व मुख्य बिंदूवर होऊन उपाय होत नाही तोवर फक्त गोरे इंग्रज जातील, मात्र त्यांचे वर्चस्व व भारतीयांची गुलामी जाणार नाही. या गुलामीचे कारण दूर करुन विकासाची वेगळी देशी वाट आपण घडवत नाही तोवर गोरे इंग्रज गेले काय राहिले काय, त्यांचं राज्य व आपली गुलामी चालूच राहणार. भारतीयांची गुलामी म्हणजे केवळ इंग्रजांचा धूर्तपणा नाही, तर भारतीयांवरही त्याची जबाबदारी येते. भारतीय स्वराज्याची ही व्याख्या आज विलक्षण वाटते व आज त्याची तर गरज आहे. जागतिकीकरण व नवभांडवलशाहीच्या वातावरणात आज परकीय भांडवल, वस्तू व जीवनशैली संदर्भात भूमिका घेण्यासाठी त्याची मदत होऊ शकते. जागतिक व देशी बड्या भांडवली शक्तींच्या वर्चस्वामागे त्या लोकांचं राजकारण कारणीभूत आहे. तसेच येथील सत्ताधारी वर्गाचे हितसंबंध व मोह देखील जबाबदार आहेत. आता सर्वसामान्य लोकांनाही या जाळ्यात ओढण्यासाठी अमिताभ बच्चन, आमीर खान, सचिन तेंडुलकर हीमंडळी आहेतच.

स्वराज्यातील दुसरा अडथळा पुन्हा आपल्याच खात्यात जातो. विषमता व जातिप्रथा - अस्पृश्यता. गांधी म्हणतात, 'आर्थिक समानता - श्रम व भांडवलातील, गरीब-श्रीमंतातील सनातन संघर्ष नष्ट करणं - ही अहिंसक स्वराज्याची गुरुकिल्ली होय. समता, सार्वजनिक हितासाठी धन व सत्तेमध्ये वाटा नसेल तर रक्तरंजित क्रांती अटळ आहे.' (यंग इंडिया - २६/७/१९४२).

अशा स्वराज्यात गाव-स्वराज्य हा मूळ पाया असेल, मात्र तो पुढे प्रदेश, देश व जगाच्या सतत विस्तारत्या व परस्परावलंबी वर्तुळातील केंद्रबिंदू आहे. यात कोणतीही उतरंड, वर्चस्व नसेल, प्रत्येक वर्तुळ स्वतंत्र असेल. सर्वात व्यापक वर्तुळ सर्वात लहान वर्तुळाला गिळून टाकण्याऐवजी सुदृढ बनवेल अशी त्यांच्या ओशियानिक सर्कलची संकल्पना होती. त्यामध्ये पंचायतराजची कल्पना म्हणजे संकुचित किंवा जुनी विषमतेवर आधारित असणं शक्य नव्हतं. गांधींनीही अनेक वेळा स्पष्टपणे हे सांगितलं आहे की, ही पंचायत राजची संकल्पना व व्यवहार पारंपरिक पंचायत राज व्यवस्थेपेक्षा वेगळी आहे. सत्य व अहिंसा यांवर आधारलेल्या नव्या पंचायत राज्यात समानता व शोषण-दडपशाहीपासून मुक्ती ही प्रमुख लक्षणं असतील. त्यात अन्य गावांबरोबर, घटकांबरोबर व जगाबरोबर संबंध व मदत गृहीतच आहे. ही व्यवस्था व्यक्तीचे स्वातंत्र्य व लोकशाहीवर आधारित आहे. तळागाळातील स्वतंत्रता... त्यात सर्वजणांना शुद्ध, जाणते, व समान मानून जात, धर्म, समूह याबाबतीत किंवा शरीरश्रम व बुद्धिमत्ता याबाबत भेद केला जाणार नाही. (हरिजन १८/१/१९४८)

अशा गाव-स्वातंत्र्याची रुपरेषा आजच्या गरजांच्या दृष्टीनेही साह्यभूत होऊ शकते. त्यांच्यानुसार वैशिष्ट्ये अशी : व्यक्तीची/माणसाची सर्वोच्चता व संपूर्ण उपजीविका/ रोजगार, शरीरश्रम, समानता, धर्मनिरपेक्षता व जातिप्रस्था-अस्पृश्यता यांचं निर्मूलन, विकेंद्रीकरण, स्वदेशी, आत्म-निर्भरता, सहकार, सत्याग्रह व असहकार, सर्वधर्मांची समानता, पंचायती राज, नई तालीम शिक्षणातील नवे प्रयोग, सांडपाणी व आरोग्य (निसर्गोपचार), आहार व स्वच्छता, विश्वस्तवृत्ती.

आज बदललेल्या परिस्थितीतही या धर्तीवर विकास आपल्याला हवा आहे. विकेंद्रीकरण म्हणजे लोकशाही व शेवटातल्या घटकापर्यंत निर्णयप्रक्रिया नेणं, त्यांना स्थान असणं होय. त्यात जगाबरोबर संबंध गृहीत आहेत; मात्र त्याचा आधार आपला परिसर आहे. त्यातूनच स्वदेशीची कल्पना येते.

स्वदेशी म्हणजे आपल्यापासून अधिक दूर असणाऱ्यांऐवजी जवळच्या परिसरातील माणसे, उत्पादन, संस्था व मुद्द्यांना प्राधान्य देणे होय. त्यात काही कमतरता असतील त्या दूर करण्याचा प्रयत्न करणे होय. त्यातून गरिबी, स्वच्छता, कारभार (गव्हर्नन्स) व सामाजिक विषमता यांसंबंधी मुद्दे धसाला लागतील... स्वदेशी म्हणजे सूडबुद्धीने सुरु केलेली बहिष्काराची चळवळ नाही; स्वदेशी म्हणजे तुमच्या लोकांशी असलेले प्रेम व त्यांच्याशी बांधिलकी; तुमच्या गरजा शेजारी कोण पुरवणारा आहे हे पाहून उत्पादक व उपभोक्त्यांमधील थेट संबंध. माझी देशभक्ती सर्वांना सामावून घेणारी आहे, माझ्या मातृभूमीची सेवा ही कुणाशी स्पर्धा किंवा विरोध नाही. स्वदेशी म्हणजे द्वेषाचा संप्रदाय नव्हे. ते निःस्वार्थी सेवेचे व अहिंसेचे सर्वात शुद्ध रुप - प्रेम - त्याचा आविष्कार होय. स्वदेशीचे कट्टरवादात रुपांतर झाले तर इतर चांगल्या गोष्टीप्रमाणे तिचाही ऱ्हास सुरु होतो. (येरवडा मंदिर, १९५७)

विनोबांनीही स्पष्ट म्हटले आहे की, स्वदेशी धर्म








दयाळू आहे, मायाळू नव्हे. भारतात बनत असलेली दारू मला अमान्य आहे, मात्र स्वित्झर्लंडधील घड्याळे, जर त्यांची खरी गरज असेल तर - स्वदेशीत बसतात. स्वदेशी व विकेंद्रीकरणाचा एवढा उन्नत विचार आजच्या काळात जागतिकीकरणवादी व स्वदेशीवादी दोघांनाही मनन करण्यासारखा आहे. आज आम्हाला तो उपयोगी आहे.

### स्थायी विकास

यातून गांधी व सर्वोदयांचा विकासाचा विचार पुढे येतो, जो आज आमच्या पिढीला आवश्यक आहे. त्याला सर्वात मूर्त रूप दिले ते जे. सी. कुमारप्पांनी. कुमारप्पांवर स्वतंत्रपणे लिहिणं आज अत्यंत आवश्यक आहे. त्यांनी पाच विविध तऱ्हेच्या अर्थव्यवस्थांचे वर्गीकरण केले. (परोपजीवी, अपहरणजीवी, उद्योग, संचय व सेवेची अर्थव्यवस्था) कोणतीही अर्थव्यवस्था प्रगत असते ती आधी का नंतर आली यावरून ठरत नसते, तर त्यात कोणती मूल्ये अनुस्यूत आहेत, यावरून ती इष्ट का-अनिष्ट हे ठरते. यात परोपजीवी व अपहरणजीवी व्यवस्था अनिष्टच आहेत. तात्कालिक लाभप्रद वाटणाऱ्या गोष्टींऐवजी दीर्घकालीन लाभांचा विचार महत्त्वाचा मानला, त्यासाठी माणसाने निसर्गचक्राच्या विरोधात वागल्यास विषमता व विनाशच पदरी येतो हे ते सांगतात. सर्वोदयाच्या तत्त्वांनुसार प्रत्येग गावातील उद्योग व उत्पादन साधनं खऱ्या अर्थाने लोकांच्या हाती असतील व शेती, कारागिरी (लघुउद्योग) यांच्यात प्रगती होईल. त्यात उपजीविका, रोजगारनिर्मिती, प्रत्येक लहान घटकाच्या व व्यक्तीच्या सृजनशीलतेला प्राधान्य, उत्पादन व श्रम ह्या गोष्टी एकत्रित प्रक्रियेचा भाग असेल. त्यात पैसा व वित्तीय भांडवल यांना त्यांच्या योग्य जागी बसवलं जाईल!

कुमारप्पांच्या मते आज आपली गुंतागुंतीची/ व्यामिश्र जीवनशैली भांडवलशाही - औद्योगिकरणाला बळ देते, त्याच्यामुळे आपल्या साधनसंपदेवर वेळ व शक्तीवर अनावश्यक बोजा पडतो. एका उत्पादन व उपभोग दुष्टचक्रात आपण अडकतो. हे सर्व विज्ञान, विवेकयुक्त निर्णयप्रक्रियेच्या (रॅशनल डिसिजन) विरोधात आहे. यामुळे आयुष्यातील अनावश्यक तपशील, बोजे, गुंतागुंत, ताण, वेळ खर्च होत जातो. लाभ फक्त बाजाराचा व नफा लाटू पाहणाऱ्यांचा होतो. इतरांच्या जीवनशैलींचे अनुकरण करणाऱ्या बाजारू उत्पादनामुळे आपले उत्पादन व उपभोग यांची गुणवत्ता मात्र खालावत जाते. याशिवाय उत्पादनसाधन व उत्पादक शक्तींची विषमता वाढतच जाते. अशा भांडवलप्रधान, केंद्रीभूत व्यवस्थांमुळे नोकरशाही, तंत्रशाही, व्यवस्थापकशाही वाढत जाऊन सर्वंकष राज्याचा पगडा वाढत जातो. व्यक्तीची व समूहाची स्वायत्तता, सृजनशीलता, स्वातंत्र्य, सार्वभौमत्व यांचा ऱ्हासच होत जातो. बराकीकरण (स्टँडर्डायझेशन व रेजिमेंटशन), आळशी उपभोक्ता तयार करण्यास सर्वोदयाचा विरोध आहे.

भांडवली विकास व राज्याची सर्वंकषता यांचे अतूट नाते कुमारप्पा झगझगीतपणे स्पष्ट करतात. आजच्या नवभांडवलशाहीला युगांतर समजणाऱ्या लोकांनी कुमारप्पा (व गालब्रेथ) यांच्यासाग्ग्र्याचं निरीक्षणही करायला हरकत नाही. गांधी व सहकार्यांच्या सर्वोदयात उद्योगांना नाही तर आंधळ्या उद्योगवादाला विरोध आहे. यंग इंडियात (११/११/१९३१) गांधी म्हणतात, हा उद्योगवाद, माणसाची शोषण करण्याची क्षमता, परदेशी बाजार व स्पर्धकांचा निःपात-मक्तेदारी यांवर अवलंबून असतो.

भारताला इतर राष्ट्रांचे शोषण करावे लागेल... ते मला अमान्य आहे.

म्हणून अर्थव्यवस्थेचे नियोजन गावपातळीवर व्हावे, लहानातल्या लहान व्यक्तीच्या उत्पादकतेला वाव मिळेल, उत्पादनांची विविधता वाढेल, व व्यक्तींमधील अनेक शक्यतांना वाव मिळेल - बराकीकरण नसेल असे नियोजन हवं. लोकांच्या खऱ्या गरजांवर आधारित नियोजन असावे. उद्योगपतींना व भांडवलदारांना काय खपवायचे आहे, त्यांवर नव्हे, जर स्थानिक स्तरांवरच लोकांच्या गरजांची पूर्ती होऊ शकेल तर त्याला उत्तेजन द्यावे.

नियोजन व उद्योगांविषयी इतका स्पष्ट विचार आज अधिकच आवश्यक आहे. अर्थात, त्यात शेती, पशुपालन, खते, ऊर्जा यांना अधिक महत्त्व आहे. गांधींनी यंग इंडिया व हरिजनमधून जितकी पाने अस्पृश्यतानिवारण, हिंदु-मुस्लिम प्रश्न, पशुपालन, शेणखते कशी बनवावी, आहार, आरोग्य सांडपाणी व्यवस्था, नई तालीम यांवर खर्च केली असतील तेवढी त्यांची काँग्रेसने स्वराज्याची बोलणी कशी करावीत यावर क्वचितच असतील.

### यंत्र व विज्ञान

यंत्राचे त्याचे स्थान आहे; ते जाणार नाही. माझ्या घरेलू उद्योगाच्या यंत्रात मदत होईल, ती सर्व सुधारणा मला हवी आहे. मात्र लाखो शेतकऱ्यांना त्यांच्या रोजगाराचे दुसरे स्थान नसेल तर त्या यंत्रातून मानवी श्रमाचे उच्चाटन होणे मला मंजूर नाही. मी सर्व यंत्राच्या विरोधात नाही, तर त्याच्या बेसुमार व अविचारी वाढीच्या विरोधात आहे. यंत्रांच्या चमकधमकेमुळे मी स्तंभित होणार नाही. सर्व प्रकारच्या विनाशकारक यंत्रांच्या विरोधात मी आहे. मात्र लाखो लहान माणसांचा बोजा कमी करणाऱ्या साध्या व कुणालाही चालवता येणाऱ्या यंत्रांचे मी स्वागत करतो. (यंग इंडिया १७/६/१९२६) गांधींच्या दृष्टीने श्रमाची बचत करण्याच्या नावावर लाखो लोकांचा रोजगार काढून घेणारं तंत्रज्ञान शेवटी काही थोड्यांच्या हातात संपत्ती केंद्रित करते. ही संपत्ती सर्वांच्या हातात असली पाहिजे. विज्ञानाने फक्त अधिक लोभासाठी व लाभासाठी यंत्रे बनवण्याऐवजी कामगारांचे अतिश्रम कमी करण्यावर भर दिला तर त्याचा उपयोग होईल.

त्यांच्या विकेंद्रित उद्योगांच्या संकल्पनेत रोजगार व ग्राहकांच्या पसंतीची वेगवेगळी उत्पादने यांना वाव असेल. जातिव्यवस्थेतील उत्पादन जातींची कौशल्यं इतर जातींनीही शिकावीत व ती कौशल्ये गावात टिकवावीत; नवी मूल्ये त्यांच्यानुसार ढाळावे लागेल. त्यांच्यात विज्ञान व आधुनिक नई तालीममधून शिक्षणाच्या रुपाने असे कितीतरी व्यवसाय उन्नत स्वरुपात विकसित करता येतील. त्यात पशुपालन, दुग्धोत्पादन, घाणीतून खाण्याच्या तेलाची निर्मिती, हातसडीचे धान्य (तांदूळ इत्यादी) गूळ, खांडसरी, मधमाशी-पालन, कातडे कमावणे, साबण, हातकागद, नवी गाव औषधे, संगीत वाद्ये, खेळ, शेणखते, ग्रामीण प्रसूतीगृह, नई तालीम, अशा अगणित उद्योगांच्या व सेवांच्या शक्यता आहेत.

सर्वोदयाचा विज्ञानाविषयी मूलभूत विचार विनोबांनी पुढे नेला. विनोबांच्या अनेक दृष्टी अत्यंत मूलगामी आहेत. राज्यसरकार, विज्ञान, यांविषयी त्यांचे विचार एका नव्या आधुनिक युगात कशा तऱ्हेने विचार-आचार असावा त्याचे व्यावहारिक दर्शन आहे. विज्ञान किंवा प्रगती यांना ते मुळीच नकार देत नाहीत, किंवा जय जगत म्हणणारे विनोबा संकुचित अर्थाने स्वदेशी कधीच नव्हते. त्या दृष्टीने मराठी संतांच्या वैश्विक दृष्टीचे ते पाईक होते. ☑☑☑

---

- रमाकांत आर्ते
शांतिमित्र
मु.पो. देवरुख 415804
ता. संगमेश्वर
जि. रत्नागिरी
मो. 9423818337

गोवंशहत्या बंदी हा माझ्या दृष्टीने आर्थिक प्रश्न आहे. गाय वाचेल तर दूध मिळेल आणि बैल वाचेल तर अन्न मिळेल. असे याचेशिवाय आध्यात्मिक वा भावनिक असा कोणताही याच्याशी संदर्भ नाही. तसा असू नये असे मला वाटते.

- रमाकांत आर्ते
(सर्वोदय कार्यकर्ता)

दि. 1 [illegible] 2007
पुणे.

[illegible]

(जयवंत मठकर)
गोपुरी आश्रम
कणकवली (सिंधुदुर्ग)

[illegible]

'समाजवादी शील आणि विश्वस्तवृत्ती' या चर्चासत्राच्या (पृ० ५७-५८ पहावे) आधी आणि चर्चासत्र संपल्यानंतर काही वेळ गोवंश हत्याबंदीचा प्रश्न सहज चर्चेला निघाला. मुख्य प्रश्न गोवंश हत्याबंदीच्या प्रश्नाचा विचार केवळ आर्थिक बाजूचा विचार करून करावा की धार्मिक सांस्कृतिक आदि अंगांनीही त्याचा आग्रह धरावा असा होता. सर्वोदयी कार्यकर्ते श्री० रमाकांत आर्ते यांनी आपली भूमिका लेखी स्वरुपातच मांडली आहे. त्यावर बैठकीतील दोनतीन अनुकूल तटस्थ वृत्तीच्या सह्या तेथेच दिल्या आहेत.

मुख्य प्रश्न सर्वोदयी धोरणाचा आहे. त्या वृत्तीच्या लोकांनी आपली अनुकूल प्रतिकूल मते कळविल्यास 'नवभारता'त ती नामावली प्रसिद्ध करता येईल.

- देवदत्त दाभोलकर






# विनोबा आणि आणीबाणी

## वसंतराव बोंबटकर

१३ नोव्हें.च्या 'समर्थ'च्या अंकात आणीबाणीच्या वेळच्या विनोबांच्या संदिग्ध भूमिके-बद्दलचा उल्लेख आहे. खरोखरच याबाबत विनोबांबद्दल अनेक तर्ककुतर्क व्यक्त झाले आहेत. वास्तविक विनोबाजींना गांधीजींना लाभले तसे समर्थ सेक्रेटरी लाभले असते तर हा गोंधळ राहिला नसता. विनोबा-जयप्रकाश विवाद, 'विनोबाजी व आणीबाणी' या दोन्ही विषयांसंबंधी मी निकटचा साक्षी राहिल्याने माझी माहिती आहे. (तशी इतरांचीही असेल) ती मी या पत्राद्वारे स्पष्ट करीत आहे.

जळगावला सर्व सेवा संघाची (कार्यकारिणी) बैठक होती. बिहारच्या भ्रष्टाचारविरोधी आंदोलनात जयप्रकाश नुकतेच सहभागी झाले होते. तेव्हा सुश्री. निर्मलाबहन देशपांडे यांनी विनोबांचे नावाने जाहीर केले होते, की सत्याग्रह न करता सर्वोदय कार्यकर्त्यांनी शांततामय रचनात्मक काम तेवढे करावे. तेव्हा सर्वसेवा-संघाचे मुखंड असे सहासात (आचार्य राममूर्ती, प्रा. बंग, श्री. मनमोहन चौधरी, श्री. जगन्नाथजी व वसंत बोंबटकर) विनोबांना प्रत्यक्ष पवनारला भेटले. तेव्हा विनोबा म्हणाले, 'सत्याग्रहाला मी कधीच नाकारले नाही. तो कोणी, केव्हा, कसा व कशासाठी करावा हा स्वतंत्र विषय आहे. नंतर म्हणाले, 'माझा जयप्रकाशजींनी चालविलेल्या बिहारच्या भ्रष्टाचारविरोधी आंदोलनाला पण विरोध नाही. पण त्याला मर्यादित ठेवावे, केंद्र सरकार कमजोर होईल, असे काही करू नये. माझ्याकडे बोट दाखवून म्हणाले, हा बोंबटकर महाराष्ट्रात भ्रष्टाचारविरोधी चळवळ उभारेल तर माझी त्याला मदत मिळेल.' येवढा खुलासा झाला. सर्वजण खुश झाले.

योगायोगानं त्याचवेळी सुश्री. निर्मला देशपांडे तेथे येताच विनोबाजी म्हणाले, 'ही निर्मला इंदिरा गांधीला देवता समजते. राजगादी सोडून समाजसेवेला ती वाहून घेईल तर मी मानेन की ती दैवीगुणसंपन्न आहे. ती तर म्हणते माझा बाप साधू होता. मी राजकारणी आहे.'

विनोबाजी आमचेकडे बघून म्हणाले, 'याचा अर्थ तुम्हाला कळला का?' व स्वतःच बोलले 'पंडित नेहरू खोटे बोलू शकत नव्हते; कोणाचा द्वेष करू शकत नव्हते.' उपरोधाने म्हणाले, 'इंदिराजीमध्ये हे गुण भरपूर आहेत.'

लगेच दुसरे दिवशी मी विनोबाजींना भेटलो व विचारलं 'काल आपण मला उद्देशून बोलला ते केवळ तुमच्या विचाराचे समर्थाकरिता केलेले भाष्य आहे की मी ते कार्य उचललं तर तुम्ही मार्गदर्शन देणार आहात?' त्यावर विनोबाजींनी होकार भरला. विनोबाजींच्याच संमतीने मी महाराष्ट्रातील सर्व राजकीय पक्षांच्या पुढाऱ्यांना व समाजसेवकांना पत्र लिहिली. धुळ्याला भाई मदानेकडे बैठक निमंत्रित केली. तत्पूर्वी विनोबांच्या अनुमतीने मी बिहारच्या चळवळीचे अध्ययन करण्यासाठी व जयप्रकाशजींचा सल्ला घेण्यासाठी गेलो. जयप्रकाशजींनी सल्ला दिला की महाराष्ट्रात वेगळे आंदोलन तूर्त करू नका. बिहारमध्ये ज्यांना शक्य आहे त्यांनी आमच्या मदतीला यावे. परतल्यावर श्री. एस.एम.जोशी व अन्य प्रमुख मंडळींसमोर धुळ्याच्या बैठकीत जयप्रकाशजींचा विचार ऐकल्यावर महाराष्ट्रात आंदोलन न करण्याचा व बिहारात मदतीला जाण्याचा विचार पक्का झाला.

या घटना घडण्यापूर्वीच विनोबा - जयप्रकाश - सर्वसेवासंघ या तिहींच्या मत-मतांतराबाबत मी एकट्याने विनोबाजींशी सातत्याने तीन दिवसात पाच वेळा बैठकीत चर्चा केली. सार होते की सर्वसेवा संघाने समाजात जे दैनंदिन प्रश्न निर्माण होतात त्यात स्वतःला अडकवून घेऊ नये. हे प्रश्न हाताळणारे अनेक पुढारी पक्ष आहेत. आपले काम आहे 'जुन्या चांगल्या मूल्यांचे रक्षण व कालानुरुप नव्या मूल्यांचे सर्जन.'

बिहार आंदोलनावर त्यांचा तोडगा होता की जयप्रकाशजी व सरकारने एकत्र बसून मुद्दे निकालात काढावे व जे मुद्दे अनिर्णित राहतील त्याबाबत तडजोड करण्यास माझी मदत त्यांना मिळू शकेल. पण तसे काही घडले नाही.

### बिहारआंदोलन

जयप्रकाशजींनी विद्यार्थी-नेत्यांच्या बैठकीत या आंदोलनात सहभागी होण्याचा ज्या दिवशी संकल्प सोडला

अनुक्रमणिका






त्यावेळी योगायोगाने प्रा० बंगजी, सुमनताई बंग व मी जयप्रकाशजींकडेच मुक्कामी होतो. आसाम प्रांतातील कार्यक्रम करुन आलो होतो. आम्ही त्यांना भेटताच ते म्हणाले 'चीड़ा चीड़ीने घोंसला बनाया चिड़ियाँ उड़ गयी।' (प्रभावती स्वर्गवासी झाल्या होत्या.) जयप्रकाशजींच्या डोळ्यांतून गंगायमुना प्रवाहित झाल्या. पुढं म्हणाले, 'उसने मुझे इन्सान बनाया। वे होती तो आपका आगत-स्वागत होता। लोग कहते हैं (इंदिराजी) उसके पास पैसा कहासे आता हें? आप जानते है मैंने अपनी सारी जमीन जायदाद दान में दी। मॅगसेसे ॲवॉर्ड मिला उस पुंजी से माहवार चारसो रुपये मिलते हैं। कोई मित्र अनाज, कोई कपडे, कोई दाने दे जाता हें। प्रभावती जाने वे कैसी घरग्रहस्थी इतने से चलाती होगी?'

बिहारच्या मदतीला महाराष्ट्रातून अनेक युवकयुवती गेल्या. माझ्याकडे उत्तर बिहारचे पाच जिल्ह्याचे काम सोपविण्यात आले. सिनेमा, दारुगुत्ते, परीक्षा यावर बहिष्कार, ३ ऑक्टो. ते ५ ऑक्टो. रेल्वे बंद, तेहेतीस आमदारांचे राजीनामे, लाखोंनी सह्या हे सर्व लोकमत प्रगटीकरणाचे कार्यक्रम करुनही पोलिस, राज्यपोलिस, सी.आर.पी. बॉर्डर सिक्युरिटी फोर्स यांच्या लाठ्या-काठ्या-बंदुका सहन करुन शंभराचे बळी देऊनही सरकार नमत नाही हे बघून अंतिम उपाय म्हणून ४ नोव्हें. १९७४ ला बिहारातील मतदारांनी पाटणा येथे येऊन आपल्या मतदार क्षेत्रातील आमदारांना राजीनामा देण्यास समजवावं असा कार्यक्रम ६-७ ऑक्टो. ला ठरला. लाखो लोक येण्याची शक्यता बघून इंदिराजींना केंद्रीय मंत्री दिनेशसिंह यांना जयप्रकाशजींना भेटून दिल्लीला येण्याचे निमंत्रण पाठविले.

जयप्रकाशजींनी तातडीची प्रमुखांची बैठक बोलाविली. म्हणाले, 'इंदिराजींच्या सोबत वाटाघाटी सफल न झाल्यास मला अटक होऊ शकते. तसं झालं तर माझ्या अनुपस्थितीत त्या आंदोलनाचं संचालन,

१. श्री. ठाकुरदास बंग यांनी चालवावं. त्यांना अटक झाली तर,

२. श्री. वसंतराव बोंबटकर त्यांची जागा घेतील. त्यांना अटक झाली तर,

३. गांधी स्मारक निधीचे सेक्रेटरी नंतर संघर्ष-वाहिनीचा तरुण,

अशी क्रमवारी त्यांनी लावली. जयप्रकाशजी दिल्लीत पोहोचताच बिहार आंदोलनातील प्रमुख प्रसिद्ध मंडळीना अटक करुन हद्दपार केले. जबाबदारी माझ्यावर पडली. सभांवर बंदी. पाटणा शहरापासून वीस मैल अंतरापर्यंत कठडे उभारण्यात आले. पाटणा शहरात तर पोलिसांची जीप जाण्याइतपत रस्ते बंद. तीन तारखेपासून स्टीमर, मोटारी बंद करुन हेलिकॉप्टरनं पहाणी, पाटणा शहराला पोलिसांच्या छावणीचे रुप आले. हे असे होणार याचा सुगावा खबऱ्याने मला देताच १ नोव्हेंबर पासूनच एक लाख पाटण्यात येतील अशी व्यवस्था करुन ठेवली होती. ३ नोव्हें. ला सायंकाळी जयप्रकाशजी आले. वाटाघाटी फिस्कटल्या. 'गुजरात सरकार बरखास्त करण्याची चूक मी एकदा केली. बिहार सरकार बर्खास्त करण्याची चूक मी पुन्हा करणार नाही,' असा इंदिरा गांधींनी आपला निर्धार व्यक्त केल्याने ४ नोव्हें. ला ठरल्याप्रमाणे स्वतः जयप्रकाशजी जीपमध्ये बसून सत्याग्रहासाठी निघाले. त्यांच्या मागे ट्रेलरवर पाठविलेल्या मुली मार खाऊन परतल्या. त्यांचे सेक्रेटरी व सहाय्यक यांना त्यांचेपासून अलग करण्यात आले. स्वतः जयप्रकाश अश्रुगोळा हेलिकॉप्टरमधून टाकण्यात आल्याने बेशुद्ध झाले. सावध झाल्यावर परत चालू लागल्यावर लाठीहल्ल्यात जखमी झाले. अश्रुगोळ्यांचा मारा, लाठीहल्ला असे निःशस्त्र नागरिकांसोबत तुंबळ युद्ध पोलिसांनी पुकारले.

मी जागोजाग खबरे ठेवले होते. सकाळी उठल्यापासून फोनवर बसून कार्यक्रमांचे संचालन करीत होतो. दुपारी दोन वाजता खबऱ्याने कळविले की आता जयप्रकाशजी एकटेच पडले आहेत. थकले आहेत. झाडाचा आसरा घेत आहेत.

मी लगेच गृहमंत्र्यांना फोन केला. जयप्रकाशां-च्या पोटात अन्न नाही. नित्याची औषधे त्यांना मिळाली नाहीत. लाठीचे मार पडले आहेत. त्यांना काही बरेवाईट झाले तर तुम्ही त्यांची हत्या करविल्याचा आरोप तुमच्यावर लावू. तेव्हा ठरले की जयप्रकाशजींच्या डॉक्टरांना त्यांचेपर्यंत जाण्याची व्यवस्था सरकार करेल.

डॉक्टरांना मी विनंती केली की आपण जाताना सोबत काही तरुण तरुणींना न्या. साधारणतः सायंकाळ पाचची वेळ. जयप्रकाशजींचे सेक्रेटरी म्हणाले, तू सकाळी आठपासून फोनवर बसला आहेस. आता बाहेर ये. गाडीत जयप्रकाशजींना घेऊन पोलिस आले आहेत. मी बघतो -

अगदी थकल्या क्षीण आवाजात बसच्या पायदानावर उभे राहून जयप्रकाशजी समोर जमलेल्या लोकांना






सांगत आहेत...

'इंग्रजांच्या विरुद्ध मी अनेक लढाया लढलो. परंतु त्यांनीही माझ्याशी असे गैरवर्तन कधी केले नाही. बिहारचे सरकार माझ्याशी असे वर्तन कधीच करु शकत नाही. आजचे आयोजन केंद्र सरकारने केले आहे व पुटपुटले, 'विनाशकाले विपरितबुद्धी' व नंतर गरजले 'ए दिल्ली की रानी अब नहीं चलेगी तेरी मनमानी।' आणि म्हणाले, 'आजपासून आमची लढाई दिल्ली सरकारशी.'

विनोबाजींनी जी अपेक्षा वर्तविली होती की दिल्लीपर्यंत हा लढा नेऊ नका. ती मर्यादा तुटली. विनोबांचा तर्क एवढाच होता की बांगला देशची निर्मिती भारताच्या मदतीने झाल्याने पाकिस्तान-चीन व अमेरिका यांचा भारतावर राग आहे. भारताला अडचणीत आणण्याचे ते एखादे निमित्त करतील. तेव्हा केंद्रसरकार कमजोर होईल असे आपण काही करू नये.

**आणीबाणी**

२६ जूनला आणीबाणी जाहीर झाली. पोलिसदूत व फौजेला बंड करण्यास चिथावणी देत आहे असा आरोप करुन. याचा शोध घेण्यासाठी थोडे मागे जाऊया.

१५ ऑगस्ट १९७४ ला बिहार आंदोलन समितीच्या आवाहनावरून सरकारी कार्यक्रमांऐवजी स्वतंत्र कार्यक्रमात जनता, इतकंच काय तर एन.सी.सी. चं पथक सामील झालं होतं. रिक्षाचालक, भंगीकाम करणारे यासारख्या सामान्यातिसामान्य नागरिकांना झेंडा फडकविण्याचा बहुमान देण्यात आला होता. चिडून तेथे लाठीहल्ले झाले. झेंड्याचा अपमानही झालेला होता. त्यांच्या बातम्या वर्तमानपत्रात सचित्र छापून आल्या होत्या.

विनोबांच्या अनुमतीने जेव्हा मी या आंदोलनाचा अभ्यास करण्यास गेलो तेव्हा जयप्रकाशजींचे सर्व पत्रव्यवहार व वर्तमानपत्राचे कटिंग्ज मला दिले. तीन दिवस अभ्यास केल्यावर मी त्याचे टाचण २१ मुद्द्यांचे तयार केले. जाहीर सभेत लाखो लोकांसमोर माझ्याजवळून घेऊन जयप्रकाशजींनी ती वाचून दाखविली. नंतर म्हणाले, या सभेत आलेल्या लोकांनी याचा विचार करावा. पी.यु.सी.एल. व मानवतावादी संघटनांनी स्वतः येऊन येथील परिस्थिती बघावी. आपले मत द्यावे. पोलिस व सरकारी अधिकारी हे कोणा व्यक्तीचे खाजगी नोकर नाहीत. राष्ट्रध्वज, राष्ट्राची घटना यांचे रक्षण करण्याची जबाबदारी त्यांचेवर आहे. तेव्हा घटनाविरोधी हुकूम त्यांना कोणी दिले तर ते पाळण्याची जबाबदारी त्यांचेवर नाही. माझे हे म्हणणे चुकीचे असेल तर सरकारने कोर्टात माझ्यावर खटला चालवावा. आपल्या निवेदनाच्या पुष्टीसाठी ते म्हणाले, व्हिएतनाम मध्ये एक संपूर्ण गाव अमेरिकेच्या सैनिकांनी पेटवून बेचिराख केले तेव्हा अमेरिकेतील काही मानवतावाद्यांनी कोर्टात या सैनिकांविरुद्ध खटला भरला. आपला बचाव न्यायधिशासमोर करताना ते सैनिक म्हणाले, वरच्या अधिकाऱ्यांच्या हुकुमांची तालीम करावी या शिस्तीनुसार आम्ही हे काम केले. न्यायधिशानं न्याय केला की अमेरिकेच्या घटनाविरोधी आदेश देऊन अधिकाऱ्यांनी गुन्हा केलाच पण तुम्हीसुद्धा घटनाविरोधी कृत्य केल्याचे दोषी आहात. जयप्रकाशजींनी खेद व्यक्त केला की बिहारात सर्रास घटना पायाखाली तुडविली जात आहे. याच सभेत त्यांनी आमदारांना जुलमी शासनाचे विरोधात राजीनामा देण्याचे आवाहन पण गेले. त्यावेशी शासनाने जयप्रकाशजींवर खटला भरला नाही. पण २६ जून ७५ ला मात्र तोच आरोप ठेवून आणीबाणी जाहीर केली.

**विनोबा व आणीबाणी**

त्याच दिवशी रात्री मी वर्धा शहरात विरोधी पत्रके लावण्याचे काम चार तरुणांना (त्यात एक श्याम मानव) सोपवले त्यांना रात्रीच अटक झाली. विनोबाजींना भेटायला गेलो तेव्हा श्रीमन्नारायण अग्रवाल (माजी प्राचार्य, प्लॅनिंग कमिशनचे सदस्य) दिल्लीहून विनोबांना भेटायला आले. आणीबाणी हे अनुशासनपर्व आहे असे पोस्टर्स सरकारने तुमच्या नावाने दिल्लीभर लावल्याचे सांगितले. नंतर दादा धर्माधिकाऱ्यांनी याला दुःशासनपर्व म्हटले. विनोबांनी खुलासा केला की महाभारतातील शांतिपर्वात अनुशासन म्हणजे ऋषिमुनींचे शासन या अर्थाने मी बोललो. मी म्हणालो की वर्तमानपत्रात हा खुलासा पाठवू का? विनोबा म्हणाले या सेन्सारशिपच्या जमान्यात कोणी छापणार नाही. परंतु विनोबाजींच्या सेक्रेटरींनी ठिकठिकाणी पत्र पाठवून हा खुलासा करायला हवा.

विनोबांना याविरुद्ध काही पाऊल उचलण्या-संबंधी विचारले तेव्हा जे कोणी विचारीत त्यांना विनोबा म्हणत Wait & see. तरी ज्यांनी त्याविरुद्ध कृति करण्याचा आपला निर्धार सांगितला तर त्याला त्यांनी अडवले नाही. विनोबांना








वाटलं ही क्षणिक घटना आहे. १५ ऑगस्टला ती उठेल. ११ सप्टेंबर ला, २ ऑक्टोबरला ती उठेल असा कालहरण करणारा संकेत त्यांना मिळत होता.

विनोबाजींच्याच आश्रमातील दोघेजण व इतर आठजणांना घेऊन २ ऑक्टो.ला दिल्लीला इंदिरा गांधींच्या उपस्थितीत आम्ही घोषणा सत्याग्रह केला. त्यासाठी साडेसहा महिने शिक्षा भोगली. दिल्ली जेलमध्ये असताना विनोबांनी मला निरोप पाठविला की जेलमध्ये गडबड करु नको. तब्बेत सांभाळ. दिल्ली जेलचे व शहरातील अनेक अनुभव सांगण्याजोगे आहेत पण ते सध्या विस्तारभयास्तव लिहीत नाही.

एप्रिलमध्ये दिल्ली जेलमधून सुटून आल्या-बरोबर दुसऱ्या दिवशी विनोबांना भेटलो. ते मला तत्काळ म्हणाले, 'तू पुन्हा सत्याग्रह का केला नाही?' मी चकित झालो व लगेच म्हणालो आता तुम्हाला सोबत घेऊन करायचा आहे. विनोबा म्हणआले, 'मीसुद्धा जेलमध्ये आहे.' या मधल्या काळात विनोबांनी मौन सुटल्यावर आचार्य परिषद आचार्य श्रीमनजींकडून भरविली होती व त्या परिषदेत आणीबाणी उठवा, जेलमधून कार्यकर्त्यांची सुटका करा व निष्पक्ष निवडणुका घ्या असे ठराव पास करविले होते. ह्याला उद्देशून देशात असे अनेक आचार्य आहेत. आम्हाला लोकांनी निवडून दिले आहे अशी घमेंडखोर घोषणा इंदिराजींनी पत्रकारासमोर केली.

मैत्री पत्रिका जप्त करणे, त्यांची टपालात टाकलेली पत्रं फाडून टाकणे, त्यांना भेटणारांचा पाठलाग करणे, आश्रमात बिनावर्दीवाले पोलिस ठेवणे हे सर्व चालूच होते.

दुसऱ्यांदा मी सत्याग्रह करून नागपूर जेलमध्ये गेलो तेव्हा जामिनावर सुटून आल्यावर आमरण उपोषण करणाऱ्या कार्यकर्त्यांचा जत्था तयार करण्यासंबंधी विनोबाजींशी चर्चा केली. त्यांनी विरोध केला नाही. इतकेच म्हणाले, या परिस्थितीत हे कसे व्यवहार्य होईल? जयप्रकाशांना मुंबईला ते हॉस्पीटलमध्ये असताना दिल्ली जेलमधून आल्यानंतर व नागपूर जेलमधून सुटल्यानंतर पुन्हा भेटलो व कामाबाबत चर्चा झाली.

जयप्रकाशजी अटकेत असताना व ते मरणासन्न आहेत असे कळल्यावर विनोबांनी श्री. देवेंद्रभाई गुप्तांना लगेच दिल्लीला पाठवून जयप्रकाश यांची सुटका करण्याचा निरोप दिला. तो पोहोचण्याआधीच जयप्रकाशना सोडून देण्यात आले.

### विनोबाजींची भूमिका

आणीबाणी ही टेंपररी आहे असा आभास निर्माण करण्यात आला होता. त्यामुळे काही काळ विनोबा धीर धरून राहिले. पण काळ जसा लांबत गेला तशी त्यांची अस्वस्थता वाढत गेली. व आचार्यकुल परिषदेत त्यांनी स्पष्ट भूमिका घेतली. या मधल्या काळात ते इतके शांत कसे राहिले याबाबत खुलासा असा की विनोबांनीच सांगितले (खाजगीत) मी जनतेचा रोष व मित्रांची असहमती हे हलाहल का प्यालो? तटस्थ राहिल्याने मला वाटले होते मी काही मार्ग काढू शकेन. मी जेव्हा बघितले की आणीबाणी उठत नाही व इंदिराजी ब्रेझनेव कोसिजनिच्या कह्यात जात आहे तेव्हा माझा धीर सुटला व मग मी हालचाल सुरु केली.

मी जेलमधून सुटून आल्यावर माझे मित्र सुधाकर नाईक (जे पुढे मुख्यमंत्री झाले) त्यांना भेटलो व विचारले की तुम्ही कॉंग्रेसवाले सभा बोलवायचे व कम्युनिस्ट पुढारी कॉंग्रेसला शिव्या व इंदिराजींची तारीफ करायचे तेव्हा आम्ही टाळ्यासुद्धा वाजवीत होतो. कारण देशांतर्गत असंतोष, अमेरिका-पाकिस्तान यांची भारताविरुद्ध युती अशा स्थितीत रशियाचा आधार वाटत होता. व कम्युनिस्टांनी याचा पूर्ण फायदा उठवला,

हे सर्व मागचे पुढचे संदर्भ लक्षात घेऊन विनोबाजींकडून मत बनविणे योग्य होईल असे मला वाटते. मला व्यक्तिगत अनुभव आलेत, त्यावरून विनोबा जयप्रकाश यांच्यात बोलले जाते तेवढा विरोध नव्हता. दोघांची भिन्न प्रकृती, कार्यपद्धती लक्षात घ्यायला पाहिजे.

आमची साम्ययोगसाप्ताहिकाचे दैनिक करण्याची सर्व सिद्धता झाली होती. माझ्याकडे कार्यकारी संपादकाची जबाबदारी होती. नेमक्या त्याचवेळी १९६४, विनोबांचा दौरा विदर्भात सुरु झाल्याने तो विचार विनोबांच्याच इच्छेने मागे पडला. १९७४ साली जेव्हा विनोबा-जयप्रकाश मधील मतभेदाचे विकृतीकरण इकडल्या दैनिकांनी केले तेव्हा विनोबा मला स्वत: म्हणाले, 'अरे आपले दैनिक आज असते तर लोकांना वस्तुस्थिती कळली असती.'

सांगण्यासारखे पुष्कळ असले तरी येथेच थांबतो.

☑ ☑ ☑






# १९६४ आणि नंतर

## सर्वांविषयी सहभाव, कोणाविषयी द्वेष नाही

### बर्ट्रांड रसेल

जवाहरलाल नेहरु हे एक आगळेवेगळे व्यक्तिमत्त्व होते. त्यांनी आपल्या अगदी किशोरावस्थेपासून भारताच्या जडणघडणीसाठी आपली श्रद्धा जोपासली होती. आयुष्यातील अनेक वर्षे आपल्या राष्ट्राच्या सेवेसाठी तुरुंगात घालविल्या नंतरही त्यांची ही श्रद्धा अढळ राहिली होती. ती त्यांची एक सहजप्रवृत्ती होती.

आपल्या देशाला परकीय सत्तेपासून मुक्त करण्यासाठी व आपल्या देशातील दुःख, दैन्य, दारिद्र्य दूर करण्यासाठी नेहरुंनी आपल्या आयुष्यातील चौदा वर्षे तुरुंगात काढली हे आपणा पाश्चिमात्यांच्या सहसा लक्षात येत नाही. ही करणे दुष्कर आहे. आपल्या भूमिकेत थोडीशी लवचिकता आणली तर आपली सुटका सहज करुन घेता येईल याची जाणीव असताना तर अशी भूमिका घ्यावयास विशेष प्रकारचे धैर्य लागते. मी काही वर्षे लंडनमधील 'इंडिया लीग' चा अध्यक्ष होतो. त्या काळात जवाहरलाल नेहरु ज्या पद्धतीने आपल्या देशाचे नेतृत्व करीत होते व त्याला योग्य दिशा दाखविण्याचे कार्य करीत होते, त्याचा मला प्रत्यय आला.

भारत स्वतंत्र झाल्यानंतर ज्या देशाने भारताला पारतंत्र्यात ठेवले व व्यक्तिशः स्वतःलाही तुरुंगात डांबले, त्याच्याविषयी सूक्ष्म अशी देखील कटुतेची भावना त्यांनी आपल्या मनात बाळगली नाही. हे विशेष आहे. अमेरिका आणि रशिया यांच्यामध्ये सुरु असलेल्या वेड्या संघर्षात त्यांनी निःपक्ष भूमिका घेतली आणि अखिल मानवतेच्याच हिताची काळजी वाहिली.

अनेक प्रकारच्या अडचणी आणि दबाव येत असताना त्यांनी मध्यस्थाची भूमिका घेतली. दोघांच्यापैकी कोणाच्याही पारड्यात आपले वजन टाकले, तर भरघोस आर्थिक आणि लष्करी मदत मिळण्याची शक्यता असतानाही त्यांनी आपली भूमिका कायम राखली. यांतूनच 'नॉन अलाईंड' (तटस्थ) राष्ट्रांचा गट उभा राहू शकला. आणि सर्वंकष युद्धापासून मानवता वाचण्याची शक्यता निर्माण झाली. भारताने हे धोरण अवलंबले नसते व या गटाचे नेतृत्व केले नसते, तर असा गट निर्माण होऊ शकला नसता व संघर्षाचे ताण कमी करण्यासाठी कोणीच मध्यस्थ राहिला नसता.

#### लोकशाही राज्य

नेहरुंचे या खेरीजही एक मोठे योगदान आहे. ते सहसा आपल्या लक्षात येत नाही. भारतातील परिस्थिती हुकुमशाहीच्या आगमनाला प्रोत्साहक होती. देश निरक्षर होता, दरिद्री होता, अज्ञान-ग्रस्त होता, रोगराईने गांजलेला होता. भारत हा एक खंडप्राय देश होता. त्यात अनेक प्रांत होते, अनेक भाषा होत्या, अनेक धर्म आणि संस्कृती अस्तित्वात होत्या, देशाच्या विघटनाला ही पुरेशी कारणे होती. अशा वेळी त्यांच्या सारख्या लोकप्रिय नेत्याला आता हुकुमशाहीखेरीज हा देश वाचविण्याचा कोणताही अन्य मार्ग नाही असे जनतेला सांगून, सर्व सत्ता आपल्या हातात घेता आली असती.

नेहरुंनी तसे केले असते तर कायद्याचे राज्य व प्रतिनिधिक लोकशाही संस्था ज्या पद्धतीने इतर नव्याने उदयाला आलेल्या राष्ट्रांत कोसळत गेल्या, त्याच पद्धतीची भारताचीही दुर्गती झाली असती. आणि राष्ट्राचे संरक्षण व एकात्मता या नावाखाली भारतातील विविध संस्कृतींचे खच्चीकरण करुन, सांस्कृतिक राष्ट्रवाद अस्तित्वात आला असता, किंवा दुसऱ्या शब्दांत 'सांस्कृतिक हुकुमशाही' अस्तित्वात आली असती.

भारताने ज्ञानाच्या क्षेत्रात जागतिक संस्कृतीला दिलेले योगदान किती महत्त्वाचे होते याचे भान नेहरुंनी जगाला आणून दिले. त्यांची महता जगाला अजून पूर्णपणे आकलन झालेली नाही. परंतु मानवजातीचा संपूर्ण विनाश झाला नाही तर जगाला या महतेचे भान कधीना कधीतरी होईल असा माझा विश्वास आहे.

#### नेहरुंचे वर्चस्व

मागे वळून पाहता मलाही असे वाटते की काँग्रेसच्या








अनुक्रमणिका

समाजवादी व असमाजवादी या भागांपैकी असमाजवादी भागाचे नेतृत्व करुन, त्या भागाला आपल्या राजकारणाचे वाहक करण्यात नेहरुंनी चूक केली. स्वातंत्र्याचा लढा यशस्वी झाल्यानंतर उजव्या गटाच्या हातात काँग्रेसचे वर्चस्व गेले, त्यामुळे नेहरुंच्या हालचालींना मर्यादा पडल्या. उजव्या गटाच्या वर्चस्वाला त्यातल्या त्यात जी मर्यादा पडली ती केवळ नेहरुंच्या लोकप्रियतेमुळेच पडलेली होती. नेहरुंची लोकशाही समाजवादी प्रवृत्ती आणि काँग्रेसमधील उजव्या गटाची आर्थिक शक्ती यांची सांगड घालण्याच्या प्रयत्नामुळे भारताच्या आर्थिक प्रगतीचा वेग मंदावला आणि दारिद्र्य दूर होऊ शकले नाही. नेहरुंनी उघडपणे लोकशाही-समाजवादी गटाचे नेतृत्व करुन विरोधी पक्षाच्या बाकावर बसण्याचे मान्य केले असते, तर परिस्थिती वेगळी झाली असती असे मला वाटते. उजव्या गटाने नेहरुंना आपल्या स्वतःच्या धोरणात बंदिस्त करण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या आंतरराष्ट्रीय तटस्थतेच्या धोरणाचा पाठपुरावा करतानाही हे घडले आणि चीनविषयी सामंजस्याचे धोरण स्वीकारावे ही नेहरुंची भूमिकाही त्यांना पुढे रेटू दिली नाही. नेहरुंना स्वतःला याची जाणीव होती आणि समाजवादाकडे झुकणाऱ्या त्यांच्या विचारांना राजकीय क्षेत्रात व्यावहारिक आकार येण्याच्या आधी, त्यांचे निधन झाले ही दुर्दैवाची गोष्ट आहे.

### चीनशी संवाद

मे १९६४ मध्ये नेहरुंचे निधन झाले. त्याआधी काही आठवडे नेहरुंनी चीनबरोबर वाटाघाटी सुरू करण्याचा आपला मनोदय लोकसभेत स्पष्ट केला होता. मी त्यांचेकडे याविषयीचा एक मसुदा, एक वर्षापूर्वीच पाठविला होता. त्याच्या आधारे चर्चा करावयाची त्यांची तयारी होती. आधी अस्तित्वात आलेल्या सीमा-रेषेतच काही अलिकडे-पलीकडे करुन हा प्रश्न सोडविता येण्यासारखा आहे, असे आपले मत त्यांनी व्यक्त केले.

आपण ही घोषणा लोकसभेत केली असल्याचे नेहरुंनी मला पत्राने कळविले. आणि आपल्या निधनाच्या आधी काही दिवस काँग्रेस पक्षाच्या मध्यवर्ती समितीलाही आपले धोरण स्पष्ट केले.

पाकिस्तान आणि चीन यांच्याशी सीमा प्रश्नांबाबत असलेले आपले वाद शांततेच्या मार्गाने सोडवावेत अशी नेहरुंची इच्छा होती. काँग्रेसमधील कट्टर राष्ट्रवादी आणि उजव्या गटाच्या प्रखर विरोधामुळे त्यांना हे करता आले नाही. परिस्थितीचे दुर्दैव असे होते, की नेहरुंच्या धोरणाला त्यांनी वाढविलेल्या, त्यांच्याच पक्षाच्या लोकांनी तीव्र विरोध केला. नेहरुंना पक्षाघाताचा झटका आला, तेव्हा आपण निवृत्त झालो तर आपण वाचण्याची अधिक शक्यता आहे, हे त्यांना माहीत होते. परंतु त्यांचबरोबर त्यांना हेदेखील माहीत होते की केवळ तेच चीन आणि पाकिस्तान यांच्याशी काही समझोता करु शकले असते. आणि उजव्या गटातील काँग्रेसजनांचा पराभव करु शकले असते. त्यांनी शक्तीबाहेर श्रम घेतले, विश्रांतीचा सल्ला दिला गेला असतानाही, मुंबईला राजकीय बैठकींना हजर राहण्यासाठी धावपळ केली. पक्षांतील विविध गटांबरोबर चर्चा केल्या, आणि लोकसभेत व काँग्रेसच्या मध्यवर्ती समितीसमोर, वर सांगितल्याप्रमाणे आपल्या धोरणाची मांडणी केली. कॉमनवेल्थ राष्ट्रांच्या बैठकीलाही ते उपस्थित राहणार होते व मला त्यांनी तसे कळविलेही होते. आपण आपल्या मृत्यूला आमंत्रण देत आहोत, याची त्यांना कल्पना असावी असे मला वाटते. आज ते आपल्यात नाहीत, आणि त्यांच्या राजकीय कर्तृत्वाचे मूल्यमापन आपल्याला या क्षणी करावयाचे नाही. परंतु एक गोष्ट स्पष्ट आहे की चीनशी यशस्वी वाटाघाटीचा व पाकिस्तानबरोबर काश्मीर प्रश्न सोडविण्याचा काळ आता लांबणीवर पडला आहे.

(टाइम्स ऑफ इंडिया सौजन्याने,
मुक्त अनुवाद - सुमन दाभोलकर)

☑ ☑ ☑

## बदलता भारत

### जवाहरलाल नेहरू

१५ ऑगस्ट १९४७ या दिवशी भारत स्वतंत्र झाला. त्यापूर्वी स्वातंत्र्यासाठी भारताला दीर्घ काळ संघर्ष करावा लागला होता. परंतु तरीही स्वातंत्र्याचे आगमन शांततेत व सामंजस्याच्या वातावरणात झाले. पूर्वीच्या संघर्षातून निर्माण झालेले कटु वातावरण अचानक निवळले आणि शांततेच्या व मित्रत्वाच्या नवीन कालखंडाला प्रारंभ झाला. ब्रिटनबरोबरचे आपले संबंध मित्रत्वाचे झाले व इतर कोणत्याही देशाशी परंपरागत संघर्षाचे प्रश्न आपल्यासमोर नव्हते.








याआधीच्या तीन दशकात महात्मा गांधी भारताचे नेतृत्व करीत होते. त्यांच्या शांतता आणि अहिंसा या तत्त्वांचा केवळ काँग्रेसच्या कार्यकर्त्यांवरच नव्हे तर एकूण भारतीय जनमानसावरच प्रभाव होता. शांततेच्या मार्गाने भारताला स्वातंत्र्य मिळाल्याने, गांधीजींच्या विचारसरणीचा व कार्यपद्धतीचा विजय झाला होता. त्यामुळे भारताने अंतर्गत किंवा आंतरराष्ट्रीय राजकारणात कोणाही विषयी विद्वेषाची भावना मनात न बाळगता प्रवेश केला होता.

ऑगस्ट १९४७ मध्ये भारत स्वतंत्र झाला. परंतु त्याचवेळी पाकिस्तानचीही निर्मिती झाली. आणि त्यानंतर लगेचच सीमारेषेच्या दोन्ही बाजूंना महाभयंकर दंगेधोपे व कत्तली झाल्या. मोठ्या प्रमाणात निर्वासितांचे लोंढे निर्माण झाले. फाळणीचा निर्णय सामंजस्याने घेण्यात आला होता. आणि त्यामुळे ही दोन राष्ट्रे शेजारी म्हणून मित्रत्वाने सहकार्याच्या भावनेने राहतील अशी अपेक्षा होती. केवळ भौगिलिकच नाही, तर त्यांचा इतिहास, संस्कृती, भाषा आणि इतर अनेक गोष्टी यामध्ये त्या दोघांत समानता होती. त्यामुळे साहजिकच आम्हाला वाटले की, या दोन राष्ट्रांत मित्रत्वाची भावना नांदेल, परंतु तसे घडावयाचे नव्हते. फाळणीनंतर जे काही घडले त्यामुळे वातावरणातात एक तीव्र कटुता निर्माण झाली.

## विकास

आम्ही आमच्यासमोर असणाऱ्या महत्त्वाच्या प्रश्नांना हात घातला. ते प्रश्न आर्थिक व सामाजिक क्षेत्रातील आमच्या जनतेच्या विकासाचे प्रश्न होते. स्वातंत्र्य मिळण्याआधी या प्रश्नांविषयी आम्ही खूप चिंतन केले होते व आपल्याला नियोजनबद्ध विकासाची कास धरली पाहिजे, या निर्णयाला आम्ही आलो होतो. भारताकडे असलेली साधनसामग्री मर्यादित स्वरूपाची होती व तिचा, विकासाच्या विविध क्षेत्रातील विनियोग संपूर्ण क्षमतेने करण्याची आवश्यकता होती.

स्वातंत्र्य मिळाल्यानंतर स्वतंत्र भारतासाठी एक राज्यघटना बनविणे आवश्यक होते.यासाठी एक राज्यघटना परिषद अस्तित्वात आणण्यात आली. या राज्यघटनेने भारत हे एक सार्वभौम, लोकशाही प्रजासत्ताक राज्य असल्याचे घोषित केले. घटनेने देशातील सर्व नागरिकांना समाजिक, आर्थिक आणि राजकीय न्यायाची ग्वाही दिली. सर्वांना विचारस्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य, श्रद्धास्वातंत्र्य, समान प्रतिष्ठा आणि समान संधी यांचे आश्वासन दिले. या सर्वांतून प्रत्येक नागरिकाची प्रतिष्ठा सांभाळली जावी, सर्वांमध्ये बंधुभाव निर्माण व्हावा आणि राजकीय एकात्मतेचा विकास व्हावा अशी भावना होती.

२६ जानेवारी १९५० रोजी भारताच्या लोकसत्ताक राज्याची घटना अस्तित्वात आली आणि घटनेचे जे मुख्य ध्येय, ते साध्य करण्यासाठी आपले सर्व प्रयत्न सुरु झाले. राजकीय लोकशाही व आर्थिक न्याय एकसाथ प्रस्थापित करावयाचा असे आपले ध्येय होते. याला आपण समाजवाद असे नाव दिले. परंतु समाजवादाची कोणतीही एक पोथीनिष्ठ अशी व्याख्या आपण स्वीकारलेली नव्हती. सर्वसामान्य माणसाचे हित सांभाळले जावे आणि काही केवळ मूठभर धनिकांचा स्वार्थ साधला जाऊ नये असा आपला प्रयत्न होता. वयात आलेल्या प्रत्येक नागरिकाला आपण मतदानाचा हक्क दिला. आणि निवडून आलेल्या सदस्यांनी लोकसभेत चर्चेने धोरणविषयक निर्णय घ्यावेत असाही प्रयत्न केला.

## आपली कार्यपद्धती

पाश्चात्त्य देशांचा विशेषत: इंग्लंड आणि युनायटेड स्टेटस् ऑफ अमेरिका यांच्या राज्यघटनात्मक अनुभवांतून आपण खूर काही स्वीकारले होते. परंतु कोणाचीही आपण सही सही नक्कल केली नव्हती. भारताला स्वतःचा दीर्घ इतिहास आहे, परंपरा आहे. स्वतंत्र अस्तित्वाचे भान आहे. हे लक्षात घेऊन आपण बाह्य कल्पना व परंपरा यांना चिकटून राहणे मान्य केले नाही. जग झपाट्याने बदलते आहे याचे आपल्याला भान होते, आणि कोणत्याही झंझावाताने इकडेतिकडे फेकले न जाता, आपल्या मार्गावरील आपली प्रगती आपल्याला कायम राखावयाची होती.

आंतरराष्ट्रीय रचना बदलत होत्या आणि या बदलांत आपलाही काही सहभाग घ्यावयाचा होता. दुसऱ्या राष्ट्रांत ढवळाढवळ करावी किंवा त्यांच्यावर आपली मते लादावीत अशी आपली मुळीच इच्छा नव्हती. या पार्श्वभूमीवर भारताने आपल्या नवरचनेच्या कार्याला प्रारंभ केला. यासाठी आपण केलेले संस्थात्मक प्रयत्न इतके निर्णायक, प्रभावी व दूरगामी होते, की त्यांना क्रांतिकारीच म्हणावे लागेल. भारतीय परंपरा ही प्रामुख्याने स्थितीशील असल्यामुळे तर, ही क्रांतिकारिता विशेषत्वाने जाणवते.

आंतरराष्ट्रीय राजकारणात स्फोटक संघर्षाची










शक्यता अगदी क्षितीजाच्या निकट दिसत होती. अशा वेळी भारताने सातत्याने शांततेची आणि सहकाराची आणि समन्वयाची भूमिका घेतलेली आहे. स्वतंत्र भारताने आपली भूमिका विविध पद्धतीची ठेवली आहे. अंतर्गत क्षेत्रात लोकशाही पद्धतीने आर्थिक नियोजन आणि आंतरराष्ट्रीय क्षेत्रात दोन गटांपासून (रशिया व अमेरिका) अलिप्तता ही ती दोन धोरणे होत. ही धोरणे आपण काही अचानक रीतीने, किंवा केवळ हट्टाग्रहाने स्वीकारलेली नाहीत. भारताचा इतिहास आणि भारताची राष्ट्रीय परिस्थिती यांतून ती धोरणे निर्माण झालेली आहेत. जनतेचे जीवनमान उंचावणे हे भारतापुढचे प्रमुख आव्हान होते. व ह्यासाठी करावे लागणारे संस्थात्मक बदल आपल्याला जनतेला विश्वासात घेऊन व तिच्या सहकार्याने करावयाचे होते. आंतरराष्ट्रीय राजकारणात सर्वांशी स्नेहाचे संबंध ठेवावेत व जागतिक शांततेच्या प्रस्थापनेला मदत करावी, हे आपल्या धोरणाचे मुख्य सूत्र होते. ह्या धारणेच्या मागे भारताच्या अनेक शतकांचा इतिहास होता, स्वातंत्र्य संग्रामात आपण आचरलेल्या कार्यप्रणालीचा अनुभव होता, आणि सर्वात मुख्य म्हणजे महात्मा गांधीच्या शिकवणीचा प्रभाव होता.

### सुधारणा

या धोरणांना पुरेसे यश मिळाले आहे, असे मी म्हटले तर ते वावगे ठरणार नाही, असे मला वाटते. आज जगात अस्तित्वात असलेले भारत हे सर्वात मोठे लोकशाही राष्ट्र आहे. लोकशाहीला धक्का पोहोचू न देता भारताने आर्थिक परिवर्तनाचे अनेक कार्यक्रम हाती घेतले आहेत. त्या कार्यक्रमांना चांगली फळेही मिळू लागली आहेत. जमीन धारणेच्या क्षेत्रात आपण क्रांतिकारक बदल केलेले आहेत. आपला देश अजूनही मुख्यत्वेकरून शेतीप्रधान आहे. परंतु औद्योगिक क्षेत्रातही आपण लक्षणीय प्रगती केली आहे. उर्जानिर्मिती, वाहतूक, धरणे आणि कालवे यांचा झपाट्याने विस्तार होत आहे. आपल्या समान विकासाच्या कार्यक्रमातून ग्रामीण भागांत झपाट्याने परिवर्तन घडून येत आहे. पंचायत राज्य संकल्पनेचाही आपण यांतच समावेश केलेला आहे. यांतून सत्तेचे विकेंद्रीकरणही झालेले आहे. आणि लोकांचा आर्थिक विकासात सहभाग वाढलेला आहे. औद्योगिक व कृषि क्षेत्रातील उत्पादनात लक्षणीय वाढ झाली आहे.

या सुबत्तेचे परिणाम जनतेतील सर्व गटांना मिळावेत या दृष्टीने आपण प्रयत्नशील आहोत. शिक्षणाचा प्रसार होत आहे आणि पाच कोटीहून अधिक मुले व मुली शाळांतून, महाविद्यालयांतून शिक्षण घेत आहेत. विज्ञान आणि तंत्रज्ञान यांच्या विकासाकडे आपण विशेष लक्ष दिले आहे. आपल्या आरोग्यातही सुधारणा होत आहे. १९४० ते १९५० या दशकात भारतातील जनतेचे सरासरी आयुर्मान ३२ वर्षे होते, आताही ही सरासरी जवळजवळ ५० वर्षांपर्यंत आली आहे. आपले सर्व प्रयत्न प्रामुख्याने कल्याणकारी योजना राबविण्याचे आहेत.

### विशेष उपलब्धी

आपले आंतरराष्ट्रीय तटस्थतेचे धोरण सामान्यपणे मान्यता पावलेले आहे. त्याचबरोबर साम्राज्यवादी जोखडातून स्वतःला मुक्त करु पाहणाऱ्या राष्ट्रांना मदत करणे, वांशिक समतेचा प्रसार करणे, शांतता आणि आंतरराष्ट्रीय सहकार यांना चालना देणे ही कामेही आपण करीत आहोत. आपण कोणत्याही लष्करी गटात समाविष्ट झालेलो नाही. कोणतीही पूर्वग्रहदुषित भूमिका न घेता प्रत्येकवेळी आपण स्वतंत्रपणे विचार करून आपली भूमिका ठरवत असतो. जगात कुणीही पूर्णपणे सुष्ट किंवा पूर्णपणे दुष्ट असत नाहीत, ही आपली धारणा आहे. विरोधी गटांत निर्माण होणारे ताण कमी व्हावेत व जागतिक युद्धाचा धोका टळावा, ही आपली यामागील भूमिका आहे. स्वतंत्र असणे म्हणजेच तटस्थ असण्याचेही स्वातंत्र्य असणे. आज आशिया व आफ्रिका या खंडातील अनेक विकसनशील देशांनी या आपल्या धोरणाला पाठिंबा दिलेला आहे. आजच्या जागतिक राजकारणात या गटाने आपले एक स्वतंत्र स्थान निर्माण केले आहे.

### उजवे आणि डावे

आपल्याला झपाट्याने परिवर्तन घडवून आणावयाचे आहे. परंतु साध्याइतकीच साधनेही महत्त्वाची आहेत असे आपण मानतो. ही महत्त्वाची शिकवण आपल्याला महात्मा गांधींनी दिलेली आहे. कोणताही विकास स्वयंगतीने व जनतेच्या उत्फूर्त सहकार्याने केला गेला पाहिजे व तो कोणत्याही प्रकारच्या दडपशाहीने लादला जाता कामा नये, असे आपण मानतो. या धोरणामुळे विकासाची गती काहीशी मंदावते ही गोष्ट खरी, परंतु त्याच बरोबर होणारा विकास हा जनतेच्या भरभक्कम सहकार्यावर उभा असतो. आणि त्यामुळेच तो अधिक स्थिरस्वरूपी असतो.

या प्रवृत्तीने आपण आपल्या विकासाकडे पाहत

आहोत. या प्राचीन देशात राजकीय लोकशाही व आर्थिक न्याय ही एकाच वेळी साधावयाची असतील तर याच मार्गाने जाणे आवश्यक आहे.

भारतात काही गट उजव्या विचारसरणीचे आहेत, तर काही गट डाव्या विचारसरणीचे आहेत. परंतु या दोन विचारसरणीत इतर राष्ट्रांतून जितके तीव्र स्वरूपाचे मतभेद आढळतात, तितके तीव्र, व्यावहारिक तात्त्विक मतभेद भारतात अस्तित्वात नाहीत. आपल्या देशातील बहुसंख्य जनतेला होईल त्या सोयीस्कर मार्गाने राजकीय, लोकशाही, आर्थिक समानता व सामाजिक न्याय यांची एकत्रित प्रस्थापना व्हावयास हवी आहे. आपले परराष्ट्रांतील मित्र या आपल्या प्रयत्नांत आपल्याला सहकार्य करतील अशी आशा आहे. परंतु अखेर आपणच आपले ओझे आपल्या खांद्यावर घेतले पाहिजे हे भान आपल्याला असावयास हवे.

जगात काय घडते याचा परिणाम भारतावर होणे अटळ आहे. आज आपले आंतरराष्ट्रीय वातावरण निवळत आहे, हा एक आशेचा किरण आहे. १९५० ते १९६० या दशकात तीव्र असणारे आंतरराष्ट्रीय ताण आता कमी होताना दिसतात. ते उत्तरोत्तर कमी होतील व विकसनशील तटस्थ राष्ट्रातील अज्ञान, दैन्य, दारिद्र्य दूर करण्यासाठी जगातील सर्व राष्ट्रांचा हातभार लागेल अशी आपण आशा करूया.

(टाइम्स ऑफ इंडियाच्या सौजन्याने,
मुक्त अनुवाद - सुमन दाभोलकर)

☑☑☑

## A daughter remembers

### Indira Gandhi

When I went to live with my father at Teen Murti House, the residence of the Prime Minister ir was'nt really a choice. My father asked me to come and to set up the house for him. There was nobody else to do it. So I set up the house, but I resisted every inch of the way about becoming a hostess. I was simply terrified of the so-called 'social duties'. Although I met a large number of people, I was'nt good at 'socialising' and small talk and that sort of thing. I had always hated parties. I said I would do everything behind the scenes but I was not going to appear in front of the people.

**PROTOCOL**

For the women especially, it is a constant battle with protocol. It is like walking on a tight rope - to adhere close enough to the formal side of protocol so as not to offend even the most fastidious of dignitaries while managing not to stiffle the human element and to keep the function interesting and homely. It is the daily struggle with menus to suit all tastes, the intricacies of decorating a State house, and so on.

Almost every time my father went on a journey in India or abroad he would discover recipies or customs of which he approved and which we had to adopt. The first time he dined at Buckingham Palace he decided that in our house too the milk and sugar should be served before the coffee. This was often bewildering to our guests who looked around furtively to see if they had somehow mislaid, or forgotten to take, their coffee.

(These lines are from Indira Gandhi's article 'A daughter remembers' in the same Times of India issue. The whole article is an endearing honest self-portrail of a genuinely coy daughter.

Indian history gave her no option. It wrote the sequence in less than a decade : 'From coy to the Sky.'

- Devdatta Dabholkar.)

☑☑☑






# इंदिरा हवा आणि भारतातील लोकशाही समाजवादाची वाटचाल

**देवदत्त दाभोलकर**

गेल्या दीडदोन वर्षांत भारतातील राजकीय वातावरण झपाट्याने बदलले आहे. अंतर्गत वातावरणात फरक पडला आहे व परकीय राष्ट्रांच्या भारताकडे पाहण्याच्या दृष्टि-कोणातही फरक पडला आहे. अंतर्गत हताश, अगतिक, गोंधळाच्या मनोवृत्तीतून जनता आता बाहेर पडलेली आहे. एक नवा स्वाभिमान, नवा आत्मविश्वास वातावरणात जाणवू लागला आहे. परकीय राष्ट्रांनाही याचा आता प्रत्यय येऊ लागलेला आहे. भारताकडे अनुकूल प्रतिकूल कोणत्याही दृष्टीने आपण पाहिले तरी, अनुल्लेखाच्या, उपेक्षेच्या, कुत्सेच्या दृष्टीने आपण पाहू शकणार नाही याची जाणीव परकीय राष्ट्रांना आता झालेली आहे.

या अंतर्गत व बाह्य वातावरणातील फेरबदलाचे श्रेय इंदिरा गांधींना आता मनमोकळेपणाने सर्वांनी दिले पाहिजे. अनेकांना हे अवघड वाटत असते. असा वातावरणातील फरक इतक्या झपाट्याने होईल अशी या लोकांची अपेक्षा नव्हती. एक 'मुकी बाहुली' हा फरक घडवून आणील हे तर त्यांच्या स्वप्नातही नव्हते. या बदलामुळे आपण कधी इतके निष्प्रभ होऊ असे यापूर्वी त्यांच्या ध्यानीमनी नव्हते. काँग्रेस पक्षातील व विरोधी पक्षांतील सर्वच कार्यकर्त्यांना हा एक आश्चर्याचा अनपेक्षित धक्का बसला. प्रत्यक्ष कार्यक्षेत्रात न उतरणाऱ्या परंतु विचारशील म्हणून जागरुक राहू इच्छिणाऱ्या लोकांचीही तीच परिस्थिती झाली. आपापले पूर्वग्रह बाजूला ठेवून परिस्थितीचे नव्याने मूल्यमापन करणे हे या लोकांना अवघड होऊ लागले.

हवेतील हा बदल कसा झाला याची मीमांसा कोणी करु लागले. इंदिराजींनी धाडसाने - किंबहुना अशा लोकांच्या मतानेच म्हणावयाचे तर 'जुगारी वृत्तीने' टाकलेले फासे त्यांना परत परत दैवयोगाने अनुकूल पडत गेले अशी आपली मीमांसा काहीजणांनी केली. प्रत्येक वेळी इंदिराजींचे वर्तन राजकीयदृष्ट्या यशस्वी झाले असले तरी त्यासाठी त्यांनी सूक्तासूक्त मार्गांचा अवलंब करण्यास मागेपुढे पाहिले नाही असा निर्देश करण्यात येऊ लागला. या जुगारात पुढे दैवाचे उलटे फासे पडले तर त्यांना लोकप्रियतेच्या लाटेवरुन तशाच वेगाने खाली यावयास वेळ लागणार नाही हे इतर राष्ट्रांतील नेत्यांच्या उदाहरणांवरून स्पष्ट करण्यात येऊ लागले. किंबहुना 'इंदिरा हवा' ही खरोखर तशी नाहीच व मतदानाच्या आकड्याप्रमाणे पाहिले तर इंदिराजींच्या नेतृत्वाखाली काँग्रेसने मिळविलेल्या मतात तशी काही विशेष वाढ झालेली नाही अशी आकडेवारी मांडणी करण्यात येऊ लागली.

या मांडणीतील प्रत्येक मुद्द्यात काही ना काही तथ्यांश आहे. परंतु अशी मांडणी करणारे लोक या तपशीलाकडे पाहताना काही ठळक मुख्य गोष्टी विसरतात किंवा पूर्वग्रहाने जाणूनबुजून त्या नजरेआड करतात. कोणतीही हवा ही केवळ मतदानाच्या टक्केवारीची गोष्ट होऊ शकत नाही सर्व राष्ट्र ज्या व्यक्तीला आपला नेता मानते अशी व्यक्ती आज जवाहरलालजींच्या नंतर भारताला पुन्हा लाभली आहे. शास्त्रीजींच्या भोवती हे वलय निर्माण होते न होते एवढ्यातच त्यांचे दुर्दैवाने निधन झाले. शास्त्रीजींच्या नंतर इंदिराजी पंतप्रधान झाल्या, परंतु त्यांच्या भोवतीही हे वलय दोन वर्षांपूर्वीपर्यंत नव्हते. आज ते वलय प्रभावीपणे त्यांच्या व्यक्तिमत्त्वाभोवती आहे. भारतात राजकीय क्षेत्रात जी हवा निर्माण होते ती या वलयातून होते. मतदानाचे आकडे पार करुन या वलयाचा भारतातील जनमानसावर प्रभाव पडत असतो. ही गोष्ट एखाद्याला रुचेल, एखाद्याला रुचणार नाही, परंतु त्यासाठी वस्तुस्थितीच नाकारण्याचे कारण नाही. भारतात आज सर्व जनतेच्या भावनेला आवाहन करण्याचे सामर्थ्य असणारे किती नेते आहेत याची जर आपण गणना करु लागलो तर विनोबा आणि जयप्रकाश नारायण ही दोनच नावे नजरेसमोर येतात. हे दोघेही राजकीय क्षेत्राच्या बाहेर कार्य करीत आहेत व ही मान्यता या दोघांनाही भारत स्वतंत्र होण्याच्या आधीही मिळाली होती. स्वातंत्र्यपूर्वकाळात काही विशेष स्थान नसलेले व नंतरच्या कालखंडात भारतीय जनमानसाला आवाहन करण्याचे सामर्थ्य संपादित केलेले इंदिरा गांधी हेच एकमेव व्यक्तिमत्त्व आहे. या व्यक्तिमत्त्वाच्या ठिकाणी देखील हे सामर्थ्य गेल्या दोन वर्षांतच आले आहे,

अनुक्रमणिका







परंतु ते इतक्या दृढपणे झाले आहे की, या सामर्थ्याचा प्रभाव यापुढे ओसरेल अशी शक्यता सहसा संभवत नाही. भारतीय जनमानसाची तशी घडण नाही. यशापयशाच्या कसोटीवर हे जनमानस आपल्या नेत्यांना पारखत नाही, जवळ करीत नाही किंवा दूर फेकत नाही. एकदा ज्या नेत्याचा मनोमन भावनात्मक विश्वास वाटला त्या नेत्याचा पाठपुरावा मोठ्या अपयशानंतरही भारतीय जनमानस करीत असते. गांधी-जींच्याबाबत हा अनुभव आलेला आहे. जवाहरलालजींच्या बाबतीतही आलेला आहे.

या पद्धतीच्या जनमानसाचे इष्ट व अनिष्ट असे दोन्ही प्रकारचे परिणाम होऊ शकतात. इष्ट परिणाम असा की, असा नेता अखिल भारतातील जनतेच्या भावनात्मक एकात्मतेचे केंद्र बनू शकतो. ध्येयनिष्ठ मजबूत पक्षबांधणीने जे कार्य एरवी व्हावयास हवे ते भारतासारख्या देशात अशा व्यक्तिमत्त्वाच्या नेतृत्वातून साध्य करून घ्यावे लागते. यासाठी भारतातील जनमानसाला किंवा अशा व्यक्तिमत्त्वाच्या नेत्याला दोषी धरून उपयोग नाही. आहे ही परिस्थिती स्वीकारूनच त्यातून पुढे मार्ग काढला पाहिजे. अशी असामान्य लोकप्रियता लाभलेली व्यक्ती हुकुमशाहीकडे वळण्याची शक्यता असते हा या परिस्थितीतील धोका असतो. हे प्रत्यक्षात घडेल की नाही हे प्रत्यक्ष परिस्थितीतील ताणावर व त्या नेत्याच्या व्यक्तिगत वृत्तीवर अवलंबून राहते. हुकुमशहा होण्याचे लोकप्रियतेचे सामर्थ्य अंगी असलेला परंतु स्वतःची आंतरिक श्रद्धा लोकशाहीवर असणारा नेता ही भारताची या काळातील ऐतिहासिक गरज आहे असे मत मी अनेक वर्षे मांडत आलेलो आहे. आजही त्या मतात काही फरक करावा असे मला वाटत नाही.

लोकप्रियतेची कसोटी इंदिराजी आज पूर्ण करीत आहेत. आंतरिक लोकशाही वृत्तीच्या कसोटीवर त्या उतरतील का? त्या याही कसोटीवर पूर्णपणे उतरतील असा माझा विश्वास आहे. ही केवळ भाबडी आशा आहे असे काहींना वाटेल. परंतु या संदर्भात काही गोष्टी आपण ध्यानी बाळगणे उचित होईल. १. हुकुमशाही हा शब्द आपण फारच सैलपणे वापरतो. परंतु ही 'हुकुमशाही' व लोकशाहीला ज्या हुकुमशाहीचे प्राणांतिक भय असते ती स्टॅलिन, हिटलर, मुसोलिनी व तत्सम हुकुमशहांची हुकुमशाही यात जमीन-अस्मानाचे अंतर आहे. पहिल्या प्रकारच्या वृत्तीला हुकुमशाही हा शब्द वापरणे हा केवळ एका शब्दप्रयोगाचा आपल्या प्रतिपक्षाला धोपटण्यासाठी केलेला अतिरेकी वापर आहे. २. इंदिरा गांधींना महात्मा गांधींपासून व जवाहरलालजींपासून मिळालेली परंपरा लोकशाही वृत्तीची आहे. ३. इंदिराजी डावीकडे झुकणाऱ्या आहेत, पूर्वाश्रमीचे साम्यवादी त्यांचे सहकारी आहेत व या पद्धतीने पुढे जात असता त्या हुकुमशाहीकडे वळतीलच अशी काही लोकांची अपेक्षा आहे. ही घटनाही संभाव्य वाटत नाही. परंतु अशा घटनेची कल्पनादेखील मनात येऊ नये असे वाटत असेल तर भारतातील लोकशाही समाजवादी वृत्तीच्या लोकांनी व पक्षांनी आपली भूमिका योग्य रीतीने पार पाडण्याचे सामर्थ्य प्रथम कमावले पाहिजे व ती समर्थपणे पार पाडली पाहिजे. याचाच काही तपशील आपल्याला यापुढे पाहिला पाहिजे.

'गरिबी हटाव' ही इंदिराजींची घोषणाच लोकांना फसविण्यासाठी केलेली आहे अशी ज्यांची भावना असेल त्यांची गोष्ट वेगळी आहे. परंतु ही घोषणा फसवी नाही असे ज्यांना वाटते व गरिबी हटवण्याचे काम हे भारतासारख्या देशात महान प्रयत्नानंतर देखील अल्पावधीत करणे दुर्घट आहे हे ज्यांना माहीत आहे त्या लोकांनी आपली प्रतिक्रिया तपासली पाहिजे. ही घोषणा प्रभावी आहे याचा प्रत्यय आता आला आहे. या घोषणेशी इंदिराजी प्रामाणिक आहेत असा जोपर्यंत जनतेला विश्वास आहे तोपर्यंत जनमानसातील त्यांचे स्थान अढळ आहे. ही घोषणा प्रत्यक्षात उतरू नये यासाठी इंदिराजींनी दक्ष रहावे असे कोणतेच व्यक्तिगत कारण त्यांच्यासमोर नाही. हा प्रामाणिक प्रयत्न करताना परिस्थितीच्या प्रतिकूलतेमुळे त्या अयशस्वी झाल्या तरी जनमानसातील व भारताच्या इतिहासातील त्यांच्या स्थानाला धक्का लागणार नाही. त्यामुळे या घोषणेशी त्या प्रतारणा करतील असे दिसत नाही. परंतु आज त्यांच्यापुढे असणाऱ्या अडचणी मोठ्या आहेत व त्या आपल्या करांगुलीवर हा गोवर्धन पर्वत पेलण्याचा प्रयत्न करीत असल्या तरी आपापल्या काठीचा आधार त्यांना देणे हे सर्व विधायक वृत्तीच्या लोकशाही समाजवाद्यांचे कर्तव्य आहे.

याचा अर्थ लोकशाही समाजवाद्यांनी काँग्रेसमध्ये सामील झाले पाहिजे किंवा शासनाला प्रखर आंदोलनाने कधी विरोध करता कामा नये असे नाही. प्रखर आंदोलनही मूळ हेतूला पोषक असेल तेव्हा विधायक सहकार्यच होय. बांगला

अनुक्रमणिका

देशाच्या संदर्भात इंदिराजी कोणती कार्यवाही करणार आहेत असा प्रश्न विचारावयास विरोधी पक्षाचे मान्यवर नेते आले असता इंदिराजींनी त्यांना सांगितले होते, 'मी जरूर काही कार्यवाही करणार आहे. परंतु त्याचे वेळापत्रक माझे मी ठरवणार आहे. तोपर्यंत तुम्ही माझ्यावरील टीका थांबवावी असे मी म्हणत नाही. त्या टीकेचाही मला उपयोगच होईल.' हा केवळ सौजन्याच्या आवरणाखालचा अहंकार नव्हता. ती एक वस्तुस्थिती होती. अशा टीकेमुळे त्यांचे अंतिम कार्यवाहीच्या वेळी हात अधिक बळकट होणार होते.

हीच परिस्थिती 'गरिबी हटाव' या कार्यक्रमाच्या बाबतीत आहे. समाजवादी सहकार्य देतात की विरोध करतात हे आजच्या भारतीय परिस्थितीत महत्त्वाचे नाही. ते या दोहोंपैकी कोणतीही गोष्ट प्रभावी करु शकत नाहीत ही भारतातील लोकशाही समाजवादाची खरी शोकांतिका आहे. ही दुर्बलता इंदिराजींनी प्रथमपासून नेमकेपणाने हेरली आहे व या गोष्टीचे दुःख त्यांच्या मनाला असले पाहिजे, निदान असावयास हवे. प्रजासमाजवादी पक्षाशी राष्ट्रीय पातळीवर निवडणूक समझोता करण्यास त्यांनी नकार दिला यामागे याच परिस्थितीचे भान होते. परिस्थितीचे त्यांचे मूल्यमापन यथायोग्य होते हे निवडणुकीच्या निकालात विरोधी पक्षांची जी वाताहत झाली त्यावरुन सिद्ध झालेले आहे. आताही आपल्या समोरील प्रश्न खडतर असले तरी हे प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीने अंतर्गत साहाय्य किंवा बाह्य वातावरणनिर्मिती यांपैकी कोणत्याच दृष्टीने या दुर्बल लोकांचा आणि त्यांच्या पक्षसंघटनांचा आपल्याला उपयोग होण्यासारखा नाही अशी खूणगाठ त्यांनी आपल्या मनाशी बांधलेली दिसते. 'नसून अडचण नाही, असून उपयोग नाही' अशा लोकांच्या अनुनयात आपल्याला वेळ दवडण्याचे कारण नाही असा निर्णय त्यांनी आपल्या मनाशी घेतलेला दिसतो. या भूमिकेत इंदिराजींच्या व्यक्तिगत अहंकाराची छाया जरूर आहे, परंतु त्याचबरोबर वस्तुस्थितीचे यथार्थ मूल्यमापनही आहे.

समाजवाद्यांनी या व्यक्तिगत अहंकाराच्या आघाताने आपली प्रतिक्रिया कलुषित होऊ देता कामा नये. त्यांनी वस्तुनिष्ठ भूमिकेतून परिस्थितीचे मूल्यमापन केले पाहिजे व आपल्या दुर्बलतेच्या कारणांचे कठोर आत्मसंशोधन केले पाहिजे.

समाजवादी लोकांच्यापुढे असलेली समस्या खालील स्वरूपाची आहे. या ठिकाणी समाजवादी हा शब्द काँग्रेसमधील समाजवादी किंवा सर्व कमीअधिक डावे साम्यवादी यांना वगळून सामान्यपणे पूर्वीच्या प्र.स.प. व सं.सो.पा या पक्षांतील लोकांना उद्देशून उपयोगात आणला आहे.

१. इंदिराजींचा गरिबी हटाव हा हेतू प्रामाणिक आहे काय?

२. हा हेतू कदाचित प्रामाणिक असला तरी ज्या काँग्रेसच्या संघटनेच्या आधारे त्या हा कार्यक्रम यशस्वी करू पाहतात ती संघटना या कार्यक्रमाची प्रामाणिक वाहक होऊ शकेल काय?

३. या प्रश्नाचेही अनुकूल असे उत्तर दिले तरी अशी डावीकडे वाटचाल करीत असताना इंदिराजी भारतात हुकुमशाही प्रस्थापित करणार नाहीत काय?

४. या प्रश्नांची तात्त्विक उत्तर कशीही मिळाली तरी प्रत्यक्ष व्यवहारात पदोपदी सहकार्याचे विरोधाचे निर्णय घ्यावे लागतात त्यावेळी आपले धोरण कसे ठरवावे? विरोध, असहकार, प्रतियोगी सहकार, की इंदिराजींचे हात बळकट करण्यासाठी म्हणूनच केलेला (असा शब्दप्रयोग शक्य असेल तर) विरोधी सहकार?

या समस्यांची उत्तरे शोधण्यापूर्वी समाजवादी लोकांनी गेल्या दोन वर्षांच्या कालखंडात देशात घडून आलेल्या परिस्थितीतील फेरबदलाची इष्टानिष्टता मनमोकळेपणाने तपासली पाहिजे. त्यातील भाग असे :

१. देशात सर्वसामान्य जनतेच्या भावनेला आवाहन करणारे एक नेतृत्व पुन्हा उदयाला आले ही गोष्ट इष्ट झाली की अनिष्ट झाली? इंदिराजींविषयीचा ज्याचा त्याचा व्यक्तिगत असूयेचा भाग बाजूला ठेवला तर झाली ही घटना इष्टच झाली असे म्हणावे लागेल.

२. मध्यावधी निवडणुकींच्या आधीची लोकसभेतील गोंधळाची परिस्थिती बाजूला होऊन एका पक्षाला शंकातीत निर्णायक बहुमत प्राप्त झाले हे इष्ट की अनिष्ट ? मध्यावधी निवडणुका बांगला देशातील पाकिस्तानी 'क्रॅक डाऊन'च्या आधी पार पडल्या होत्या व असे स्पष्ट बहुमत इंदिराजींना त्या निवडणुकीत लाभले होते ही देशाच्या दृष्टीने एक भाग्याची घटना होती. तसे नसते तर अशा कालखंडात ज्या निश्चित आत्मविश्वासाने नेत्याला सर्व निर्णय घ्यावे लागतात ती

निश्चितता इंदिराजींना लाभली नसती. पूर्वीच्या लोकसभेतही इंदिराजींना या कार्यापुरती ही निश्चितता लाभू दिली असती असे म्हणणे कितपत वस्तुस्थितीला धरून होईल याचा निर्णय ज्याचा त्याने आपल्या मनाशी करावयाचा आहे.

३. या वर्षी झालेल्या विविध राज्यांतील निवडणुकांत महत्त्वाच्या सर्व राज्यांत (तामिळनाडूचा अपवाद सोडता) काँग्रेस अधिकारावर आली या घटनेकडे तरी कोणत्या दृष्टिकोनातून पहायचे? समजा भिन्न हवेच्या लाटेवर बंगालमध्ये अतिडावे साम्यवादी व उत्तर प्रदेशात अतिउजवे जनसंघीय अधिकारावर आले असते तर ती गोष्ट 'काँग्रेस हटाव' कार्यक्रमातील एक स्वागतार्ह घटना म्हणून स्वीकारावयाची काय? भारतातील स्थैर्याच्या व लोकशाही समाजवादी वाटचालीच्या दृष्टीने राष्ट्रीय एकात्मता मानणारे व लोकशाही समाजावादाशी ज्यांचा मूलभूत विरोध नाही असेच पक्ष विविध राज्यांतूनही अधिकारावर असणे आवश्यक नाही काय? काँग्रेसला करावयाचा विरोध अतिउजवे आणि अतिडावे यांच्याशी संगनमत न करता व या गटांना अशा रीतीने अधिक प्रभावी होण्याचा वाव न देताच केला पाहिजे हे पथ्य इष्ट की अनिष्ट? या सर्वांचा समाजवादी मंडळींनी आपल्या मनाशी नीट आणि निश्चित फेरविचार केला पाहिजे.

४. लोकसभेतील व विविध राज्यांतील निवडणुकांनंतर सहजपणे घटनादुरुस्ती करण्याचे सामर्थ्यही आता एका पक्षाला उपलब्ध झाले आहे. समाजवादी मंडळी ही गोष्ट इष्ट आहे असे मानतील असे मला वाटते. बॅ. नाथ पै यांच्या बिलाच्या आशयाकडे पाहिले तर हे स्पष्ट होईल.

परिस्थितीतील फेरबदलाच्या इष्टानिष्टेतेचे वरील विवेचन सर्वांनाच मान्य होईल असे नाही. काही राजकीय पक्षांना तर ते मुळीच मान्य होणार नाही. समाजवादी मंडळींनाही जर याच पद्धतीने जनसंघ किंवा साम्यवादी सर्वत्र अधिकारावर आले असते, तर असा फरक अनिष्टच वाटला असता. यामुळेच मूलभूत प्रश्न अशा अधिकारावर येणाऱ्या पक्षाशी आपल्या पक्षीय मूलभूत धोरणाचा कितपत सुसंवाद आहे व ही शक्ती आपण अधिकारावर येण्यास विरोधी असली तरी या शक्तीचा वापर किंवा परिवर्तन ज्या दिशेने आपल्याला जायचे आहे त्या दिशेने जाण्यासाठी करून घेता येण्यासारखे आहे काय हा आहे.

या प्रश्नाचे उत्तर समाजवादी मंडळी होय असे देतील अशी माझी धारणा आहे; अर्थातच या प्रश्नाचे उत्तर (केवळ बाह्य प्रचाराच्या पातळीवरूनच नव्हे तर आंतरिक श्रद्धेने) 'नाही' असेच असले तर आतापर्यंतच्या व यापुढील विवेचनातील मूळ गृहीत कृत्यच चुकीचे ठरल्यामुळे त्यातील इतर भागाला काहीच अर्थ राहणार नाही, हे उघड आहे.

परंतु हे 'गृहीतकृत्य' समाजवाद्यांनी बाह्यत: कितीही नाकारले तरी वस्तुस्थितीच्या निकषावर त्यांना नाकारता येणार नाही असे मला वाटते. काँग्रेस हा पक्ष स्वातंत्र्य संपादनापर्यंत एकध्येयात्मक होता. परंतु स्वातंत्र्यसंपादन हेच त्याचे त्या काळातील एकमेव मर्यादित ध्येय होते. पंडितजींच्या भावनात्मक समाजवादाची झालर या ध्येयाला होती, परंतु समाजवादी ध्येयधोरण हा काँग्रेस संघटनेचा कणखर कणा कधीच नव्हता. परंतु हे खरे असले व त्याचप्रमाणे स्वातंत्र्यसंपादनानंतर अनेक सत्ताभिलाषी लोक केवळ सत्तेसाठी काँग्रेसमध्ये घुसले ही गोष्टही जरी मान्य केली तरी काँग्रेस कधीच सर्वस्वी प्रतिगामी लोकांच्या हाती गेली नाही व उदारमतवादी व समाजवादी अशा दोन्ही विचारसरणींना वैचारिक पातळीवर काँग्रेसमध्ये सतत मान्यता मिळत राहिलेली आहे ही वस्तुस्थिती आपण नजरेआड करता कामा नये. काँग्रेस हे एक विविध विचारसरणींच्या लोकांचे कडबोळे असले तरी अतिरेकी उजवे व अतिरेकी डावे यांना या पक्षाने कधी आपल्यात सामावून घेतले नाही किंवा त्यांना मान्यता दिली नाही ही गोष्ट आपण मान्य केली पाहिजे. या कडबोळ्यात आपण प्रभावी कार्य करू शकणार नाही या भावनेने समाजवादी लोक त्यातून बाहेर पडले तर त्यात गैर मानावयाचे काही कारण नाही. परंतु समाजवाद्यांनी स्वतःला दोन प्रश्न विचारले पाहिजेत. १. या अशा पक्षाविषयीची आपली भूमिका अतिरेकी उजवे व अतिरेकी डावे यांच्याविषयी जशी कडव्या विरोधाची आहे तशीच राहणार आहे काय व २. ज्या प्रभावी कार्यासाठी म्हणून आपण बाहेर पडावे ते कार्य तरी आपण प्रभावीपणे करीत आहोत काय?

अतिरेकी डाव्या गटाच्या बाबतीतही समाजवाद्यांची भूमिका दुर्दैवाने नेहमीच कडव्या विरोधाची राहिलेली नाही. 'काँग्रेस हटाव' या घोषणेने ज्या वेळी सर्व विरोधी पक्षांना एकत्रित आणण्याचा सं.सो.पा. ने प्रयत्न केला त्याच वेळी ही गोष्ट स्पष्ट झाली. ती युती काही काळ काही राज्यांतून संयुक्त मंत्रीमंडळे स्थापन करण्यात यशस्वी झाली असली तरी अंतर्गत








तणावापुढे ती दीर्घकाळ कधीच टिकू शकली नाही व सर्वच पक्षांनाही हे सत्य उमगले. ज्या समाजवादी पक्षांना आपली प्रतिमा स्पष्ट ठेवणे (किंबहुना स्वतःशीही ती स्पष्ट करणे) प्रथमपासूनच बिकट झाले होते, त्यांची प्रतिमा तर अधिकच धूसर झाली.

आपला कार्यक्रम चोरून इंदिराजींनी 'गरिबी हटाव'चा नारा दिला व निवडणुका जिंकल्या असे समाजवादी लोक म्हणू शकतील. परंतु हा 'नारा' वस्तुस्थितीत उतरविण्याचे सामर्थ्य इंदिराजींमध्ये आहे असे जनतेला वाटावे आणि समाजवादी पक्षाबद्दल हा विश्वास जनतेला वाटू नये हा समाजवादी पक्षाचा सर्वात मोठा पराभव आहे. जनसंघाचा पराभव हा त्या विचारप्रणालीला जनतेचा सहयोग नाही याची निदर्शक आहे. समाजवाद्यांचा पराभव हा त्या पक्षाच्या व त्या पक्षातील नेत्यांच्या कर्तेपणावर जनतेचा विश्वास नाही याचे प्रत्यंतर आहे. जनतेचे हे मूल्यमापन यथायोग्य नाही असे आपण म्हणू शकू काय?

आजही या गोंधळाच्या अवस्थेतून बाहेर पडण्याची समाजवादी पक्षाची तयारी दिसत नाही. केवळ उज्ज्वल चारित्र्याचे काही नेते व संसदीय कर्तृत्व असलेले काही लोक यांच्या आधारावर समाजवादी पक्षाची बांधणी होणे दुर्घट आहे. जनतेच्या स्तरापर्यंत हा पक्ष प्रभावीपणे कधी पोचू शकत नाही व आजही पोचू शकेल अशी शक्यता दिसत नाही. नेत्यांची मर्यादित कुवत हे तर याचे एक कारण आहेच, परंतु त्याचबरोबर ज्या वर्गातून हे नेतृत्व उदयास आले त्या वर्गाबद्दल किंबहुना जातीबद्दल - बहुजनसमाजाला वाटणारा अविश्वास हेही त्याचे एक तितकेच महत्त्वाचे कारण आहे. महाराष्ट्रात हे घडले आहे व या पक्षातील महाराष्ट्रीय नेते हेच या पक्षाचे राष्ट्रीय पातळीवरही नेतृत्व करीत असल्यामुळे याचीच छाया या पक्षाच्या राष्ट्रीय पातळीवरील कर्तृत्वावरही पडलेली आहे. ही कोंडी फोडावयाचा प्रयत्न या पक्षाने करावयास हवा होता, परंतु डॉ. लोहिया यांच्याखेरीज अन्य कोणाला या कोंडीची जाणीव होती असेही दिसत नाही. ही कोंडी फोडण्यास समर्थ असलेले बहुजनसमाजातून निर्माण होणारे नवे नेतृत्वच या नंतरच्या काळात काँग्रेसच्या आत राहून किंवा काँग्रेसच्या बाहेर पडून भारतातील समाजवादी आंदोलनाची धुरा यापुढे वाहू शकेल.

आजच्या आपल्या मर्यादित सामर्थ्याच्या काळातही इंदिराजींच्या विषयीची (आता हास्यास्पदच ठरणारी) असूया, परस्परांविषयीचा (आज मित्रांना दुःखद व शत्रूंना दयनीय वाटणारा) अविश्वास, व आपल्या कर्तृत्वाविषयीच्या अवास्तव कल्पना जर समाजवादी पक्षातील कार्यकर्त्यांनी बाजूला ठेवल्या तर हा पक्ष राजकारणात आजही महत्त्वाची कामगिरी बजावू शकेल. आपल्याला इष्ट असलेल्या दिशेने राष्ट्राला नेण्याइतके सामर्थ्य या पक्षात नसले तरी राष्ट्रीय राजकारणाचे सुकाणू इष्ट दिशेकडेच राहील एवढी दक्षता घेण्याचे सामर्थ्य त्या पक्षात आहे आणि हीही गोष्ट आजच्या संदर्भात कमी महत्त्वाची नाही.

परंतु हे कार्य करावयाचे तरीही या पक्षाने परिस्थितीचे योग्य निदान केले पाहिजे व काही पथ्ये सांभाळली पाहिजेत. त्यांचा थोडक्यात आशय असा :

१. इंदिराजींचे पुरोगामी आग्रह राज्यपातळीपर्यंत प्रभावी झालेले आहेत. परंतु त्याखालच्या पातळीवर - जिल्हा व तालुका त्या प्रेरणा अद्याप प्रभावीपणे पोचलेल्या नाहीत. इंदिराजी आपल्या परीने राज्यपातळीवर ही कोंडी फोडण्याचा प्रयत्न करीत आहेत. या प्रयत्नांचे स्वरूप समाजवादी मंडळींनी ओळखले पाहिजे व त्याला शक्य ती साथ देण्याची तयारी ठेवली पाहिजे. काँग्रेसचे अधिक शुद्धीकरण करण्याचा प्रयत्न करणे इंदिराजींना अटळ आहे. त्या प्रयत्नांचे समाजवादी मंडळींना स्वागत केले पाहिजे.

३. भारतात गरिबी हटाव हा कार्यक्रम यशस्वी करावयाचा असेल तर अनेक हितसंबंधी गटांना धक्का लावावा लागेल. या गटांत संस्थानिक, धनिक शेतकरी, भांडवलदार, संघटित कामगार, हजार रुपयापेक्षा अधिक मासिक वेतन असणारे लोक व विद्यापीठातील पदवीपरीक्षेपर्यंत शिक्षण मिळालेले सर्व लोक यांचा मी समावेश करतो. या सर्व वर्गावर आघात झाल्याखेरीज भारतातील 'गरिबी हटाव' ची क्रांती यशस्वी होणार नाही. या क्रांतीचा पहिला टप्पा पहिल्या तीन गटांवर आघात करून पूर्ण होईल. यांपैकी संस्थानिक हा वर्ग आता दूर झाला आहे. धनिक शेतकरी व भांडवलदार हे वर्ग नीटपणे सामाजिक नियंत्रणाखाली तरी आणावे लागतील किंवा दूर करावे लागतील. या प्रक्रियेत कोणत्याही समाजवादी पक्षाला महत्त्वाची कामगिरी बजावावी लागतेच. त्यांचे अस्तित्वच मुळी त्याच्यासाठी असते.

परंतु भारतात केवळ एवढ्याने कार्य होण्यासारखे

नाही. या वर्गांना दूर केल्यानंतर उरलेले तीन वर्ग एकतर समंजस क्रांतिकारक भूमिका घेऊन भारतातील असंख्य असंघटित पददलितांना न्याय देण्याचा प्रयत्न करतील किंवा आपल्या स्वार्थासाठी त्या वर्गांचे शोषण पुढे चालू ठेवतील. स्वार्थाची सामान्य मानवाची प्रेरणा लक्षात घेता ही दुसरी प्रक्रिया अधिक संभवनीय आहे. या प्रक्रियेत पददलितांना न्याय तर नाकारला जाईलच. परंतु हे साध्य व्हावे यासाठी ही मध्यमवर्गीय हुकुमशाही राष्ट्रावर लादली जाईल. या परिस्थितीच्या संभाव्य परिणामांचा व अशी परिस्थिती टाळावयाची असेल तर आतापासून त्यासाठी घ्यावयाच्या संघटनात्मक व वैचारिक दक्षतेचा विचार भारतातील समाजवादी चळवळीने केला पाहिजे.

४. बांगला देश विमोचनानंतर धर्माधिष्ठित हिंदू-मुसलमान राजकारणाचा अंतकाल भारतात जवळ आलेला आहे. ही प्रक्रिया यानंतर कदाचित कधी काही व्यावर्तात सापडली तरी सर्वसाधारणपणे निश्चित रीतीने अशीच पुढे जाणार आहे. समाजवादी पक्ष या प्रक्रियेला हातभार लावू शकतील. याच्याही पुढे जाऊन प्रत्येक धर्मातील प्रतिगामी आचारांना व विचारांना विरोध करण्याचे कार्य समाजवादी आंदोलनाला करावयाचे आहे.

५. अर्थव्यवस्था, जातिव्यवस्था व राजकारण यांची विलक्षण गुंतागुंत भारतात झालेली आहे. हरिजन, आदिवासी, भूहीन, मजूर व तत्सम गरीब शेतकरी यांना अखेर न्याय मिळावयाचा असेल तर या गुंतागुंतीचे भान राखून, परंतु शेवटी या पददलितांना न्याय मिळेल अशा रीतीने समाजवादी आंदोलन उभे राहिले पाहिजे.

व्यावहारिकदृष्ट्या आज इंदिराजी हे तत्काल साध्य करू शकणार नाहीत ही गोष्ट उघड आहे. त्यांना वैचारिकदृष्ट्या हे सर्व याप्रमाणे मान्य आहे की नाही हे समजावयास मार्ग नाही. प्रत्यक्ष राजकारणाच्या डावपेचात त्यांना ज्या तडजोडी कराव्या लागतील त्या त्यांनी कराव्या की नाही याविषयी नेहमीच दुमत होऊ शकेल. परंतु अंतिम निर्णय घेण्याची जबाबदारी असणाऱ्या प्रत्येक व्यक्तीच्या प्रत्येक निर्णयाबाबत सदैव असे मतभेद राहतातच. प्रामाणिकपणा व कर्तृत्व या बाबतीत सामान्यपणे विश्वास असेल तर एवढी सवलत आपण अशा नेत्याला दिली पाहिजे.

इंदिराजींच्या बाबतीतही असेच म्हणता येईल. परंतु तेवढी सवलत समाजवादी मंडळींनी द्यावी अशी समाजवादी मंडळींकडून अपेक्षा ठेवणे आजच्या परिस्थितीत युक्त ठरणार नाही. सुदैवाने समाजवादी मंडळींनी आपल्या टीकात्मक धोरणाप्रमाणेच का होईना परंतु प्रभावीपणे काहीही केले तरी ते आज भारताच्या हिताचेच आहे.

इंदिराजींच्या दृष्टीने म्हणावयाचे तर ते त्यांच्याही हिताचेच आहे.

या प्रभावाचा अभाव हेच भारतातील समाजवादी आंदोलनाचे दुर्दैव आहे.

☑ ☑ ☑

## बांगला देशाची निर्मिती

राहुल गांधी यांच्या वक्तव्यामुळे आज बांगला देशाची निर्मिती पुन्हा चर्चेत आहे. या संदर्भात कदाचित् माझी खालील आठवण मनोरंजक वाटेल.

पुण्यात स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्या पुतळ्याचे अनावरण जनरल माणेकशॉ यांच्या हस्ते झाले. त्यावेळी आपल्या भाषणात ते म्हणाले, 'सावरकर आज हयात असते तर त्यांनी मला विचारले असते - बांगला देश घ्यायला तुला दहा दिवस का लागले ? आणि मी उत्तर केले असते - Sir, because you were not my leader.'

पुढे मी पुणे विद्यापीठाचा कुलगुरू असताना Defence Department मधल्या एक पदासाठी म्हणून सेनादलाच्या तीनही विभागाच्या सर्वोच्च किंवा त्या जवळच्या पदावरुन निवृत्त झालेल्या सेनाधिकाऱ्यांना निवड समितीचे सदस्य म्हणून आमंत्रित केले होते. मध्यंतरात चहापानाच्या वेळी मी सहज हा विषय काढला. त्यांना तो प्रसंग सांगितला आणि म्हटले, 'आपल्याला माणेकशॉ यांच्या या विधानाबद्दल काय वाटते ? आपण उत्तर दिलेच पाहिजे असा माझा आग्रह नाही. खरोखरच वस्तुस्थिती तशी होती की माणेकशॉ यांनी समारंभाच्या पार्श्वभूमीच्या संदर्भात स्वातंत्र्यवीर सावरकरांना दिलेला तो एक polite compliment होता ?'

एकाने उत्तर दिले : 'I think it was a polite compliment.' इतर दोघांनी संमतिदर्शक भावमुद्रेचे मौन राखले.

- देवदत्त दाभोलकर
२१ एप्रिल २००७



अनुक्रमणिका

# लोकशाही समाजवाद

## काँग्रेस - समाजवादी पक्षाचे ध्येय

### जयप्रकाश नारायण

### समाजवाद आणि हिंदुस्थान

काँग्रेस - समाजवादी पक्षाच्या घटनेत पक्षाचे ध्येय सांगितले आहे ते असे: -"पूर्ण स्वातंत्र्य प्राप्त करून घेणे; पूर्ण स्वातंत्र्य म्हणजे ब्रिटिश साम्राज्यातून फारकत आणि समाजवादाची स्थापना."

शब्द अगदी नि:संदिग्ध आहेत. पक्षाच्या ध्येयांत दोन उद्दिष्टांचा समावेश आहे. पहिले उद्दिष्ट काँग्रेसच्या ध्येयाप्रमाणेच आहे. मात्र पूर्ण स्वातंत्र म्हणजे साम्राज्यातून फारकत ही कल्पना आम्ही स्पष्टपणे मांडली आहे. दुसऱ्या उद्दिष्टाचा अर्थ असा की, स्वतंत्र हिंदुस्थानाला आपली आर्थिक घडी समाजवादी तत्त्वानुसार बसवावी लागेल.

### आम्ही असे का म्हणतो?

जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन आणि अंतिम ध्येये यांच्याशी समाजवादाचा प्रश्न निगडीत झालेला आहे असे खोलवर विचार केल्यास समजून येईल. तो दृष्टिकोन व ती ध्येये पक्की झाली, की बाकीचे सर्व ओघानेच सिद्ध होते.

श्रमजीवी जनता राजकीय व आर्थिकदृष्ट्या स्वतंत्र बनावी, ती सुखी होऊन भरभराटीस यावी, त्यांची हरएक प्रकारच्या पिळणुकीतून सुटका व्हावी, त्यांच्या वाढीला कोठेही आडकाठी नसावी, हेच जर अंतिम साध्य असे मानण्यात आले तर समाजवादाकडेच सर्वांना वळणे भाग आहे. परस्परविरोधी आणि अनियंत्रित अशा समाज-घटकांना लगाम घालून यावच्छक्य समाजहिताच्या मार्गाने त्यास चालवावयाचे असतील व सकल - कल्याणच्या महत्तम सेवेत मानवी बुद्धीचा सुजाणपणा खर्च व्हावा असा बनाव घडवायचा असेल, तरीही समाजवादाचाच पंथ स्वीकारावा लागेल.

ज्यांची ध्येये याहून भिन्न असतील त्यांनी हे पुस्तक यापुढे वाचण्याचा शीण घेऊ नये, हे बरे.

आमचे ध्येय वरीलप्रमाणे असल्यामुळे इतर समाजाप्रमाणेच हिंदुस्थानांतील समाजालाही समाजवादाचीच वाट धरली पाहिजे हे नक्की. एकीकडे दारिद्र्य व उपासमार, तर दुसरीकडे संपत्ती आणि भोगविलास असा देखावा हिंदुस्थानतही आहेच. येथे पिळणूकही आहेच. उत्पादनसाधने येथेही खाजगी मालकीचीच आहेत. एवच हल्लीच्या सामाजिक दुरवस्थेच्या मुळाशी असणारी आर्थिक व सामाजिक विषमता इतर देशांतल्याप्रमाणेच येथेही आहे. मूठभर "महाजनांनी" सूपभर "बहुजनांना" पिळावे हाच न्याय भरतभूमीतही चालू आहे.

ही स्थिती ब्रिटिश अमदानीनंतर आली असेही नाही. ब्रिटिश अमदानीशी तिचा संबंध नाही. ती संपुष्टात आल्यावरसुद्धा ही चालू राहील. परकीय अंमलाची इतिश्री झाली की आमचा दारिद्र्याचा प्रश्न आपोआप सुटेल असे नाही, बहुजनांची नागवणूक बंद होईल असे नाही; आपले कोणतेही ध्येय त्यामुळे सिद्ध होणार नाही.

### हिंदी संस्कृती समाजवादाला विरोधी नाही

हिंदुस्थानातील परिस्थिती काही विशेषच आहे. आमच्या परंपरा भिन्न आहेत, औद्योगिक दृष्ट्या आम्ही फार मागसलेले आहो. मग तुमच्या समाजवादी तत्त्वांचा येथे काय उपयोग? असा प्रश्न विचारण्यात येतो. समाजवादाचे मूलभूत सिद्धांत येथे लागू पडण्यासारखे नाहीत असा जर आक्षेप या प्रश्नात दडलेला असेल, तर तो अगदी निरर्थक आहे.

संपत्तीसंचयाचा नियम जो इतर देशात, तोच हिंदुस्थानात असे जर आहे तर संपत्तीसंचय थांबविण्याचा मार्गही जो इतर देशात पत्करावा लागला तोच येथेही पत्करावा लागणार. हिंदुस्थानातील विशिष्ट परिस्थितीमुळे समाजवादाची तत्त्वे कशा प्रकारे व कोणत्या वेळी लागू करावीत ह्या तपशीलात फेरबदल होईल; पण तत्त्वात चलबिचल होण्याचे कारण नाही. पिळणूक व आर्थिक विषमता नष्ट करण्याकरिता उत्पादन - साधनांवर सामाजिक मालकी प्रस्थापन करणे हा जर एकमेव उपाय उपलब्ध आहे, तर हिंदुस्थानात निराळीच काही उपाययोजना करता येईल अशी

आशा करणे व्यर्थ नव्हे का?

हिंदुस्थानातील परंपरेला समाजवादाचे वावडे आहे असे मला वाटत नाही. सुख व हक्क ही काहीजणांनीच बळकावून बसावे अशी का आमची परंपरा आहे? हिंदी संस्कृतीचा भर व्यक्तित्त्वावर आहे. मग समाजवादाशी तिचे सख्य कसे होणार अशी शंका कोणी काढतात. परंतु हिंदी संस्कृतीचे हे यथातथ्य वर्णन नव्हे. हे वाग्जाल आहे. व्यक्तिविकासाला हिंदी संस्कृतीत मुख्य स्थान आहे हे खरे, परंतु व्यक्ति अधिकाधिक पूर्ण बनत जावी असेच त्या व्यक्तिविकासाचे ध्येय आहे. भांडवलशाहीत प्रसृत झालेला संकुचित आणि स्वार्थलंपट व्यक्तिविकास हिंदी संस्कृतीचे ध्येयरुप म्हणून मान्य केलेला नाही. परिपूर्ण व्यक्तित्त्वाचे ध्येय अत्युच्च सामाजिक सुखाचा संकल्प केला तरच साध्य होईल, हे सिद्ध करणे समाजवाद्यांना कठीण नाही. समाजवादी समाजातच सामान्य माणसेही प्लेटो अथवा मार्क्सच्या दर्जाची आढळून येतील असे ट्राट्स्कीने कोठेसे म्हटलेले आहे.

हिंदुस्थानाच्या औद्योगिक परागतीकडे पाहून बिचकण्याचे कारण नाही. कदाचित् त्या परागतीपासून फायदाही होण्याचा संभव आहे. कारण त्यामुळे भांडवलदारांचा विरोध फारसा जोरकस होणार नाही. औद्योगिक दृष्ट्या मागासलेल्या देशात समाजवाद रूजेल की नाही याची कोणाला शंका असेल, तर जगात अत्यंत मागासलेले म्हणून ओळखल्या जाणाऱ्या मुलुखात रशियन लोक काय चमत्कार करुन दाखवीत आहेत ते त्यांनी लक्षात घ्यावे म्हणजे झाले. मास्कोप्रमाणेच उझबेकिस्तानमध्ये समाजवादाची उभारणी होत आहे. शासनदंड घेऊन सज्ज अशा समाजवादी पक्षाला मागे पुरेसे पाठबळ असले की आधुनिक शास्त्रांच्या मदतीने जगात कोठेही समाजवादी व्यवस्था खडी करता येईल.

या विचारसरणीच्या आधारावर आमच्या पक्षाने समाजवादप्रस्थापनेचे ध्येय निश्चित केले आहे.

## काँग्रेस आणि समाजवाद

येथपर्यंत विवादलेल्या प्रश्नांविषयी काँग्रेसचे धोरण काय आहे ते पाहू. आपण वर ज्या प्रश्नांचा ऊहापोह केला त्या प्रश्नांकडे काँग्रेसने मुळीच लक्ष पुरविले नाही आणि राष्ट्रीय स्वातंत्र्यापलीकडे तिला काही दिसत नाही असे म्हणणे सत्याला धरुन होणार नाही. थोड्या नाखुषीनेच पण काँग्रेसने हे कबूल केले आहे की, जनतेची साम्राज्यवादी आणि एतद्देशीय पिळणूकीपासून सोडवणूक केली पाहिजे.

१९२९ साली ऑ. इं. काँ. क. ने एक ठराव केला; आता तो कोणाच्याही फारसा लक्षात राहिलेला नाही हे निराळे. तो ठराव असा :-

"ह्या कमिटीचे असे मत आहे की, जनतेच्या दारिद्र्याचे व दुखा:चे कारण केवळ परकीय पिळणूक हे नसून समाजाची आर्थिक रचनाही त्यास कारणीभूत आहे. ह्या समाजरचनेचे रक्षण परकीय सरकार करते व त्यामुळे जनतेची पिळणूक सतत चालू राहते. तेव्हा हे दारिद्र्य व दु:ख नाहीसे करुन हिंदी जनतेची स्थिती सुधारावयाची असेल तर सध्याच्या आर्थिक व सामाजिक व्यवस्थेत क्रांतिकारक फेरबदल घडवून आणणे आणि सर्वथा अनिष्ट अशा विषमतेचे निर्मूलन करणे आवश्यक आहे."

समाजाच्या आर्थिक रचनेत क्रांतिकारक बदल (मुंबई १९२९) करण्याबद्दल ही मागणी आहे. आणि ही मागणी करताना समाजवादी जी कारणे दाखवील तीच सुस्पष्टपणे येथेही दाखविली आहेत. मग घोडे अडते आहे कोठे? आमचा काँग्रेसशी मतभेद कोठे, कसा येतो? काँग्रेस एवढा ठराव करून गप्प बसते म्हणून विरोध उत्पन्न होतो.

आज आम्हाला विरोध करणाऱ्या आणि आमची टवाळी करणाऱ्या काँग्रेसवाल्यांना माझा एकच सवाल आहे की, मृत्युकर व क्रमवार प्राप्तिकर बसविला, मुख्य धंद्यांचे राष्ट्रीकरण केले, सारा कमी केला आणि बुडित खात्यांना तो अजिबात माफ केला म्हणून जनतेची पिळणूक थांबेल का? या सुधारणांमुळे समाजात तुम्हाला हवा असलेला "क्रांतिकारक बदल" घडून येईल काय? कराचीच्या प्रसिद्ध ठरावाने देखील जनतेला याहून अधिक हक्क मिळालेले नाहीत. आपण कराचीचा ठरावच विचारासाठी घेऊ. ठरावाच्या उपोद्घातांतच असे स्पष्ट लिहिले आहे की, देशाला राजकीय स्वातंत्र्य मिळाले, की जनतेला खरेखुरे स्वराज्य मिळाले असे म्हणता येणार नाही. जनतेला आर्थिक स्वातंत्र्य मिळेल तेव्हा खरे स्वराज्य मिळाले असे म्हणता येईल.

हे आर्थिक स्वातंत्र्य म्हणजे काय? काँग्रेसचे पुढारी ह्या प्रश्नाला काय उत्तर देतात? कराची - ठरावाप्रमाणे अल्पस्वल्प ठराव पास करून जनतेला आर्थिक स्वातंत्र्य मिळेल असे त्यांना



अनुक्रमणिका

मनापासून वाटते काय?

आर्थिक स्वातंत्र्य म्हणजे मृत्युकर आणि महत्त्वाच्या उद्योगधंद्यांचे राष्ट्रीकरण एवढाच जर अर्थ असेल तर काँग्रेसकडून जनतेला खासच स्वातंत्र्य मिळेल. आम्हाला गुलामगिरी इतकी अंगवळणी पडली आहे की, खरे स्वातंत्र्य म्हणजे काय तेही आम्हाला कळेनासे झाले आहे.

कराची - काँग्रेसने संपूर्ण समाजवादी कार्यक्रम आखावयास हवा होता असे माझे मत नाही.संपूर्ण समाजवाद कार्यक्रम काँग्रेसने या घटकेला स्वीकारावा असाही आमचा आग्रह नाही. काँग्रेसने करावयास पाहिजे ते हे की प्रत्यक्ष अमलात आणल्यावर ज्या कार्यक्रमाच्या योगाने जनतेची आर्थिक शृंखलांतून पूर्ण सुटका होईल व राजकीय आणि आर्थिक सत्ता तिच्या पदरात पडेल असा किमान कार्यक्रम मान्य केला पाहिजे.

आणि असाच कार्यक्रम काँग्रेस - समाजवादी पक्ष प्रतिपादीत आहे. काँग्रेसचा सध्याचा कार्यक्रम फारच अपुरा आहे. त्यापासून जनतेचे थोडेफार कल्याण होईल. परंतु आर्थिक दास्यविमोचन करण्याची किंवा जनतेला सत्ताधारी बनविण्याची पात्रता त्या कार्यक्रमात नाही. मुंबईच्या १९२९ च्या ठरावात क्रांतिकारक बदल समाजात व्हावयास पाहिजेत अशी जी अपेक्षा दर्शित झाली होती, तसला बदल तर त्या कार्यक्रमात नाहीच नाही, उलट समाजव्यवस्था आहे तशीच आखबंद ठेवण्याचे धोरण त्यात दिसून येते. एका बाजूला भांडवलदार, जमीनदार व संस्थानिक आणि दुसऱ्या बाजूला कामकरी, शेतकरी व रयत अशा दुपदरी समाजरचनेला त्यापासून धक्का लागणार नाही व गरीब व मध्यम वर्गीयांच्या पिळणूकीवर उभारलेल्या समाजयंत्राला काँग्रेसच्या कार्यक्रमामुळे कोठेच हिसका बसणार नाही. ह्याला आर्थिक स्वातंत्र्य कोण म्हणेल? कराची - ठरावाचा उपोद्घात व विषय ही एकमेकांशी विरोधी आहेत. हा विरोध काढून टाकून उपोद्घाताशी विषयाची मिळवणी व्हावी म्हणून आम्ही प्रयत्न करीत आहो. आर्थिक स्वातंत्र्य काँग्रेस जनतेला मिळवून देणार, म्हणजे काय मिळवून देणार, हे तिने निःसंदिग्ध शब्दात बोलून दाखविले पाहिजे.

आम्ही मांडलेला कार्यक्रम मान्य करण्यास काँग्रेस नाखूष असेल; कदाचित ही विचारसरणी पटण्यासाठी काही वर्षेही जावी लागतील; आम्हांला आमच्या ध्येयाची अधिक फोड करून दाखवावयाची नाही हे म्हणणे निराळे, आणि अलिकडे अलिकडे आमच्याविरूद्ध सारखा चालू असलेला मतप्रचार करणे निराळे. समाजवाद म्हणजे वेड्यांचे बरळणे आहे, हिंदुस्थानची हवा त्याला मानवण्यासारखी नाही, हिंदी समाजवादी बोलतात ती नुसती पुस्तकी पोपटपंची आहे, कार्ल हायन्रिश मार्क्स नावाच्या एका जुनाट जर्मन ज्यूने मागच्या शतकात लिहिले तेच पुराणे मत हे ह्या काळात बोलून दाखवीत आहेत वगैरे वगैरे टीका ही निःसंशय हिणकस प्रकारची टीका आहे.

असलीच वायफल टीका काँग्रेसवाले करीत राहणार असतील, तर आर्थिक स्वातंत्र्याचा त्यांचा अर्थ काय तो तरी त्यांना सांगून टाकावा. हिंदुस्थानातील सर्व समाजवाद्यांना - मग ते काँग्रेस समाजवादी असोत की कम्युनिस्ट असोत - आर्थिक स्वातंत्र्य या शब्दाचा एकच अर्थ माहीत आहे. आर्थिक स्वातंत्र्य म्हणजे समाजवाद. समाजवादाशिवाय आर्थिक स्वातंत्र्य हे केवळ ढोंग आहे; फसवणूक आहे; थापेबाजी आहे.

काँग्रेस - समाजवादी पक्षाचे म्हणणे काय आहे? जनतेला आर्थिक स्वातंत्र्य मिळावे, पिळणूक, अन्याय, यातना, दारिद्र्य आणि अज्ञान यापासून ती मुक्त व्हावी याकरिता मुख्य धंद्यांच्या राष्ट्रीकरणाव्यतिरिक्त सरकारने काय केले पाहिजे?

आम्हाला काय हवे ते पक्षाच्या कार्यक्रमात स्पष्ट शब्दात मांडले आहे. ती यादी पुन्हा एकवार डोळ्याखालून गेली पाहिजे.

१. सर्व सत्ता उत्पादक - वर्गाच्या हाती असावी.

२. देशाच्या आर्थिक जीवनाच्या वाढीची योजना व नियंत्रण सरकारने करावे.

३. उत्पादन, विभजन आणि विनिमय यांच्या साधनांचे क्रमशः राष्ट्रीकरण करण्याचे ध्येय ठेवून, सुरवातीला महत्त्वाच्या आणि मुख्य धंद्यांचे (उदा. कापड, पोलाद, ताग, रेल्वे, जहाजे, खाणी, चहा वगैरेचे मळे, बँका, इन्शुअरन्स आणि सर्वजनोपयोगी खाती) राष्ट्रीकरण करण्यात यावे.

४. परराष्ट्रीय व्यापाराची अखत्यारी फक्त सरकारलाच असावी.

५. आर्थिक व्यवहाराचा जो विभाग आर्थिक योजनेच्या कक्षेबाहेर राहिला असेल त्यातील उत्पादन, विभाजन व भांडवलपुरवठा यांच्या व्यवस्थेसाठी सहकारी संस्था सुरू करणे.

अनुक्रमणिका

६. संस्थानिक, जमीनदार व इतर पिळणाऱ्या वर्गाकडून विनाभराई सत्ता काढून घेणे.

७. शेतकऱ्यांत जमिनीची फेरवाटणी करणे.

८. सहकारी व सामुदायिक शेतीला सरकारने उत्तेजन देऊन तिचा पुरस्कार करणे.

९. शेतकरी - कामकऱ्यांना कर्जाची सूट देणे.

१०. काम मिळावे, नाही तर पोटगी मिळावी, या हक्कास सरकारमान्यता देण्यात यावी.

११. व्यक्तिमात्राला प्राप्त होणाऱ्या वस्तू त्याच्या सामर्थ्यानुरूप न मिळता त्याच्या गरजानुरूप मिळाव्यात, हे समाजवादी उत्पादन - विभजनाचे अंतिम ध्येय असावे.

१२. वयात आलेल्या प्रत्येक व्यक्तिला उद्योग-धंद्यांच्या वर्गवारीला अनुसरून मतदानाचा हक्क मिळावा.

हे बारा उद्देश वर नमूद केले आहेत. त्यांतल्या कल्पना मूलग्राही, आत्यंतिक, क्रांतिकारक, विदेशी अशा वाटतात, नाही? पण वस्तुत: त्या फार सुगम आहेत, बुद्धीला पटण्यासारख्या आहेत, न्याय्य आहेत, शक्य कोटीतल्या आहेत. त्यांना विदेशी म्हणून नाक मुरडावयाचे तर घटनापरिषद, कायदेमंडळ, टॅरिफ बोर्ड, किंबहुना गिरणींचे धुराडे आणि मोटारींचे डेक्कन क्वीन शिंग ही तरी देशी आहेत थोडीच?

उत्पादन - साधनांवरील ज्या खाजगी मालकीमुळे हे विषमतेचे रान माजले आहे ते साफ व्हावे या हेतूनेच या उद्देशांची आखणी करण्यात आली आहे. त्याचप्रमाणे समाजजीवन योजनापूर्ण व्हावे हाही हेतू त्यांच्या बुडाशी आहे.

('समाजवादच का?' दुसरी आवृत्ती, अनुवाद- भाई गोरे.)



## राष्ट्र सेवा दल

### एस्० एम्० जोशी

"राष्ट्रसेवादल स्वायत्त ठेवण्यासाठी काँग्रेसपासून जसे ते अलग ठेवले पाहिजे तसेच काँग्रेस समाजवादी पक्षापासूनही ते अलगच ठेवले पाहिजे, असे माझे ठाम मत होते. काँग्रेस समाजवादी पक्षाबरोबर सेवादलाचे संबंध चांगलेच होते; पण त्या पक्षातही असे म्हणणारे लोक होते की राष्ट्रसेवादल काँग्रेस समाजवादी पक्षाशी जोडले जावे. ...सेवादलासारखी शैक्षणिक संस्था स्वायत्त ठेवून देशभर ती वाढवणे, समाजवादी शीलाचे नागरिक बनविण्याच्या दृष्टीने आवश्यक आहे अशी माझी भूमिका होती.... माझी भूमिका बहुमताने मान्य झाल्यावर मीही हळूहळू सेवादलाच्या कार्यातून माझे लक्ष काढून घेऊन, लोकांचा गैरसमज वाढू नये म्हणून ट्रेड-युनियनच्या आणि पक्षाच्या कामात अधिक लक्ष घालू लागलो. एकच प्रमुख आमरण ठेवू नये, त्याचा 'पर्सनॅलिटी कल्ट' तयार होतो; ही भावना बऱ्याच लोकांच्या मनामध्ये होती. म्हणून दलप्रमुख बदलीत राहायचे हे धोरण स्वीकारले.

"आता मला लोक विचारतात की मी सातत्याने सेवादलाचेच काम का करीत राहिलो नाही; पण मलाही व्यक्तिगत आकांक्षा होत्याच. समाजवादी पक्षामध्ये आपण मोठे व्हावे, ट्रेड युनियनच्या क्षेत्रात मोठे व्हावे, या आकांक्षा होत्याच. आज असाही एक विचार मनात येतो की, दलप्रमुखत्वाची मुदत संपल्यानंतर दुसरा जो कोणी प्रमुख असेल त्याला मदत करीत मी सेवादलाच्या क्षेत्रात अधिक लक्ष पुरवले असते तर काय झाले असते? तसे झाले असते तर सेवादलाची शक्ती वाढली असते असे मला वाटते.

"राष्ट्रसेवादलातून समाजप्रबोधनाची काही नवी शक्ती निर्माण झाली का? हा प्रश्न जेव्हा माझ्या डोळ्यासमोर येतो तेव्हा 'हो, झाली आहे' असेच उत्तर मिळते. सेवादलाच्या कामाची एक वेगळीच गुणवत्ता आहे. दोन सामाजिक घटकातील अंतर भरून काढण्याचा जाणीवपूर्वक प्रयत्न सेवादलाने केला. सेवादलाने निर्माण केलेले नेतृत्व, राजकारणात असूनसुद्धा, थोडी मूल्ये धरुन असलेले असेच आहे. ते कोठल्याही पक्षामध्ये असो. माझ्यापुरते सांगावयाचे तर मी विरोधी पक्षात असूनसुद्धा काँग्रेसच्या लोकांमध्ये माझ्याबद्दल जी थोडीफार आस्था आहे, जो काही मान आहे त्याचे मुख्य कारण मी राष्ट्रसेवादलात काम केले आहे हे असण्याची शक्यता आहे. महाराष्ट्रातील ब्राह्मणेतर चळवळीत बरीच कटुता निर्माण झाली होती, परंतु सेवादलाच्या कार्यामुळे ती कटुता आता कमी झाली आहे. म्हणजे जातिभेद गेला आहे असे नाही परंतु वातावरण पुष्कळच बदलले आहे.

"अखेरीस व्यक्तिगत आंतरिक परिवर्तन झाले







अनुक्रमणिका

तरच सामाजिक परिवर्तनाला वेग येणार. या व्यक्तिगत मानसिक परिवर्तनाच्या दृष्टीने सेवादलाचे काम ट्रेड युनियन मधील कामापेक्षा अधिक महत्त्वाचे आहे. नवसमाजनिर्मिती ही मुळात समतेवर आधारित असावयास हवी. समतेवर आधारलेला आणि प्रत्येक व्यक्तिमत्वास विकासाची संधी देणारा समाज आपल्याला निर्माण करावयाचा आहे, हे सेवादलाचे ध्येय. त्या ध्येयाच्या आड येणाऱ्या समस्या दोन. हिन्दु-मुस्लिम प्रश्नाबाबत सेवादलाची भूमिका पहिल्यापासून स्पष्ट आहे. येथे धर्मातीत राष्ट्रवादच आला पाहिजे आणि तदंगभूत समान नागरी कायदा हवा ही भूमिका सेवादलाने सोडलेली नाही. हिन्दुसमाजांत असलेली विषमता आंतरजातीय विवाह जसजसे अधिक होत जातील तसतशी नष्ट होत जाईल. आता असे विवाह व्हावयाचे तर ज्यांना आपण आजवर जातीपातीवरुन कमी लेखले ते समान दर्जाचे झाल्यावाचून आंतरजातीय विवाह व्हावेत कसे? सेवादलात ब्राह्मणेतर समाजातील बहुसंख्य मंडळी होती. त्यातून शंभराहून जास्त युवकांनी आंतरजातीय विवाह केले आहेत. शंभर ही संख्या ही काही फार मोठी संख्या नव्हे. पण ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर अशी जी खाई होती ती दूर करण्याच्या कामी या विवाहांमुळे मदत झाली आहे ही गोष्ट सामाजिक परिवर्तनाचा इतिहास लिहू इच्छिणाऱ्याला दृष्टीआड करता येणार नाही. (मी एस०एम० पृ० १६०-१६३)

☑☑☑

## सत्याग्रहाची पूर्वतयारी

### राम मनोहर लोहिया

सत्याग्रह करावा की नाही यावर सत्याग्रहापूर्वी जनतेचे मत आजमाविता आले तर फार चांगले होईल. अर्थात् जेथे संघटित राजकीय पक्ष किंवा तत्सम संघटना आहेत तेथेच हे शक्य आहे. एखाद्या पूर्वनियोजित ठिकाणी मतदानासाठी जनतेला आमंत्रित करून किंवा घरोघर जाऊन यासंबंधीचे मत आजमावता येईल. मतदान जाहीर किंवा गुप्त यापैकी कोणत्याही मार्गाने जरुरीप्रमाणे घेतले जावे. मतदान एक आठवडा किंवा त्यापेक्षाही जास्त काळ घ्यावयास हरकत नाही. मात्र मतदानाच्या तारखांची सूचना भरपूर जाहीरपणे दिली पाहिजे.

मतदानापूर्वी दोन-तीन महिने गावोगावी, तालुक्याच्या व जिल्ह्याच्या ठिकाणी सभा, निदर्शने इत्यादी मार्गांनी जनतेमध्ये सत्याग्रह आंदोलनाच्या मागण्यांचा प्रचार झाला पाहिजे.

नंतर मतदान. मतदानानंतर व सत्याग्रह करण्यापूर्वी जनतेच्या मागण्या सरकारने मान्य कराव्या यासाठी जरूर तर नव्याने प्रयत्न करावयास हरकत नाही. यासाठी निदर्शनांचेच सहाय्य घेतले जावे. ही निदर्शने कोठे करावी हे लढ्याच्या स्वरूपावर अवलंबून राहील. सत्याग्रह लढा प्रादेशिक किंवा राष्ट्रीय पातळीवरचा असेल तर प्रदेशाची अथवा देशाची राजधानी या ठिकाणी अशीं जननिदर्शने केली जावी. कोणत्या तरी एकाच निश्चित तारखेला प्रदेशभर किंवा देशभर एकाच वेळी ही निदर्शने होऊ शकली तर त्यांचा जास्त प्रभाव पडेल.

मतदानानंतर सत्याग्रहींची भरती करण्याचेही काम हाती घेतले जाणे जरूर असते.

शक्ती असेल तेथे सत्याग्रह आंदोलनाचा प्रारंभ सार्वत्रिक संप, हरताळ, मिरवणुका व जाहीर सभांद्वारे करता येईल. परंतु हे शक्य नसेल तेथे त्यावाचून थांबण्याची गरज नाही.

सत्याग्रहाचे आंदोलन खच्ची करण्यासाठी पुष्कळ वेळा हितसंबंधी लोक आणि विशेषतः सरकार एक खोडसाळ प्रचार करीत असते. अनेक सत्याग्रही माफी मागून तुरुंगातून सुटून येत आहेत असे सांगितले जाते. जनतेला सत्याग्रहापासून दूर ठेवण्याचा तो एक दुष्ट प्रचार असतो. पण त्यात काही नवीन नाही. इंग्रजांच्या राज्यात हे होत असे. आजही ते चालू आहे एवढेच. हा प्रचार बहुतांश खोटा असतो. अनेकदा सरकारच स्वतः आपली माणसे सत्याग्रहींबरोबर गुप्तपणे पाठविते आणि त्यांना माफी मागवयास सांगून बाहेर आणते. पुष्कळदा सत्याग्रह आंदोलनाशी संबंध नसलेल्या रस्त्यावरच्या लोकांना जबरदस्तीने पोलिस पकडतात, कोठडीत नेतात आणि त्यांच्याकडून माफीनामा लिहून घेतात. अर्थात अशा आंदोलनात काही सत्याग्रही माफी मागत असतील. नाही असे नाही. फितवाफितवी व मनाची दुर्बलता हे त्याचे कारण असू शकेल. तसेच पोलिस करीत असलेली निर्दय मारपीट हे

अनुक्रमणिका

देखील आणखी एक कारण आहे. अखेर यातना सहन करण्याची अमर्याद ताकद सर्वांत कशी असणार? राणा प्रतापनेही माफीपत्र लिहिले होते. अकबरापर्यंत प्रत्यक्ष पोचू शकले नाही एवढेच. जगातील अनेक मोठमोठ्या नेत्यांच्या मनात माफी मागण्याचा विचार कधी ना कधी येऊन गेला आहे असे आढळून येते.

म्हणून माफी मागणाऱ्याचा तिरस्कार व राग करणे योग्य नाही. त्यामुळे त्याचे सारे जीवनच संपुष्टात येईल. त्याच्याशी सहानुभूतीने वागून त्याला पुन्हा लढावयास प्रवृत्त केले पाहिजे. त्याच्या चुकीचे याहून आणखी श्रेष्ठ प्रायश्चित्त नाही.

तुरुंगात सत्याग्रहींनी एकमेकांशी सहृदयतेने वागले पाहिजे. एकमेकांच्या चुकांवर उगीच वितंडवाद घालू नये. समाधानी मनाने तुरुंगात राह्यला शिकले पाहिजे. अभ्यास व बौद्धिक चर्चा यासाठी तुरुंगवासाचा उपयोग केला पाहिजे. किरकोळ प्रश्नासाठी तुरुंगाधिकाऱ्यांशी भांडत बसू नये. (सोशलिस्ट पार्टीच्या १९६० च्या सत्याग्रह आंदोलनाच्या निमित्ताने लिहिलेले टिपण व इतर स्फुट विचारांचे संकलन.)



# राष्ट्र सेवा दलाची भूमिका

## पन्नालाल सुराणा

**राष्ट्र सेवादल**

**सेवादलाची पाच तत्त्वे**

➤ विज्ञान निष्ठा ➤ धर्मनिरपेक्षता ➤ राष्ट्रवाद
➤ लोकशाही ➤ समाजवाद

### विज्ञाननिष्ठा

विज्ञानावर निष्ठा ठेवायची म्हणजे काय करायचे? तर वर वर्णन केल्याप्रमाणे विचार करायची सवय बुद्धीला लावायची. समोर आलेल्या प्रश्नांची व घटनांची परिस्थितीजन्य कारणे काय आहेत ती शोधायची. त्यांच्या परिणामांचा अंदाज घ्यायचा. जे सिद्ध झाले आहे त्याच्या आधारानेच दैनंदिन व्यवहार करायचा. प्रत्येक प्रश्नाकडे डोळसपणे बघायचे, साधक बाधक विचार करायचा, आणि सगळ्यांचे हित व्हावे अशी दृष्टी ठेवून निर्णय घ्यायचा.

### धर्मनिरपेक्षता

धर्मनिरपेक्ष म्हणजे धर्मविरोध नव्हे. ज्या क्षेत्रात स्वतःचे नियम व कार्यपद्धती आहेत त्यात धर्माने लुडबूड करू नये असा धर्मनिरपेक्षतेचा अर्थ होय. ज्याची आपल्या धर्मावर मनोमन श्रद्धा आहे त्याला ती श्रद्धा ठेवण्याचा, त्या रीतीने उपासना करण्याचा पूर्ण हक्क आहे. प्रार्थना केल्यामुळे मन शांत राहते, किंबहुना बळ वाढते असे ज्याला वाटते त्याने आपपल्या देवाची प्रार्थना करायला हरकत नाही. कुणी देवळात जाऊन भजन - कीर्तन म्हटले तर बिघडत नाही, कुणी मशिदीत जाऊन पाच वेळा नमाज पढला तर इतरांची त्याला हरकत असायचे कारण नाही. कुणी फक्त रविवारी चर्चमध्ये जाऊन प्रार्थना म्हणणार असो, तर म्हण बाबा. आपली काही हरकत नाही. इतरांना त्रास होणार नाही अशा रीतीने उपासना करायला हरकत नाही. विज्ञाननिष्ठ माणूस त्याला विरोध करणार नाही. पण मला मूल व्हावे म्हणून कुणी दुसऱ्याच्या लेकराचा बळी द्यायला लागले तर ते चालणार नाही. ते धर्माचरण नव्हे. तो राक्षसी स्वार्थसाधूपणा होय. तो खपवून घेतला जाणार नाही.

### राष्ट्रवाद

राष्ट्र मजबूत व बलशाली बनवण्यासाठी प्रत्येक नागरिकाने खटपट केली पाहिजे. कठोर परिश्रमाला पर्याय नाही. पण अंग मोडून मेहनत करण्याची इच्छा प्रत्येक बाईला व गड्याला तेव्हाच होईल जेव्हा राष्ट्राच्या व्यवहारात त्याला बरोबरीचे स्थान असेल. जुन्या दुष्ट रूढींच्या चाकोरीतच त्याचे किंवा तिचे जीवन बांधले जाणार असेल तर त्या गड्याला व बाईला भारत राष्ट्र बलशाली व्हावे असे कसे वाटेल? प्रत्येक माणसाला सुखी समाधानी व स्वाभिमानी जीवन जगता येईल अशी हमी मिळाली तरच प्रत्येकजण देशासाठी तळहातावर शीर घेऊन लढायला तयार होईल. जात, पात, धर्म, वंश, वर्ण, लिंग अशा कुठल्याही कारणावरून पक्षपात केला जाणार नाही अशी खात्री पटली म्हणजे प्रत्येक जण उत्साहाने देशविकासासाठी जिवाचे रान करू लागेल. म्हणून जुनी पोथी किंवा परंपरा किंवा धर्म हा राष्ट्राचा आधार मानणे बरोबर नाही. स्वातंत्र व समता हाच आधार मानला पाहिजे.

अनुक्रमणिका

**लोकशाही**

स्वातंत्र्याचा अधिकार म्हणजे लोकशाही. लोकशाही प्राणभूत तत्त्व म्हणजे व्यक्तिस्वातंत्र. प्रत्येकाला मनासारखे जीवन जगता आले पाहिजे. तो त्याचा हक्क आहे. दुसऱ्यालाही तसाच हक्क आहे. म्हणून दुसऱ्याच्या स्वतंत्र जीवन जगण्याच्या आड येणार नाही अशा रितीने आपले जीवन स्वतंत्रपणे जगण्याचा हक्क प्रत्येक स्त्री पुरुषाला वापरता आला पाहिजे.

देशाचा राज्यकारभार त्या पद्धतीने चालला पाहिजे. राज्य लोकांचे लोकांसाठी व लोकांच्या संमतीने चालणारे असले पाहिजे. तरच लोकांना न्याय मिळण्याची शक्यता आहे.

प्रत्येक नागरिकाला कुठल्याही बाबीबद्दल त्याच-प्रमाणे सत्ताधाऱ्यांच्या राज्यकारभाराबद्दल विचार करण्याचे व मत बनवण्याचे स्वातंत्र्य असले पाहिजे. आपले मत सांगण्याचे त्या आधारे संघटना बांधण्याचेही स्वातंत्र्य असले पाहिजे.

सत्ताधाऱ्यांचे चुकत असेल तर ते त्याचवेळी सांगण्याचा व सत्ताधाऱ्यांना बदलण्याचा, स्वत:च सत्ता-स्थानावर निवडून जाण्याचा हक्क प्रत्येक नागरिकालाही असलाच पाहिजे. आणि नागरिकाने तो वापरला पाहिजे.

नागरिकाला स्वातंत्र्य आहे असे नुसते कायद्याच्या किंवा घटनेच्या पुस्तकात लिहून उपयोगी नाही. त्याने ते वापरले पाहिजे. घोड्याला पाण्याजवळ नेता येईल. पण पाणी प्यायचे काम तरी घोड्याला स्वत: करावे लागणार ना?

नागरिकाला हक्क आहेत तशी त्याची कर्तव्यही आहेत. समाजाच्या मालमत्तेची नासधूस होऊ न देणे, कर वेळेवर प्रामाणिकपणे भरणे, आपले काम चोखपणे करणे, लाच न देणे वा न घेणे ही त्याची कर्तव्ये आहेत. नागरिकांनी स्वत: होऊन आपली कर्तव्ये चोखपणे बजाविली तरच लोकशाही टिकेल व प्रत्येकाला आपला आपला हक्क उपभोगता येईल.

लोकशाही ही केवळ राज्यकारभार करण्याची पद्धत आहे असे नाही. जीवन जगण्याचीच ती विशेष चांगली पद्धत आहे. मला माझे जीवन सुखी व्हावे असे वाटते. माझ्या घरातील भाऊ, बहीण, आई, वडील, बायको, मुलगी, मुलगा यांनाही तसेच वाटत असणार. त्यांच्या त्या आकांक्षेच्या आड मी येता कामा नये. उलट त्यांच्या व्यक्तिविकासाला मी मदत केली पाहिजे. केवळ कुटुंबातले तेच बहीण - भाऊ न मानता समाजातले सगळे स्त्री - पुरुष हे माझे बहीण भाऊच आहेत असेही वळण मनाला लावले पाहिजे. घरात, रस्त्यात, शाळेत, शेतात, कारखान्यात मी प्रत्येक माणसाशी माणसासारखे वागले पाहिजे. त्याला किंवा तिला हीन लेखता कामा नये. माझे म्हणणे लोकांनी ऐकावे असे मला वाटते. दुसऱ्यालाही तसेच वाटत असणार. मग दुसऱ्याचे म्हणणे शांतपणे ऐकून घेण्याची, त्याच्यात जे चांगले असेल ते स्वीकारण्याची, स्वत:चे चुकीचे असेल ते सोडून देण्याची तयारी असली पाहिजे.

बोलल्याप्रमाणे वागणे ही लोकशाही जीवनपद्धतीची गुरुकिल्ली आहे. जेवढ्या प्रमाणात नागरिक अशा रीतीने वागू लागतील त्या प्रमाणात देशाची लोकशाही बळकट व निरोगी होत जाईल.

**समाजवाद**

**शोषणापासून मुक्ति म्हणजे समाजवाद**

कुणी श्रीमंत आई - बापाच्या पोटी जन्माला आला म्हणून त्याला वाट्टेल तेवढे शिक्षण घेता येईल व जो गरीबाच्या पोटी जन्माला आला त्याला आठव्या वर्षापासून हॉटेलात कपबशा विसळाव्या लागू नयेत. प्रत्येकाला किमान शिक्षण उपलब्ध करून देणे समाजाचे व सरकारचे कर्तव्य आहे.

प्रत्येकाने मनापासून काम केले पाहिजे. त्याला काम करण्याची संधी मिळेल, रोजगार मिळेल अशी व्यवस्था समाजाने, सरकारद्वारा केली पाहिजे.

केल्या कामाचा चोख दाम मिळाला पाहिजे. ज्याची उत्पादनसाधनावर मालकी आहे त्याला चैनीत लोळता यावे, व ज्याच्याकडे जमीन जुमला नाही त्याला बारा तास घाम गाळूनसुद्धा दोन वेळा पोटभर जेवण मिळू नये ही अन्यायकारक व्यवस्था आहे. सर्वांच्या प्राथमिक गरजा चांगल्या प्रकारे भागल्याशिवाय कुणालाही चैन करता येणार नाही. अशी व्यवस्था निर्माण करणे म्हणजे समाजवाद! कष्टकऱ्यांना स्वत:च्या संघटनेद्वारा न्याय्य मिळवत मिळवत अशी व्यवस्था कायम करायची आहे.

**ही होय सेवादलाची पंचसूत्री**

प्रत्येक मुलामुलीने, तरुण - तरुणीने, आबाल-वृद्धांनी ती स्वीकारली पाहिजे.

कुणी म्हणेल हे सगळे तत्त्वज्ञान झाले. आज घडीला आपल्या अवतीभवती काय दिसते? तर प्रत्येकाचा स्वार्थ बोकाळला आहे. चटकन खूप पैसा मिळवावा व चैन करावी










अशी वृत्ती बळावली आहे. पैसा मिळवण्यासाठी कुठल्याही मार्गाने जायला माणसे कचरत नाहीत. स्वतःच्या हाती असलेला छोटा - मोठा अधिकार हा दुसऱ्याला लुबाडण्यासाठी वापरला जात आहे. समाजात आपमतलबीपणाचा सुळसुळाट झाला आहे. भ्रष्टाचार बोकाळला आहे. गुंडगिरी व हिंसाचार फैलावतो आहे. स्वतःची सत्ता व प्रतिष्ठा वाढविण्यासाठी लोकांच्या धार्मिक श्रद्धेचा भांडवल म्हणून वापर केला जातो आहे. सगळे जण त्या मार्गाने जात असताना मी एकट्यानेच ही बिकट वाट का चोखाळावी?

याचे कारण मी माणूस आहे. मला जे पटते, व योग्य वाटते, ते करणे हे शहाणपणाचे आहे. ते माणसाचे लक्षण आहे. पाणी उताराकडेच वळणार. डोंगर चढण्याची जिद्द, हिमालय सर करण्याची ईर्षा माणूसच दाखवू शकतो. स्वतःच्या मनाला पटते त्याप्रमाणे वागण्याने खरेखुरे समाधान लाभते. मन शांत राहते. आत्मविश्वास वाढतो. पैशाच्या मागे लागलेली, वेडेवाकडे मार्ग अनुसरणारी दुसऱ्यांना बहकवणारी - फसवणारी माणसे आतून अस्वस्थ असतात. त्यांना सतत भीती वाटत असते. म्हणून ती जास्तीत जास्त क्रूर व आक्रस्ताळी बनत जातात. माणूसपण हरवून बसतात.

याउलट स्वतःच्या बुद्धीशी प्रामाणिक राहून काम करणारा, जीवन जगणारा माणूस शांतचित्त असतो. दुसऱ्यांना मानसिक आधार देऊ शकतो. भारतीय परंपरेने ज्याची थोरवी वर्णली आहे ते हे आत्मबल होय. डोळस निष्ठा व ध्येयवादी जीवन जगण्यातून हे आत्मबल प्राप्त होते. अशी माणसे घडवणे हे राष्ट्र सेवादलाचे उद्दिष्ट आहे. असे आशावादी जीवन जगणाऱ्या स्त्री - पुरुषांची संख्या वाढण्यानेच भारत राष्ट्राचा खरा उद्धार होणार आहे. तो साधावा हीच तर सेवादलाची अंतरीची इच्छा. त्यासाठी ही सगळी धडपड!

☑ ☑ ☑

## सर्वांचे मनःपूर्वक आभार

### सुभाष वारे

अवघड परिस्थितीत परिवर्तनवादी चळवळीत आम्ही क्रांती घडवून आणली असा दावा जर कोणी केला तर तो हास्यास्पदच ठरेल. राष्ट्र सेवा दलाचे काम तर ग्लॅमर नसलेले, खाली मान घालून संघटना बांधणी करण्याचे काम. त्याची प्रगतीही संथ पण भरीव असणार आणि आजच्या कामाची फळे दीर्घकाळानेच मिळणार. जात किंवा धर्माच्या अस्मितेला आवाहन करून अनेक संघटना अचानक जोमाने वाढतात आणि तितकाच अचानकपणे ओहोटीला लागतात. त्याच-बरोबर एखाद्या व्यावसायिक गटाला आवाहन करणाऱ्या ट्रेड युनियन्सचाही वेगाने प्रतिसाद मिळू शकतो. पण तो प्रतिसाद अल्पांशानेही व्यापक समाज परिवर्तनाकडे वळविणे अवघड जाते. राष्ट्र सेवा दलाच्या कामात सहभाग देणाऱ्यांना नैतिक, मानसिक समाधानापलीकडे कुठलेही वैयक्तिक फायद्याचे आश्वासन संघटना देऊ शकत नाही. या पार्श्वभूमीवर समाजात पसरलेला टोकाचा चंगळवाद जर पाहिला तर तरुणतरुणींना हा वसा घ्यायला लावणे किती अवघड आहे हे काही नव्याने सांगायची आवश्यकता नाही. त्यातून संघटनात्मक कामासाठी आपण परदेशी किंवा सरकारी निधी न स्वीकारण्याचे बंधन स्वतःवर घालून घेतले आहे.

हे सर्व जरी खरे असले तरी मला दोन गोष्टींचे समाधान आहे. १. राष्ट्र सेवा दलाच्या झेंड्याखाली जमा होणाऱ्या तरुण-तरुणींची संख्या वाढती आहे. हे सहजपणे कोणाच्याही लक्षात यावे. २. या तरुण-तरुणींचा जन-आंदोलनातील सहभागही वाढतो आहे. पण याच एका घटनेमुळे समविचारी संघटनांच्या/जनआंदोलनाच्या राष्ट्र सेवा दलाकडून ज्या अपेक्षा आहेत त्यात प्रचंड वाढ झाली आहे. भविष्यकाळात या अपेक्षा राष्ट्र सेवा दल पूर्ण करील हा विश्वास आताच्या वाटचालीने निर्माण केला आहे. पण समविचारी संस्था/संघटना या राष्ट्र सेवा दलाच्या संघटना विस्ताराकडे पुरेसे लक्ष देत नाहीत, ही प्रक्रिया परस्परपूरक असावी हे समजून घेत नाहीत, असे अनेक सेवादल सैनिकांना वाटत आहे. आज समर्थ समाजवादी राजकीय पक्ष अस्तित्वात नाही. अशावेळी राष्ट्र दलाच्या भक्कम पाठिंब्यावर या जनआंदोलनाच्या वाटचालीतूनच भविष्यात परिवर्तनकारी राजकीय पक्ष उभा रहावा असे जे स्वप्न आहे त्या दिशेने काहीच हालचाल होताना दिसत नाही. जनआंदोलनाने ही प्रासंगिक, त्या त्या वेळच्या गरजेनुसार आणि पुन्हा विस्कळीतपणे होताना दिसतात. संघटितपणे आणि एका निश्चित दिशेने काही वाटचाल होताना दिसत नाही. अशावेळी राष्ट्र सेवा दल सैनिकांचा त्यातील सहभागही थोडा इथे थोडा तिथे आणि

निश्चित परिणाम कुठेच नाही अशा पद्धतीने होतो. याचीही अस्वस्थता सेवा दल सैनिकांच्या मनात आहे त्यामुळेच काही वर्षे कुठेच जाणे नको. आपण आपले राष्ट्र सेवा दलाचेच संघटन भक्कम करूया. अशाही भावना व्यक्त होताना दिसतात. अर्थात समाजवादी आंदोलन आणि राष्ट्र सेवा दल एकाच वेळी चालवावयाच्या परस्परपूरक प्रक्रिया आहेत हे सर्वांनाच मान्य आहे पण तसे समाजवादी आंदोलन नजरेच्या टप्प्यातही नसल्याने ही अस्वस्थता आहे. ही कोंडी फोडलीच पाहिजे.

(राष्ट्र सेवा दल पत्रिकेतून, मार्च २००७)



## भांडवलशाही व समाजवादाचे बदलते स्वरूप

### सदानंद वर्दे

संक्षेपाने मी असे म्हणेन की,

१. एका शतकात भांडवलशाहीचे रूप पालटले आहे. कल्याणकारी राज्य, अर्थसंकल्पीय साधनाद्वारे मागणीचे, रोज़गाराचे आर्थिक स्थैर्याचे व्यवस्थापन, भाववाढ व भावघट यांच्या अतिरेकामुळे समाजहितावर मोठा आघात होणार नाही याची खबरदारी, यामुळे विकसित देशात सुधारित झालेल्या भांडवलशाहीला मानवी चेहरा प्राप्त झाला आहे. व्यवस्थेचा आधार बाजारप्रणाली हा असला तरी समाजहितासाठी शासकीय हस्तक्षेपाचे क्षेत्र वाढले आहे. ही स्थित्यंतरें समिपीकरणाच्या सिद्धांताला काही प्रमाणात पुष्टी देतात.

२. उदारमतवादी लोकशाही आणि मानवी स्वातंत्र्याची जोड भांडवलशाहीला मिळाल्यामुळे नित्यनूतन कल्पनांचा परिपोष करुन सातत्याने उत्पादनक्षमता वाढविण्यात आलेले यश हे भांडवलशाहीचे मोठे सामर्थ्य आहे.

३. भांडवलशाहीच्या अत्याधुनिक स्वरूपात म्हणजे कॉंप्युटर तंत्रज्ञान व माहिती क्रांतीच्या स्फोटानंतरच्या काळात भांडवलशाहीचे आंतरराष्ट्रीयीकरण (जागतिकीकरण) होत आहे. जीवघेण्या गतीने बदलणाऱ्या आणि रोजगाराला स्वाहा करणाऱ्या अत्याधुनिक तंत्रविज्ञानामुळे बेकारी निर्माण होत आहे. कालौघात नव्याने रोजगार उपलब्ध होईल असे अर्थशास्त्रज्ञांचे मत असले तरी याबाबत मतभेद आहेत. उत्पादनतंत्र फार झपाट्याने श्रमाची जागा घेत आहे. ही निःसंशय विकसित देशातील सद्यकालीन समस्या आहे.

४. मॉर्गन, फोर्ड, सीमेन्स यांसारख्या जुन्या भांडवलदार गर्भश्रीमंताच्या जागा आता सेवा व माहिती क्षेत्रातील बड्या पगारदार व्यावसायिकांनी घेतली आहे. गालब्रेथ यांच्या मते संख्याबल व पैसा या दोन्ही दृष्टींनी त्यांची ताकद मोठी आहे. बेकारी, गरिबी दूर करण्यासाठी, खर्च भागविण्यासाठी शासनाने अधिक कर आकारणी करण्याला त्यांचा विरोध आहे. तसेच वाढीव खर्चाने चलनवाढ होईल व आपली वास्तव उत्पन्ने कमी होतील म्हणूनही हे साधनवर्ग गरिबांसाठी तोशीस सहन करायला तयार नाहीत.

५. रशियन समाजवादी अर्थव्यवस्थेच्या अपयशामुळे समाजवाद म्हणजे उत्पादनसाधनांची सार्वजनिक मालकी व केंद्रानुवर्ती नियोजन हे समीकरण मागे पडले आहे. नफ्याच्या प्रेरणा, खाजगी मालकी आणि मानवी स्वातंत्र्ये ही नवनवीन कल्पनांचा परिपोष करून उत्पादन सामर्थ्य वाढविण्यासाठी आवश्यक आहेत. आणि स्पर्धा व बाजारप्रणाली पूर्णपणे त्याज्य नाहीत याची जाणीव विकसित देशातील समाजवाद्यांना झाली आहे. जर्मन सोशल डेमोक्रॅटिक पक्षाने आपल्या घटनेतील उत्पादनसाधनांच्या सार्वजनिक मालकीवर विश्वास ठेवणारे कलम चार काढून टाकले आहे.

६. वाटपावर एकतर्फी आग्रह बरोबर नाही. उत्पादनक्षमतेत सातत्याने वाढ व्हायला हवी. 'गरीब एक समान' हे तत्त्वज्ञान एखाद्या मठाचे होऊ शकेल. समाजाच्या निर्मितीचे नाही. या संदर्भातच तोटा करणाऱ्या किंवा गतिशून्य सार्वजनिक उपक्रमांचे खाजगीकरण या धोरणाचा स्वीकार होत आहे. विकसित देशातील समाजवादी या दृष्टीने नव्याने विचार करीत आहेत. पण विकसनशील देशातील समाजवादी आपल्या ठरावीक पठडीच्या बाहेर यायला तयार झालेले दिसत नाहीत.

(नाशिक विचारवेध संमेलन, १९९६)

(शतकांतराच्या वळणावर, डॉ० बाबासाहेब आंबेडकर अकादमी, सातारा, पृ० १६४-१६६)



# भारतातील लोकशाही समाजवाद : पुनर्रचना व आत्मनिरीक्षणाचे आव्हान

देवदत्त दाभोलकर

## कालगती

रशियाचा पहिला उपग्रह आकाशात परिभ्रमण करु लागला आणि 'स्फुटनिक' हा शब्द रशियाने एका दिवसात जगाला शिकवला. विज्ञान-तंत्रज्ञानाच्या क्षेत्रात जगाला तो एक महान धक्का होता.

'पेरेस्त्रोयका' व 'ग्लासनोस्त' हे शब्दही रशियाने जगाला त्याच गतीने शिकवले. गागरिनच्या उड्डाणापेक्षाही गोर्बाचेव्हची ही कालचक्र फिरवू पाहणारी भरारी अधिक विस्मयकारक होती.

या भरारीचे अखेर काय होईल? हे इतिहासच सांगू शकेल.

स्टॅलिनच्या निधनापूर्वी काही वर्षे ऑरवेलने लिहिले होते : 'आज स्टॅलिनच्या विरुद्ध बोलणे रशियात जितके धोकादायक आहे तितकेच कदाचित पाच वर्षानंतर त्याच्या बाजूने बोलणे धोकादायक ठरु शकेल. परंतु त्यामुळे मूळ परिस्थितीत फरक पडला असे होणार नाही. नथिंग इज गेन्ड बाय टीचिंग द पॅरट अ न्यू वर्ड' पोपटाला नवीन शब्द शिकवला तरी पोपटपंची ती पोपटपंचीच.

सात वर्षांपूर्वी केलेल्या तीन आठवड्यांच्या रशियात प्रवासात मी स्टॅलिनचा कसोशीने शोध घेण्याचा प्रयत्न केला होता. नावनिशाणीही राहू न देणे म्हणजे काय, याची प्रत्यक्ष प्रचिती त्या वेळी आली. स्टॅलिनविषयी माझ्या मनात स्वाभाविकपणे प्रतिकूल भावना होती परंतु तरीही विभूतिपूजेच्या वातावरणात वाढलेल्या माझ्या भारतीय मनाला ही गोष्ट खटकली होती. शालेय पाठ्यपुस्तकांचा मी स्टॅलिनसाठी कसोशीने शोध घेतला. कोठेही स्टॅलिनचे चित्र नव्हते. 'माझ्यानंतर स्टॅलिनने अधिकारावर येणे हिताचे होणार नाही' या लेनिनच्या पत्राचा निर्देश होता. झालेल्या प्रगतीचे, युद्धातील जयाचे श्रेय अशा नेतृत्वाखालीही जनतेने दाखविलेल्या निर्धाराला व राष्ट्रप्रेमाला देण्यात आले होते.

आज स्टॅलिनचे अधिकच अवमूल्यन केले जात आहे. अंध, कर्मठपणे स्टॅलिनच्या आदेशाचे पालन करीत आलेल्या परराष्ट्रातील साम्यवाद्यांखेरीज अन्य कोणाला या घटनेचे दुःख होण्याचे कारण नाही व होतीही नाही.

परंतु गोर्बाचेव्हने ज्या गतीने नवे वळण घेतले त्या गतीच्या हेलकाव्यात त्या गाडीत बसलेल्या अनेकांचा तोल जाणे स्वाभाविक होते. गाडीबाहेर जे होते त्यांनाही असे वळण कसे घेतले जाऊ शकते, असा विस्मयकारक धक्का बसला. गोर्बाचेव्ह शेवटी यशस्वी झाला तर विसाव्या शतकातील मानवजातीच्या इतिहासातील सर्वात विस्मयकारक घटना - अशीच रशियातील नव्या परिवर्तनाची नोंद होईल.

आपल्या ठिकाणी, आपल्या संदर्भात आपण आपल्या यशापयशाची परखड मीमांसा आणि त्या यशा-अपयशाचे मूल्यमापन करण्याचा काळ आलेला आहे हा गोर्बाचेव्हने आपल्या कृतीने सर्व साम्यवादी-समाजवादी विचारप्रणालीच्या लोकांना दिलेला इशारा आहे.

स्वप्नरंजनात रमणाऱ्या भारतीय समाजवाद्यांनी निदान 'स्वप्नातून जागे व्हा' एवढा तरी इशारा यातून घेतला पाहिजे असे म्हटले तर ते विधान अतिरेकी व आजवरच्या समाजवादी आंदोलनाला अन्यायकारक होईल काय?

## हरलेली लढाई?

भाई वैद्य यांचा षष्ट्यब्दीपूर्ती निमित्त पुण्यात सत्कार झाला. चंद्रशेखर प्रमुख पाहुणे होते, आदी वृत्तांत सर्वांना माहीत आहे. आपले आभाराचे भाषण करताना भाई वैद्य नानासाहेब गोरे यांना उद्देशून म्हणाले, 'नानासाहेब, समाजवादाची लढाई आपण हरलो आहोत, हे आपण मान्य केले पाहिजे.' त्यांच्या आवाजात साहजिकच खंत होती. 'आपण लढाई हरलो असलो तरी आपण शेवटी युद्ध जिंकले पाहिजे, जिंकणार आहोत' अशा आशयाच्या आशावादावर, निर्धारावर त्यांनी ही मांडणी पूर्ण केली. 'इतिहासाच्या कालचक्रानुसार अखेर साम्यवादाचा विजय होणे केवळ इष्टच नाही तर अटळही आहे' हा मार्क्सचा 'शास्त्रीय' सिद्धांत या अजिंक्य आशावादामागे उभा होता असे मला वाटत नाही. परंतु ते समाजपरिवर्तन समाजात सर्वांच्या दृष्टीने हिताचे आहे ते घडवून आणण्यात आपण कितीही वेळा अपयशी ठरलो तरी अखेरपर्यंत आपले प्रयत्न त्याच दिशेने चालू राहिले पाहिजेत अशी या उद्गारांच्या मागील भूमिका असू शकते. तसे पाहिले तर 'कल्पनेचा स्वीकार' या दृष्टीने समाजवादाच्या बाबतीत भारतात अधिक काय मिळवायचे राहिले आहे? आपली राज्यघटनाच समाजवादी समाजरचनेच्या स्वीकाराचा उद्घोष करते.






कृतीत हे अंतर तोडण्याचा प्रयत्न राज्यकर्त्या पक्षानेही केला नाही, विरोधी पक्षानेही केला नाही, अगदी समाजवादी पक्षानेही केला नाही. हे विधान वस्तुस्थितीला धरुन होईल की होणार नाही? आणि कदाचित वस्तुस्थितीला धरुन असले तरी या तिघांच्या कृतिशीलतेत आपण फरक केला पाहिजे व 'श्वा युवा माधवा' अशा पद्धतीने त्यांची निदान एकत्र मुटकुळी बांधू नये असा आग्रह आपल्याला धरता येईल की येणार नाही?

आपली समाजवादाच्या दृष्टीने आग्रही वाटचाल झाली नाही याची गमके स्पष्ट आहेत. गेल्या चाळीस वर्षांच्या काळानंतरही भारतामधील निरक्षर लोकसंख्येचे प्रमाण साठ टक्के आहे. दारिद्र्य रेषेखालील लोकांचे प्रमाणही चाळीस टक्के; त्या रेषेला लवचिकपणे खाली खेचण्याचा अशास्त्रीय प्रयत्न आपण सोडून दिला तर ती रेषाही साठ टक्क्यांच्या आसपासच स्थिरावलेली आपल्याला आढळून येईल. निरक्षरता व दारिद्र्य यांचे हे प्रमाण केवळ भयंकर नसून ते एकमेकांत अटळपणे गुंतलेले आहे. भारतीय अर्थव्यवस्थेत समाजवादी समाजरचनेच्या दृष्टीने मूलभूत परिवर्तन झाल्याखेरीज कदाचित आर्थिक विकास साधता आला तरीही वरील पन्नास टक्क्यांचाच (किंबहुना त्यांतील सर्वोच्च दहा टक्क्यांचाच) त्यातून फायदा होईल. या समृद्धीच्या पाण्याचे झिरपे झरे खालील पन्नास टक्क्यांपर्यंत फारच कमी प्रमाणात पोचतील व श्रीमंत आणि गरीब यांच्यामधील दरी उत्तरोत्तर वाढतच जाईल. आजवर तसेच घडले आहे व यानंतरही तसेच घडत राहील. या चक्राला धक्का देण्याचे सामर्थ्य भारतीय समाजवाद आंदोलनाने गेल्या चाळीस वर्षांचत कमावलेले नाही. काही घडले असले तर प्रारंभीच्या काळात असलेले सामर्थ्य गमावले आहे असेच घडले आहे.

'समाजवादाची लढाई आपण हरलो आहो' या स्वरूपाच्या विधानाविषयी ज्यावेळी विरोधक उपहासाने व समविचारी लोक खिन्नतेने असा प्रश्न विचारतात, 'खरोखरी समाजवादाची लढाई या कालखंडात निदान कधी खेळली तरी गेली होती का?' - तेव्हा त्या प्रश्नाचे उत्तरही परखडपणे आपण शोधले पाहिजे!

याच कालखंडात जवळजवळ अशाच परिस्थितीत चीनमध्ये साम्यवादी क्रांती झाली, पुनर्रचनेची चर्चा व कार्यवाही झाली व आज साम्यवाद सुस्थिर पायावर उभा आहे हे पाहिले की भारतीय समाजवाद्यांच्या अपुरेपणाची जाणीव अधिकच तीव्रतेने होते. असे वाटणे हेही कदाचित भारतातील साम्यवाद्यांना, समाजवाद्यांना अन्यायकारक असेल. परंतु भारत-चीन परिस्थितीतील फरकाचे मूलगामी विश्लेषण कोणत्याही भारतीय साम्यवादी वा समाजवादी विचारवंताने केलेले माझ्या पाहण्यात नाही. केवळ नेतृत्वातील गुणवत्तेचाच हा फरक असेल का?

**अनुकूलता असताना...**

तसे पाहिले तर भारताला स्वातंत्र्य मिळाले त्यावेळी वैचारिक व भावनात्मक पार्श्वभूमी समाजवादी समाजरचनेला अनुकूल होती. स्वातंत्र्य संपादनापूर्वीच्या काळात अपरिहार्य-पणे व स्वातंत्र्य संपादनानंतर सत्तेच्या हव्यासामुळे काँग्रेस ही संघटना अठरा धान्यांचे कडबोळेच राहिली. (काँग्रेसचे अठरा धान्यांचे कडबोळे अधिकारावर राहते, परंतु आपणा सर्वांचे कडबोळे यदाकदाचित् प्रसंगवशात व प्रयत्नपूर्वक केले तर मोडूनच पडते असे का घडते याचा विचारही पुन्हा एकीच्या प्रयत्नासाठी धडपडणाऱ्या विरोधी पक्षांनी करावयास हवा. काँग्रेसच्या बाबतीत केवळ सत्तेच्या सूत्रामुळे असे घडते असे मानले तरी जनता पक्षाला तो अधिकारावर असताना मध्येच का मोडून पडावे लागले? असो) परंतु काँग्रेसमधील अंतर्गत प्रवाह कितीही विविध असले तरी गांधीजींचे नेतृत्व दलितांच्या बाजूने उभे राहण्याची मनिषा व ईर्ष्या बाळगणारे होते. त्यांची या संदर्भातील तात्त्विक भूमिकाही स्पष्ट होती. १९२२ मध्ये अहमदाबाद न्यायालयाला सादर केलेल्या आपल्या लेखी निवेदनात त्यांनी ती तीव्रपणे मांडलेली होती. 'ब्रिटिश राजवट व भारतातील वरिष्ठ वर्ग भारतातील दरिद्री जनतेचे शोषण करत आहेत व जगात परमेश्वर असेल तर त्या दोघांनाही आपल्या कृष्णकृत्यांचा जाब द्यावा लागेल' असे त्यांनी अंतःकरण पिळवटून म्हटले होते. आयुष्याच्या अखेरी-अखेरीसही वरिष्ठ वर्गांना उद्देशून 'दरिद्री जनतेच्या मानगुटीवरुन मुकाट्याने बाजूला व्हा' असा इशारा त्यांनी दिला होता. जवाहरलालजी तर त्यांनीच निर्दिष्ट केलेले त्यांचे वारस होते व 'मी गेल्यानंतर तो माझीच भाषा बोलेल' असा गांधीजींना विश्वास होता. जवाहरलालजींच्या खालोखाल किंवा त्यांच्या बरोबरीचे नेते, सरदार पटेल होते.

सरदार पटेलांवर समाजवादी विचारसरणीचा आरोप कुणी केला नसता; परंतु गांधीजींच्या वचनाचा आदेश मानून त्यांनी जवाहरलालजींशी कधीही सत्तास्पर्धा केली नाही. केले ते पूरक कार्यच. किंबहुना गेल्या चाळीस वर्षांत समाजवादाच्या

दृष्टीने सर्वात महत्त्वाची घडलेली घटना त्यांनी घडवून आणली. सर्व संस्थानांचे भारतात विलिनीकरण ही ती घटना होय. केवळ भांडवलदारांच्या वर्चस्वाखाली असलेला असाच जर काँग्रेस पक्ष असता, जवाहरलालजी जर त्याचे नेते नसते, सरदार पटेलांचे नेतृत्व उपलब्ध नसते, वा केवळ सनातनी राष्ट्रवादी वृत्तीचे लोक अधिकारावर असते तर हे घडून येऊच शकले नसते.

भारताने आर्थिक सत्याग्रही मार्गाने आपले सामर्थ्य संघटित करून स्वातंत्र्य मिळविले. भारताने एक गोळीही न झाडता (निजामाचा अपवाद करता) संस्थानांच्या विलिनी-करणाचे प्रभावी पाऊलही समाजवादाच्या दिशेने उचलले. सरदार पटेल तर लौकर गेले. जवाहरलालजींनी मात्र दीर्घकाळ राष्ट्राचे एखमुखी नेतृत्व केले. संमाजरचनेचा प्रस्तावही आवडी काँग्रेसमध्ये मान्य झाला. मिश्र अर्थव्यवस्थेच्या दिशेने आपल्या नियोजनाची वाटचाल सुरु झाली. पुढे बँकांचे राष्ट्रीयीकरण झाले, अर्थव्यवस्थेच्या मोक्याच्या स्थानावर कब्जा मिळविण्यात आला. (कमांडिंग हाइट्स् ऑफ द इकॉनॉमी) 'गरिबी हटाव' यासारख्या घोषणेच्या आधारावर इंदिराजींनी निवडणुका लढविल्या आणि जिंकल्या.

हे सारे घडले. वातावरणातील देखावा तर समाजवादाचाच होता. परंतु गरिबी काही हटत नव्हती; श्रीमंत आणि गरीब यांच्यामधील दरी उत्तरोत्तर वाढतच होती.

## गमावलेले गतिसूत्र

हे सर्व घडत असताना लोकशाही समाजवादी वृत्तीचे पक्ष काय करत होते? काय करू शकले असते?

याचा विचार करताना काही गोष्टींविषयी आपल्या मनात स्पष्टता हवी.

१. जनजागरण आणि जनसंघटन हाच अहिंसक लोकशाही क्रांतीचा मार्ग आहे. १९४७ मध्ये भारत स्वतंत्र झाला ते भारताने ब्रिटिशांना हाकलून देण्याइतके लष्करी सामर्थ्य उभे केले म्हणून नव्हे; तर भारतात ब्रिटिशांना सुस्थिर राज्य करता येणे अशक्य व्हावे असे जनआंदोलन गांधीजींना उभे केले म्हणून.

२. या शक्तीच्या समोरच संस्थानिक एक गोळीही न झाडता शरण आले होते.

३. याच शक्तीसमोर मोठे जमीनदारही नमतील अशी स्वाभाविक अपेक्षा होती. जमीनदारी नष्ट करण्याच्या कायद्याच्या बाजूने जमीनदार आपल्या पळत्या पायाने मतदान करतील (दे शॅल व्होट विथ देअर रनिंग फीट) अशी अपेक्षा स्वातंत्र्यसंपादनाच्या आधीच जवाहरलालजींनी व्यक्त केली होती.

४. भांडवलदारांच्या बाबतीत प्रश्न अधिक अवघड होता. याचे नीट उत्तर गांधीजींच्याकडेही होते असे दिसत नाही. 'विश्वस्तवृत्ती' हे एक अतिशय अपुरे उत्तर होते. परंतु मार्गाविषयी त्यांच्या मनात स्पष्टता होती. भांडवलदार स्वतः होऊन आपल्यावर नैतिक बंधने घालून घ्यावयास तयार झाले नाहीत तर सत्याग्रही मार्गाने जनजागरण व जनसंघटन करून व योग्य ते कायदे करून त्यांच्यावर नियंत्रण घालावे लागेल, ही भूमिका आपल्या आयुष्याच्या अखेरीस त्यांनी मांडली होती.

हे जनजागरण व जनसंघटन करण्यासाठी सत्तेपासून दूर राहून लोकसेवक म्हणून कार्य करणाऱ्या क्रांतिकारकांची गरज आहे हे त्यांनी ओळखले होते. ३० जानेवारीच्या आधी एकदोन दिवसच तयार केलेल्या आपल्या निवेदनात, 'आता यानंतर काँग्रेस पक्ष विसर्जित करावा व लोकसेवकांच्या संघटनेत त्याचे रूपांतर करावे' असे त्यांनी म्हटले होते. काँग्रेस पक्षाने त्यांचे हे मत स्वीकारले नाही याचे आश्चर्य वाटावयास नको. परंतु समाजवादी लोकांनी या सूचनेतील रहस्य आपल्यापुरते स्वीकारले नाही ही आश्चर्याची व दुःखाची घटना आहे. मृत्यूच्या आधी काही दिवस गांधीजी डॉ. लोहियांना म्हणाले होते, 'मला तुझ्याशी एकदा सवडीने सविस्तर बोलायचे आहे.' ही भेट होऊ शकली नाही. गांधीजींना या लोकसेवकांच्या संघटनाबांधणीबद्दल लोहियांशी बोलावयाचे असेल काय असे आपले मनात येऊन जाते. डॉ. लोहियांची निकटवर्ती मंडळी कदाचित याविषयी अधिक काय सांगू शकतील?

## कठोरआत्मपरीक्षण

जनजागरण व जनसंघटन (विशेषतः दलित, शोषित वर्गांचे) हा आपला अग्रक्रमाने चालणारा कार्यक्रम म्हणून समाजवादी पक्षाने स्वीकारला असता, सत्याग्रहाचे शस्त्र आवश्यक तेथे प्रभावीपणे वापरावयाचेच अशी भूमिका घेऊन त्याप्रमाणे आचार केला असता; डाव्यांची एकजूट हा सिद्धांत एक डावपेच म्हणूनही स्वीकारला असता व निदान अंतर्गत फाटाफुटी जरी या सिद्धांताचे महत्त्व ओळखून टाळल्या असत्या तरी डाव्या आघाडीच्या सामर्थ्याचे भारतातील चित्र








आज किती तरी वेगळे दिसले असते. भूदान-ग्रामदान आंदोलनाने तयार झालेले वातावरण त्यांना विनोबाजींचा विरोध लक्षात घेऊनही सत्याग्रही पद्धतीने अधिक तापविता आले असते व क्रियाशील करता आले असते. रोजगार हमी योजना आदींसारख्या उपक्रमांचा दलित शोषितांच्या मोर्चे-बांधणीसाठी उपयोग करून घेता आला असता. आपल्या नेतृत्वाने व आधाराने चालणाऱ्या संघटित कामगारांच्या संघटना व त्यांची आंदोलने केवळ आपापल्या स्वार्थापुरते न पाहता दरिद्री भारताचे अन्य संदर्भही आपली धोरणे आखताना लक्षात ठेवत आहे अशी दक्षता घेतली असती. आज जो जो वर्ग संघटित होतो (याला प्राध्यापकवर्गही अपवाद नाही) तो वरीष्ठ वर्गाच्या हितसंबंधातच आपले हितसंबंध समाविष्ट करून घेतो व त्यांत समाधान पावतो असे दृश्य दिसते. दारिद्र्यरेषा हटत नाही यापेक्षाही दारिद्र्यरेषा हटलीच पाहिजे अशी आच असणारे जे लोक असावयास हवेत तेही प्रस्थापितांत समाविष्ट होण्यातच धन्यता मानतात व तेवढे झाले की क्रियाशून्य किंबहुना प्रतिगामी होतात ही अधिक चिंतेची बाब आहे. सुसंघटित डावे आंदोलन सतत क्रियाशील असते तर हे घडले नसते आणि अशा मुख्य जोमदार प्रवाहाच्या अभावामुळे छोट्या छोट्या अलग अलग कार्यक्षेत्रांत फुटकळपणे काम करून ज्या ध्येयवादी युवकांची धडपड आज वाया जाते व अंतिम वैफल्याच्या भावनेला कारणीभूत होते तिलाही क्रांतीच्या सागराकडील मार्गक्रमणाचा दिलासा मिळाला असता. आज जी विरोधी राजकीय पक्षांची एकजूट बांधण्याचा आपण प्रयत्न करतो, त्यापेक्षा ही एकजूट कितीतरी अधिक एकसंध व प्रभावी राहू शकली असती.

### सुदृढ आशावाद

ही मांडणी चूक असेल तर चर्चा होऊ शकते. बरोबर असली तरी निराश होण्याचे कारण नाही. लोकमान्यांच्या 'पुनश्च हरि ॐ' चे स्मरण पुरेसे प्रेरणादायी, स्फुरणदायी ठरावे.

युनोचे सेक्रेटरी जनरल डाग हॅमरशील्ड एकदा म्हणाले होते :

'जग अखंड प्रगतीच्याच दिशेने जाणार आहे असा एकोणिसाव्या शतकातील आशावादासारखा माझा भोळाभाबडा आशावाद नाही. मानवतेच्या कल्याणासाठी निःस्वार्थी वृत्तीने धडपडणाऱ्या युवकांची वाण कोणत्याच पिढीत पडलेली नाही, या ऐतिहासिक अनुभवावर माझा आशावाद भरभक्कमपणे उभा आहे.'

असा आशावाद कधी पराभूत होत नाही. कधी वैफल्यग्रस्तही होऊ शकत नाही. जोपर्यंत दलित-शोषित आहेत तोपर्यंत कधी कमी तर कधी तीव्र अशा गतीने समाजवादाचे आपले ध्येयाकडील मार्गक्रमण म्हणूनच अटळपणे चालूच राहणार आहे.

समाजवादाच्या लढाईला पराभव नाही तो या अर्थाने.



एस्० एम्० जोशी स्मृतिदिन : १ एप्रिल २००७

## समाजवादी शील आणि विश्वस्तवृत्ती

कृतिचर्चासत्र वृत्तांत

पूर्वी प्रकट केल्याप्रमाणे हे चर्चासत्र दि. १ एप्रिल रोजी साधना सभागृहात संपन्न झाले. प्रा. ग. प्र. प्रधान पूर्णवेळ उपस्थित होते आणि त्यांचा प्रत्यक्ष उत्कट सहभाग अर्थातच महत्त्वाचा होता. प्रा. देवदत्त दाभोलकर यांनी सूत्रसंचालन केले. समाजवादी सर्वोदयी विधायक वृत्तीची वीसपंचवीस मंडळी उपस्थित होती. मुंबईहून आवर्जून काजरोळकर पतिपत्नी उपस्थित होते. वि. श्री. दामले, प्र. द. पुराणिक, जे.बी. पाटील, जयवंत मठकर, आप्पासाहेब सा. रे. पाटील, किशोर पवार, वर्षा गुप्ते, विजया चौहान, नरेंद्र दाभोलकर, रा. ग. जाधव, लीला दिक्षीत, ना. द. शिरोळकर आदि उपस्थित होते.

प्रधान सर विश्वस्त वृत्तीची संकल्पना अर्थातच सर्व उपस्थितांना मान्य होती. ती केवळ समाजवादी शील असणाऱ्या लोकांनाच लागू पडते असे नाही. किंबहुना तुम्ही कोणत्याही विचारसरणीचे असा, खरा प्रश्न आपण सत्ता, संपत्ती, प्रतिष्ठा अशी कशाचीही अपेक्षा न ठेवता आपल्याला संमत असलेल्या समाजहिताच्या कार्यक्रमासाठी आपला स्वतःचा किती वेळ, किती शारीरिक, बौद्धिक क्षमता आणि चांगल्या मार्गाने मिळवलेले धन सहजपणे देण्यात आनंद मानतो हा आहे हेही सर्वमान्य होते.

प्रत्यक्षात असे अनेकविध किंबहुना असंख्य कार्यक्रम असू शकतील व आहेतही. चर्चासत्र अशा कार्यक्रमांच्या तपशीलवार चर्चेत अडकले नाही.








स्वतःच्या व आपल्या निकटच्या आप्तजनांच्याखेरीज एकूण समाजाविषयी आपले व्यक्तिगत काही कर्तव्य आहे ही भावना विकसित झालेला मानव हा एकमेव प्राणी आहे. मानव संस्कृतीच्या विकासाच्या आदिकालापासून विश्वस्त कल्पना त्यामुळे वेगवेगळ्या नावांनी का होईना पण विकसित होत आलेली आहे. 'मा गृधः कस्यस्वित् धनम्।' या ईशावास्य उपनिषदातील आदेशात ती आहे. 'कोणाच्याही धनाची गिधाडासारखी हाव ठेवू नकोस.' असे हे वचन सांगते. आद्य शंकराचार्यांनी आपल्या टीकेत कास्यचित् (कोणाच्याही) या शब्दाचा अधिक खुलासा केला आहे. (कास्य। परस्य स्वस्यवा।) कोणाच्याही म्हणजे कोणाच्या? दुसऱ्यांच्या धनाविषयी तर नकोच परंतु स्वतःच्या धनाविषयी देखील आसक्ती, हाव ठेवू नकोस. हीच कल्पना अन्य धर्मातही वेगवेगळ्या स्वरूपात आलेली आहे. आपल्या संपत्तीचा चाळीसावा भाग (अडीच टक्के) दान करा असे इस्लाम सांगतो. ख्रिश्चन धर्माचाही charity चा आग्रह आहे.

या ठिकाणी 'हाव' कशाला म्हणावे हा प्रश्न निर्माण होतो. ही चर्चा आपल्याला चंगळवादाकडे घेऊन जाते. चंगळवादाविषयीची आपली मते दुसऱ्यावर लादण्याचा प्रयत्न करू नये. त्यातून केवळ निष्फळ वादावादी व कटुता निर्माण होते. चंगळवादाची आपण मानत असलेली सीमारेषा अधिक कसोशीने आत्मनिरीक्षण करून बदलणे अधिक उचित होईल. तुमच्या साधेपणात (किंबहुना साधेपणामुळेच) तुम्ही खरे समाधानी आहात हे इतरांच्या न सांगता प्रत्ययास आले तरच इतरांच्यावर त्यांनाही नकळत जो परिणाम होईल तोच खरा.

विश्वस्त कल्पनेची तात्त्विक चर्चाही गेल्या शतकात अधिक सूक्ष्मपणे झालेली आहे. गांधीजी, विनोबा यांच्या मांडणीचे या कल्पनेच्या विकासात योगदान राहिले आहे. गांधीजी साम्यवादात म्हणत, 'तुमचा समतेवर विश्वास आहे मग अडचण कुठे आहे? स्वतःपासून प्रारंभ करा.' विनोबा म्हणत, 'माझ्याकडे जे आहे त्यातले माझे स्वतःचे किती व इतरांचे किती असा विचार जेव्हा मी करतो तेव्हा 'न इदम् मम।' (हे माझे नाही) अशी वेगळी भावना ठेवण्याचे मला कारणच उरत नाही.

हे सर्वार्थाने खरे आहे. अगदी आपल्या बुद्धीविषयी देखील. मी बुद्धिमान आहे यात व्यक्तिगत गौरव मानण्याचे काय कारण आहे? आणि तिच्या जोरावर इतरांचे शोषण करणे हा आपला जन्मसिद्ध हक्क आहे असे कसे मानता येईल? आपल्या बुद्धीसह सर्व क्षमता या अविश्वस्त (किंवा ईश्वराला मानावयाचे नसेल तर निसर्गदत्त) आहेत. माझ्या गुणसूत्रांपैकी (genes) एकही मी तयार केलेले नाही. माझ्या पूर्वजांनीही निर्माण केलेले नाही. निसर्गाच्या विकासक्रमात सहस्रावधी वर्षे, असंख्य पिढ्यांतून, अनेक आघात आपघातातून, विकसित होत आकस्मिकपणे माझ्यात अवतरल्या आहेत. इतकेच याचा आनंद अवश्य मानावा. परंतु अभिमान बाळगण्याचे कारण नाही आणि त्या जोरावर अरेरावी, शोषण करण्याचा तर नाहीच नाही.'

हे चर्चासत्र कृतिचर्चासत्र होते. अशी बहुतेक चर्चासत्रे चर्चेत हिरीरीने चालतात व कृतीचा भाग आला की आवाज मंद मंद होत जातात असा सार्वत्रिक अनुभव आहे. हे चर्चासत्र याला अपवाद ठरले असे म्हणणे अतिशयोक्तीचे होईल. परंतु तरी काही कल्पना आकाराला आल्या.

१. अशा वृत्तीच्या लोकांनी आपल्या मिळकतीचा किमान पाच टक्के भाग या वृत्तीने आपल्या जीवनकालात वापरावा व तसा वापरला जाण्याची तरतूद आपल्या मृत्युपत्रात करून ठेवावी.

२. हे मृत्युपत्र समवृत्तीच्या लोकांना दाखविण्याची व्यवस्थाही मृत्युपत्रात असावी.

३. अशा वृत्तीच्या लोकांचे (मग ते कोणत्याही राजकीय, अध्यात्मिक विचारसरणीचे असोत) या वृत्तीपुरते एक स्नेहमंडळ असावे.

४. या स्नेहमंडळाची (सोयीसाठी प्रधान सर स्नेहमंडळ असा निर्देश करावा.) वर्षातून किमान एक बैठक व्हावी. पुढील वर्षी ही बैठक एस.एम. जोशी स्मृतिदिनी १ एप्रिल रोजी सकाळी ९.०० ते ११.०० साधना सभागृहात होईल हेही या बैठकीत निश्चित करण्यात आले.

५. मध्यंतरीच्या काळात ज्यांना याविषयी संपर्क साधावयाचा असेल, अधिक चर्चा करावयाची असेल त्यांनी आपला पोस्टाचा पत्ता, टेलिफोन संपर्क क्रमांक प्रा. देवदत्त दाभोलकर यांना कळवावा.

☑ ☑ ☑

**या चर्चासत्रासाठी पुढील बैठकीचा दिवस : एस० एम० जोशी स्मृतिदिन, १ एप्रिल २००८, साधना सभागृह, पुणे, सकाळी ९.०० ते ११.००.**




# उदारमतवाद

## समाजवाद की स्वप्नरंजन

सुभाष आठले

मोठ्या अपेक्षेने साधनेचे दोन्ही विशेषांक वाचले. पण निराशा झाली. ना लोकशाहीविषयी काही नवीन, किंवा जुन्याची नवीन तपासणी करणारे वाचायला मिळाले, ना समाजवादाविषयी. लेखकांनी लिहिताना काही पथ्ये वा शिस्त पाळली असती तर असे झाले नसते. ती पथ्ये अशी :-

१) समाजवादाची प्रमाण व्याख्या नाही. त्यामुळे प्रत्येकाने लेखाच्या सुरुवातीलाच समाजवादाची आपली व्याख्या काय आहे, समाजवाद म्हणजे आपल्याला काय नक्की अभिप्रेत आहे, हे स्पष्ट करावे.

२) समाजवादाच्या उद्दिष्टांबद्दल फार लिहू नये. त्या उद्दिष्टांकडे जाणाऱ्या मार्गाबद्दल (म्हणजेच समाजवादाबद्दल) लिहावे. मानवी भवितव्याच्या, चिरंतन अस्तित्वाच्या आड न येता सध्याच्या मानवाची सुखप्राप्ती हेच सर्व वादांचे उद्दिष्ट असते व त्यासाठी न्याय, व्यक्तिस्वातंत्र्य, शांतता, बंधुता, सुरक्षितता, अन्न, वस्त्र, निवारा, शिक्षण यांची सार्वत्रिक उपलब्धता व समता हीच सर्व वादांची उपउद्दिष्टे असतात.

३) समाजवाद्यांसाठी लिहू नये - समाजवादी नसलेल्यांचे, भांडवलशाहीवाद्यांचे मतपरिवर्तन (कन्व्हर्शन) करण्याच्या जिद्दीने लिहावे. त्यासाठी शब्दांचा नेमकेपणा, विधानांची तर्कशुद्धता व त्यामागील पुराव्याचा भक्कमपणा इतका असावा की वाचणाऱ्याला आपले मत बदलणे भाग पडावे.

४) समाजवाद ही जिवंत विकसनशील विचारसरणी आहे, अनुभवांपासून शिकण्याची, चुकीची प्रमेये टाकण्याची, नवी तर्कशुद्ध प्रमेये स्वीकारण्याची तयारी, नवीन विचार, नवीन पुरावे अस्पृश्य नाहीत, याचा पुरावा लिखाणातून दिसला पाहिजे.

५) शोषण, शोषणाचे व विषमतेचे निर्मूलन, कामगारवर्गाची एकाधिकारशाही, उत्पादनाची साधने, उत्पादनाचे वितरण, भांडवल आणि मालमत्ता यावर समाजाची मालकी / नियंत्रण या संकल्पना समाजवादात महत्त्वाच्या दिसतात. आपल्याला अभिप्रेत अशा समाजवादाच्या छटेमध्ये या संकल्पनांना मूळ मार्क्स प्रणीत संकल्पनांपेक्षा काही वेगळा अर्थ किंवा वेगळा पर्याय असल्यास ते नेमक्या शब्दात स्पष्ट केले पाहिजे.

६) लोकशाही मान्य असल्यास, समाजवादी अर्थव्यवस्था आणण्यासाठी घटनेत व कायद्यात बदल करावा लागेल. नेमकेपणा येण्यासाठी, समाजवाद आणू पाहणाऱ्या व्यक्तीने किंवा पक्षाने आपण कोणते घटनाबदल करू इच्छितो, कोणते नवे कायदे आणू इच्छितो व कोणते जुने कायदे रद्द करू इच्छितो, ते लिहावे. या बदलांचे कोणते बरे-वाईट परिणाम होतील, फायदे - तोटे काय संभवतात याबद्दलही लिहावे. इच्छित बदलांमुळे फक्त फायदेच होतील अशी भूमिका सहसा घेऊ नये. कारण ते शक्य नाही.

७) पर्यावरण वाद, चंगळवादाला विरोध, पर्यायी विकास, विकेंद्रीकरण, माहितीचा अधिकार, चिरंतन राहणी (सस्टेनेबल लिव्हींग), देशी अर्थशास्त्र, सेंद्रीय शेती, कीटकनाशकांना विरोध, मोठ्या धरणांना विरोध, अहिंसा, मागासलेल्यांसाठी आरक्षण, जातीयतेला विरोध, धरणग्रस्त व इतर अन्यायपीडित लोकसमूहांच्या न्याय मिळवण्यासाठी चाललेल्या चळवळी या व इतर अनेक गोष्टी या स्वतंत्र व स्वयंभू आहेत, स्वायत्त आहेत. कोणत्याही अर्थवादात त्या सामावल्या जाऊ शकतात. या गोष्टी समाजवादी तत्त्वज्ञानाचा एक भाग म्हणून मांडता कामा नये. पण या व अशा अनेक गोष्टींसाठी चळवळी उभ्या राहण्यासाठी लोकशाही आवश्यक असते, कामगार वर्गाची किंवा समाजवादी पक्षाची एकाधिकारशाही या गोष्टींसाठी मारक ठरते. हे लक्षात ठेवावे.

आता प्रत्येक लेखकाच्या लेखनाकडे थोडे वळू. मूळ लेखकाची अवतरणे तिरप्या टाइपमध्ये दिली आहेत.

**राम बापट**

आदरणीय राम बापट वैचारिक निबंध लिहीत आहेत की ललित साहित्य?










*"समाजवाद हा एकाच वेळी एक दृष्टी आहे, मत आहे, तत्त्व आहे, मूल्य आहे, साध्य आहे आणि साधनप्रक्रिया, व्यवहार, राजकारण, समाजकारण व अर्थकारण आहे. माणुसकीच्या संस्कृतीचा आणि सभ्यतेचा सामूहिक व वैयक्तिक जीवनाला एकरूप करणारा घाट आहे.*

*समंजस आत्मविश्वासाने पाहिले तर ऐतिहासिक दृष्टी व अनुभव असेच सांगतो की, मानव जातीच्या संदर्भात आदर्श - निष्ठा आणि वास्तववाद किंवा इष्टता आणि शक्यता किंवा निर्गुण आणि सगुण किंवा शास्त्र आणि प्रयोग यांच्यातील नाते परस्परांना छेदणारे किंवा अवसानघातकी द्वैताचे नसून सर्जनशील द्वंद्वाचे आहे. यामुळेच ज्ञानदेवांची पसायदानाची मागणी दिवास्वप्न ठरत नाही, आणि याकरताच धर्म, अर्थ, काम एका ठायी मेळवण्याच्या जिद्दीतून तुकाराम महाराजांनी धर्मठकांविरुद्ध बंड उभारुन त्यांना कोरडे मारत मारत 'जेथे नाही लोकां परश्रम' अशा मोक्षाचे स्वप्न आपल्या हातात आशीर्वादपूर्वक दिले.*

*दिवास्वप्नात मश्गुल न होता, गूढ गुंजनाचे अवडंबर न माजविता, सद्‌भावाचे अधिष्ठान लाभलेल्या काटेकोर, व्यक्तिनिरपेक्ष, बुद्धीच्या एकमेव मार्गाने अशक्यप्राय वाटणाऱ्या गोष्टी स्थलकालांचे भान सांभाळीत दैनंदिन व्यवहारात आणणे हाच मानवी विकासक्रमाचा गाभा आजवर राहिलेला आहे. म्हणून समाजवादाचा संकल्प आज जरी अशक्यप्राय भासला तरी तो शास्त्रकाट्याच्या कसोटीवर उतरत असल्याने मृगजळासारखा न राहाता आव्हानात्मक पुरुषार्थच ठरतो."*

या वाक्यांचे अर्थ मला तरी समजले नाहीत व इतर अनेकांना ही वाक्ये वाचून दाखवल्यावर त्यांना (त्यांच्यामध्ये प्राध्यापक, डॉक्टर, वकील, व्यापारी असे सर्वजण होते) काहीही बोध झाला नाही. सर्वच लेख अशा वाक्यांनी भरलेला आहे.

*"मानवी समाजाला निरामय जीवन लाभण्यासाठी फक्त समाजवादी निदान व उपाययोजनाच लागू पडेल."*

कशावरून? या विधानाला आधार काय? इतिहासात असे कधी घडले होते काय? श्री. बापट यांना तसा व्यक्तिगत अनुभव आहे काय? नसेल तर ते हे भविष्य कोणत्या ख़ास 'सिद्धीने' वर्तवत आहेत? का हा निव्वळ आशाळभूतपणा आहे? की आपल्या विचारसरणीची पोकळ टिमकी आहे? वैचारिक निबंधात पुराव्यासहित विधाने करायला नको का?

*औपचारिक नव्हे, तर परस्परविश्वासावर आधारलेली लोकशाही म्हणूनच समाजवादी धारणेच्या व उपाययोजनांच्या संदर्भात प्राणवायूइतकी सदैव सर्वत्र आवश्यक ठरते.*

परस्पर विश्वासावर आधारलेले राजकारण! (लोकशाही)? श्री. बापट कलियुगात वावरत आहेत की सत्ययुगात! देश - काल - लोक व्यवहार यांचे संदर्भ सुटणे, भान न राहाणे योग्य नाही. परस्पर विश्वासावर आधारलेली लोकशाही जर समाजवादाला प्राणवायूइतकी सदैव सर्वत्र आवश्यक असेल, तर त्या समाजवादाचे मृत - जनन (Still Birth) होणार याची शंका नको! इतका नाजूक समाजवाद वास्तवात उपयोगाचा नाही.

*"लोकशाही राबवण्याकरता आज सार्वत्रिक, प्रौढ, दरडोई एकमतवादी, खुली व स्पर्धात्मक मतदानपद्धती वापरली जाते. आजवर उपलब्ध असलेल्या व सुचविल्या गेलेल्या पर्यायी मतदानपद्धतींच्या तुलनेत हीच पद्धत कमीत कमी सदोष आहे. तिला अजूनही योग्य, व्यवहार्य, सुकर असा हुकमी पर्याय उपलब्ध झालेली नाही."*

पुन्हा या विधानाला पुरावा काय? अमेरिका, जर्मनी, वगैरे अनेक देशांत लोकशाहीचेच पर्यायी प्रकार प्रत्यक्षात वापरात आहेत. या सर्व प्रकारांचा व भारतीय प्रकारांचा तुलनात्मक अभ्यास करून, त्यांचे फायदे, तोटे, धोके यांचे विवेचन करून मगच हे विधान करता येईल. त्याशिवाय नाही. अशा तुलनात्मक अभ्यासांचीच वर्षारंभ विशेषांकाच्या लेखकांकडून अपेक्षा होती . पण ती पूर्ण झाली नाही!

*पहिले पथ्य म्हणजे प्रतिष्ठा, ज्ञान, संपत्ती व विशेषत: उत्पादनाची साधने आणि सांस्कृतिक संपदा यांची जन्मजात व धर्मसंमत मक्तेदारी ज्यांना लाभली आहे, त्यांच्या विरोधातील सर्व समूह व स्तर यांच्या आकांक्षा मुखर करून त्यांना संघटित करून राजकारणातील आपली उपक्रमशीलता व पुढाकार कधीही न सोडणे.*

विरोध मक्तेदारीला आहे की विशिष्ट व्यक्ती समूहांना? वंचित व ओबीसीमधील 'क्रिमीलेयर' च्यां संदर्भात या विचारामध्ये अधिक स्पष्टपणा अपेक्षित आहे. शिवाय या विरोधाचे पर्यवसान प्रतिष्ठा, ज्ञान, संपत्ती, उत्पादन साधने व सांस्कृतिक संपदा यांच्याच विरोधात होण्याचा धोका संभवतो की नाही?

*त्याचप्रमाणे भांडवलशाहीच्या आजच्या सुगीच्या युगात खाजगी उद्योगधंद्यांच्या क्षेत्रात राखीव जागांच्या*

*जोडीला किंबहुना त्याहूनही अधिक भर देऊन वर्चस्ववादी वर्तुळाबाहेरील सामाजिक स्तरास्तरांतून नवा उद्योजक, व्यवस्थापक व व्यापारी प्राविण्य गट कसा निर्माण होईल याचा शोध व त्याचा अंमल समाजवादी ऊर्जा वाढविण्याकरता करावाच लागेल.*

निम्नतर समाज - स्तरांतून नवे उद्योजक, व्यवस्थापक व व्यापारी गट निर्माण झाले तर त्याने समाजवादाला ऊर्जा मिळेल का भांडवलशाहीची ताकद वाढेल अशी शंका मनात येत नाही काय?

*तरीही अनेक पिढ्यांच्या सखोल चिंतनातून व चिकित्सेतून हाती आलेल्या सर्वपरिचित कारणांकरता भांडवलशाहीच्या हकालपट्टीखेरीज नाना तऱ्हेचे शोषण, वंचना, भेदभाव व विषमता दूर होणार नाही हे सत्य झाकले जाऊ शकत नाही.*

सखोल चिंतनाची व चिकित्सेची तर उणीव दिसते. श्री. बापट यांनी अशा सखोल चिंतनाचे व चिकित्सेचे दाखले व संदर्भ देऊनच असे विधान करावे. सर्वपरिचित कारणे कोणती? श्री. बापट यांना माहीत असतील - आम्हाला नाहीत. ती सर्वपरिचित कारणे श्री. बापट यांनी लेखात द्यावयास हवी होती. की बनचुक्या समाजवाद्यांसाठीच हे लेख, हा अंक आहे? आणि हे विधान सत्य कधी झाले? कोणत्या देशात भांडवलशाहीच्या हकालपट्टीनंतर शोषण, वंचना, भेदभाव व विषमता दूर झाली? कोणतीही मानवनिर्मित अर्थरचना, समाजरचना परिपूर्ण दोषरहित, आदर्श (आयडियल) असू शकत नाही. समाजवाद आला तर भांडवलशाहीतीलच काही उणिवा कमी अधिक प्रमाणात पुढे चालू राहतील व काही नवीनच दोष, उणिवा निर्माण होतील ही शक्यता तरी लक्षात घेणार की नाही? अशा उणिवांचा भविष्यवेध (Prediction) घ्यायला हवा की नाही?

*तंत्रविज्ञान हे मूलत: तटस्थ असते की त्याचे स्वत:चे असे एक अटळ गतिशास्त्र असते हा प्रश्न जरी संयुक्तिक असला तरी त्याला निर्गुण/निराकार आध्यात्मिक शोधाचे रूप न देता समाजवादी राजकीय/आर्थिक भूमिका निश्चित झाली तर समाजवादी राजकारण, अर्थकारण व समाजरचना शक्यतेच्या कोटीत आहे एवढेच नव्हे तर आजच्या गुंतागुंतीच्या काळातील एकमेव व्यवहार्य मार्ग आहे असेच दिसून येईल.*

या वाक्यातील प्रांजळपणाबद्दल श्री. बापट यांचे आभार. अगदी वास्तवास धरून विधान दिसते की, समाजवादाची आर्थिक/राजकीय भूमिका निश्चित झाली नाही. त्यामुळे सध्या समाजवादी राजकारण, अर्थकारण व समाजरचना शक्यतेच्या कोटीत नाहीत व आजच्या गुंतागुंतीच्या काळात तो एक व्यवहार्य मार्ग नाही!

*आजवरची ऐतिहासिक वाटचाल लक्षात घेतली तर तात्कालिक व दूरगामी अशा दोन्ही धोरणांच्याबाबत जागतिकीकरण, उदारीकरण व खाजगीकरण यांच्या आजच्या महापुराच्या काळात उत्पादनसाधनांवर मालकी वा संपूर्ण नियंत्रण प्रस्थापित करणे हा आजच्या समाजवादाचा निकडीचा कार्यक्रम बनू शकत नाही.*

या विधानाचा अर्थ असा होतो की उत्पादन साधनांवर मालकी वा संपूर्ण नियंत्रण हे समाजवादाचे उद्दिष्ट आहेच, पण प्रॅक्टिकल अडचणींमुळे त्याला अग्रक्रम न देता, ती मालकी कालानुक्रमे दोन नंबरवर ढकलली आहे. तसे स्पष्ट लिहिले तर बरे होईल. वाचकांना विधानांचा अर्थ शोधण्यासाठी धडपड करावी लागू नये. पारदर्शक विचार - लेखन, धोरण - लेखन असेल तर ते धोरण मान्य असणाऱ्यांना समाजवादी होण्याचा विचार करता येईल, नसणाऱ्यांना समाजवादाला विरोध करण्याचे ठरवता येईल.

**श्री. पन्नालाल सुराणा**

*"स्वातंत्र्य व समता एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत."*

हे विधान चूक आहे. समता ही लादावीच लागते. आर्थिक समता लादण्याचा प्रयत्न करणारी अर्थव्यवस्था म्हणजे समाजवाद अशी (माझी) सोपी सुटसुटीत व्याख्या आहे.

*"उत्पादन - साधनांवर / आर्थिक व्यवहारावर जे वर्चस्व मिळवतात ते समाजाचे सर्व व्यवहार आपल्या फायद्यासाठी चालावेत असा प्रयत्न करतात."*

हे अत्यंत महत्त्वाचे सत्य - वास्तव श्री. सुराणांनी दाखवून दिले आहे. त्यामध्ये त्यांनी समाजवादी / साम्यवादी अर्थव्यवस्थांनी नेमलेले अर्थ - व्यवस्थापक, कारखाना, उद्योग, व्यापार संस्था यांचे चालक यांचा अपवाद केलेला नाही, हेही योग्यच आहे. या मालकांवर / वर्चस्व मिळवणाऱ्यांवर राज्य शासनाचा योग्य अंकुश राहाणे कोणत्याही अर्थवादात आवश्यक आहे. पण हे मालक / नियंत्रक शासनाचाच भाग असले, तर हे नियंत्रण अशक्यप्राय होते. म्हणूनच खाजगी वा

सहकारी मालकी आवश्यक आहे. सरकारी मालकी नको. म्हणूनच सरकारी उद्योग - व्यवसायांचे सध्या चालू असलेले खाजगीकरण स्वागतार्ह आहे. श्री. सुराणा यांच्या विधानाचे हे तर्काधिष्ठित विस्तारीकरण (लॉजिकल एक्स्टेन्शन) त्यांना मान्य आहे का? नसल्यास का नाही?

*"नागरिकांच्या उत्पन्नात १:१० पेक्षा अधिक फरक असू नये."*

कल्पना मान्य. पण अधिक तपशील हवा. उत्पन्न मोजणार कसे, कोण, केव्हा? सध्याच आयकर खात्याला वार्षिक रु. दहा लाखपेक्षा जास्त उत्पन्न ज्यांचे आहे अशा लोकांनाही शोधून काढणे कठीण जाते. किती लोकांवर छापे घालणार! कितीजणांचे हिशेब तपासणार? त्यासाठी वेगळे गुप्तहेर खाते नेमणार काय? त्यांचे अधिकार काय असतील, त्याचे दुरुपयोग काय होतील? तळातल्या व्यक्तीचे उत्पन्न १ वरुन २ वर नेण्यासाठी जास्त प्रयत्न करावे, का वरच्या गटातील व्यक्तीचे उत्पन्न २० वरुन १० करण्याचा प्रयत्न करावा? २० उत्पन्न मिळवणाऱ्या व्यक्तीवर कमी काम करण्याची सक्ती करावी का त्याच्यावर कर बसवून १० च्या वरती सर्व रक्कम कर म्हणून वसूल करावी? या सर्व खटाटोपाचा उद्योजकतेवर, संपत्ती निर्माण होण्यावर काय परिणाम होईल? उच्च गटाच्या उत्पन्नावर मर्यादा घालण्यामुळे तळातल्या व्यक्तीचे उत्पन्न वाढवण्यासाठीच्या प्रयत्नांना फायदा होईल की तोटा? वार्षिक एक लाखापेक्षा जास्त उत्पन्नांवर पूर्वी ९७ १/२ % कर होता. त्याचे काय परिणाम झाले? या सर्व व उद्भवणाऱ्या अनेक प्रश्नांना उत्तरे देण्याची जबाबदारी श्री. सुराणा यांनी उचलली पाहिजे, त्यासाठी त्यांना अधिक अभ्यास, अधिक संशोधन करावे लागेल, एक लेख लिहिण्याऐवजी जाडजूड ग्रंथ लिहावा लागला तरी हरकत नाही. अन्यथा पेन उचलून एक वाक्य लिहिणे सोपे आहेच.

तीच गोष्ट शेअरबाजार बंद करण्याची. समाजवादी शासनालाही आर्थिक शिस्त पाळावीच लागते. अर्थशास्त्राचे नियम भांडवलशाही व समाजवादाकरता वेगवेगळे असत नाहीत. नवीन उद्योग उभारण्यासाठी, चिरंतन विकासाच्या योजना राबविण्यासाठी, पायाभूत उद्योगासाठी - भांडवल हे लागणारच. हे भांडवल शासन नोटा छापून निर्माण करणार का कर बसवून? समाजातील व्यक्तींचे भांडवल वापरणार का नाही? त्या व्यक्तींनी ते भांडवल विकण्यासाठी शेअर बाजार नसेल तर का गुंतवावे? का देणगी म्हणून द्यावे?

*"गुंतवणूकविषयक निर्णय समाजाला जबाबदार असणाऱ्या यंत्रणांमार्फत केले जावेत!"*

या यंत्रणा कोठून आणणार? या यंत्रणा म्हणजे शासन, मंत्रिमंडळ, नोकरशाही, का लोकसभा? युनिट ट्रस्ट, वेगवेगळ्या राष्ट्रीयीकरण झालेल्या बँका, सहकारी बँका, राज्य शासने - या सर्व जबाबदार यंत्रणाच नव्हत्या काय? त्यांनी गुंतवणुकीचे निर्णय चांगले घेतले काय?

माझ्या मते बाजार यंत्रणा हाच उत्तम नियंत्रक आहे. शेअर बाजारात सुधारणा नक्कीच हव्या आहेत, पण शेअर बाजारच बंद करणे अशक्य आहे.

### गोविंदराव पानसरे

गोविंदराव यांनी अशी समजूत करुन घेतलेली दिसते की ज्या समाजात विषमता आहे, तेथे खरी लोकशाही शक्य नाही. तसे काही नाही. आदर्श समता, पूर्ण समता या गोष्टी लोकशाहीसाठी आवश्यक नाहीत. अपरिपूर्ण, असम अशा मानव समाजासाठीच लोकशाही आहे. अशी लोकशाही देखील अपूर्ण असणार हे उघड आहे. पण ती सुधारण्याचा व त्यासाठी विषमता कमी करण्याचा प्रयत्न चालू ठेवता येईल, त्याबद्दल निराश होण्याचे कारण नाही. गरिबांना लोकशाहीत प्रत्यक्ष निवडून येता आले नाही तरी निवडून येणाऱ्या नेत्यावर दबाव नक्कीच टाकता येतो. किंबहुना गरिबांचा प्रभाव फक्त लोकशाहीतच पडतो! आदर्श लोकशाही व आदर्श समता या गोष्टी कायम पुस्तकातच राहाणार. समाजवादातही कामगार नेते, पक्षनेते, अधिकारशहा यांच्याच हातात सत्ता राहणार व त्यामुळे विषमता येणारच. समाजवादात लोकशाही नसेल तर ही विषमता पराकोटीला पोचून असह्य होईल, पण त्यावेळी गरिबांच्या मदतीला विरोधी पक्ष, निवडणुका, न्यायालये, चळवळे लोक, स्वयंसेवी संघटना असणार नाहीत. या गरिबांना मदत करणाऱ्या संस्था फक्त लोकशाहीतच नांदू शकतात.

नववसाहत म्हणजे आंतरराष्ट्रीय व्यापाराचे, कर्जव्यवहाराचे व भांडवल पुरवठ्याचे नियम, किंवा जागतिकीकरण, किंवा (W.T.O.) जागतिक व्यापार संघटना, असे गोविंदराव पानसरे यांना म्हणावयाचे आहे असे दिसते. या नियमांमुळे आपल्या राज्यशासनाची स्वायत्तता नष्ट होते असे श्री. पानसरेंचा दावा आहे.

एखादे राष्ट्र स्वयंपूर्ण असेल, त्याला आयात - निर्यात

व्यापार करावयाचा नसेल, कर्ज व भांडवल घ्यायचे किंवा द्यायचे नसेल, तर ते या तथाकथित 'नववसाहतवादा' पासून पूर्ण मुक्त राहू शकेल. पण तुम्हाला व्यापार करायचा असेल, कर्ज वा भांडवल पाहिजे असेल, तर हे नियम पाळावेच लागतील, मग ते राष्ट्र समाजवादी आहे का हुकूमशाही आहे का लोकशाहीवादी आहे याने काही फरक पडत नाही. कम्युनिस्ट चीनला किंवा हुकूमशाही पाकिस्तानलाही तेच नियम लागू होतात. पूर्वी निव्वळ बळी तो कान पिळी अशी अवस्था होती. त्यात सुधारणा करण्याचा, थोडे आंतरराष्ट्रीय नियमन आणण्याचा हा चांगला प्रयत्न आहे. अजूनही बलवान राष्ट्रे आपल्या फायद्याचे नियम करण्याचा, नियमांची अंमलबजावणी आपल्या दिशेने वाकवण्याचा प्रयत्न करतात. पण आपले नेतृत्त्व विकले जाणारे व अडाणी नसेल याची आपण काळजी घेतल्यास त्याला तोंड देता येते. पूर्ण अव्यवस्थेपेक्षा अपूर्ण व्यवस्था अधिक चांगली व त्यात सुधारणा शक्य आहे. आपले आर्थिक व्यवहार जागतिक संस्था चालवतात हे सत्य नाही. कर्ज देणारी संस्था कर्ज कसे फिटेल याची काळजी घेणारच, मदत देणारी संघटना मदत नीट वापरली जाते की नाही हे पाहाणारच. ते नको असेल तर कर्ज व मदत घेऊ नका!

मार्क्सवादाची फेरतपासणी हा या वर्षारंभ अंकाचा विषय नव्हता. पण समाजवादी लोकशाही म्हणजेच मार्क्सवाद असे श्री. पानसरे यांना म्हणावयाचे आहे काय? नसल्यास आणखी एक लेख लिहून त्यांनी समाजवादी लोकशाहीची संकल्पना स्पष्ट करावी.

**श्री. सुहास पळशीकर**

कल्याणकारी धोरणे राबविण्यासाठी आर्थिक सुबत्ता व आर्थिक शिस्त लागते. पैशाचे सोंग फार काळ आणता येत नाही हे पटल्यामुळेच, भारतीय राज्यकर्त्यांनी कल्याणकारी धोरणांपासून नाईलाजाने माघार ती देखील - हाफ हार्टेडली - घेतली आहे. नाहीतर निवडून येण्यासाठी तसेच अवैध संपत्ती मिळवण्यासाठी देखील कल्याणकारी धोरणांची आवश्यकता असते. कल्याणकारी राज्याचा विस्तार होण्याने भांडवलशाहीची कोंडी होते हे खरे नाही. विविध कारणांनी समाजातील व्यक्तींना येणारी गरिबी व अन्य अपंगता यांची धार कमी करून त्या सुसह्य बनवण्यासाठी भांडवलशाहीने स्वीकारलेला तो योग्य प्रामाणिक मार्ग आहे. बेकार भत्ता, वृद्धांना निर्वाह भत्ता, अपंगांना भत्ता व त्यांच्यासाठी वाहतूक, इमारती, स्वच्छतागृहे, पार्किंग लॉटस् यांच्यामध्ये खास सोयी निर्माण करणे, समाजातील निम्नतर गटांसाठी आरक्षण व शिक्षणासाठी खास सोयी, गर्भवती महिलांसाठी जास्त सोयी व रजा, भत्ते, आरोग्य विमा योजना वगैरे अनेक कल्याणकारी धोरणे भांडवलशाही देशात राबवली जातात - प्रामाणिकपणे, कार्यक्षमतेने राबवली जातात. नुसतीच आर्थिक क्षमता असेल तर ही धोरणे राबवता येतात असे नाही. त्यासाठी सर्वसाधारण जनतेची नैतिक पातळी पुरेशी उंच असावी लागते. भारतात कल्याणकारी धोरणे राबवता येणे अशक्य किंवा अवघड असण्याचे एक महत्त्वाचे कारण म्हणजे सर्वसाधारण जनतेची नैतिक पातळी खालावलेली आहे.

शिक्षण संस्था, बस - सेवा, रुग्णालये यांच्या खाजगीकरणाला विरोध करताना खाजगीकरणाचा जनतेला मिळणाऱ्या शिक्षणावर, वाहतूक सेवेवर व वैद्यकीय सेवेवर काय परिणाम होतो व पर्यायी शासकीय सेवा, आर्थिकदृष्ट्या परवडते का? अधिक चांगली सेवा कमी एकूण खर्चात देऊ शकते का? हाच निकष ठेवला पाहिजे. खाजगीकरण व क्रयवस्तुकरण भांडवलशाहीला धष्टपुष्ट बनवते हा काही निकष होऊ शकत नाही. एखादी चांगली गोष्ट भांडवलशाहीला धष्टपुष्ट बनवते का समाजवादाला, याच्याशी समाजवादी सोडून इतरांना काहीच देणे - घेणे नाही. शासकीय रुग्णसेवा दडवलेल्या किंमती लक्षात घेता महागच पडते, स्वस्त नाही.

**श्री. बाबा आढाव**

*"लोकशाही समाजवाद ही आमजी जीवननिष्ठा आहे, तत्त्वज्ञान आहे, आमची प्रेरणा आहे."*

असे श्री. आढाव म्हणतात. मग बोलणेच खुंटले. देवभोळेपणा प्रमाणे हा लोकशाही - समाजवाद - भोळेपणा झाला. लोकशाही - समाजवाद हा काही ठराविक उद्दिष्टांकडे जाण्याचा मार्ग आहे व तो त्या उद्दिष्टांकडे जात नाही असे दिसल्यास किंवा दुसरा अधिक जवळचा मार्ग सापडल्यास, अधिक सोपा मार्ग सापडल्यास, आम्ही लोकशाही समाजवाद फेकून देऊ असे म्हणणाऱ्यांशीच चर्चा होऊ शकते. दुसऱ्याचे मत - परिवर्तन करू इच्छिणाऱ्यांनी स्वत:चे मत - परिवर्तन होण्यासाठीही खुले मन ठेवले पाहिजे.

जगाच्या विकासाची दिशा समतेची आहे हेही खरे नाही. आदिवासी - वनवासी जमातींमध्ये (Hunter - Gatherers) सर्वात जास्त समता होती व अजून आहे. मानवी

समाजाचा जसा विकास होईल तशी विषमता वाढतानाच दिसते. समता आणण्यासाठी, विषमतेची धार कमी करण्यासाठी, खास प्रयत्न करावे लागतात. भांडवलशाहीलाही हे प्रयत्न करावेच लागतात.

श्री. आढाव व इतर अनेक लेखकांनी लोकशाही - समाजवाद हे शब्द सयामी जुळ्याप्रमाणे एकच संकल्पना म्हणून वापरले आहेत. ते चुकीचे आहे. लोकशाही व समाजवाद स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाच्या गोष्टी आहेत, त्यांची क्षेत्रेही राजकारण व अर्थकारण अशी वेगवेगळी आहेत व त्यांचे एकमेकांवर कधी मैत्रीचे, कधी वैराचे व कधी उदासीनतेचे परिणाम होतील, याची दखल श्री. खांदेवाले, श्री. पानसरे या दोनच लेखकांनी घेतलेली दिसते. त्यांचे आभार.

**श्री. ग. प्र. प्रधान**

'काम मिळणे' हा मूलभूत हक्क असावा असे श्री. प्रधान यांचे मत दिसते. जगातील कोणतीही अर्थव्यवस्था प्रत्येक नागरिकाला काम पुरवू शकत नाही व उत्पादकाला त्याने तयार केलेला सर्व माल किंवा पिकवलेली सर्व पिके किफायतशीर किंमतीला विकली जातील अशी हमी देऊ शकत नाही हे कटु आर्थिक वास्तव सर्व समाजवाद्यांनी समजून घ्यावे.

पण पुरेशी आर्थिक शिस्त व सामाजिक नीतिमत्ता असेल, तर बेकार - भत्ता मिळण्याचा मात्र मूलभूत हक्क करता येतो व त्या दिशेने वाटचाल केली पाहिजे, तरच अटळ अशा यंत्रयुगाचे व संगणक युगाचे वाईट परिणाम सौम्य करता येतील, पुन्हा हातमाग - चरख्याकडे जाणे हा त्यावरील उपाय होऊ शकत नाही.

**श्री. श्रीनिवास खांदेवाले**

श्री. खांदेवालेंनी लोकशाही व समाजवाद यामधील द्वैताची दखल घेतली आहे. फक्त त्यांच्यामते भांडवलशाहीने (अर्थवादाने) लोकशाहीवर मात केली आहे. त्यांच्या उलट निष्कर्षाप्रत मी आलो आहे की सध्याच्या लोकशाहीच्या ढाच्यामुळे, सत्तेवर राहाण्यासाठी, लोकांना, मतपेट्यांना खूश राखण्यासाठी, म्हणजेच राजकीय अपरिहार्यतेमुळे (Compulsions) राज्यकर्त्यांना चुकीचे आर्थिक निर्णय घ्यावे लागत आहेत म्हणजे राजकारण अर्थकारणावर मात करत आहे!

श्री. खांदेवालेंनी असेही विधान केले आहे की मतपेटीचा भ्रष्टाचार करून बाजार व्यवस्था दिवसेंदिवस पुष्ट होत आहे. हे वाक्य बरोबर वाटत नाही. भ्रष्टाचार ही कोणत्याही व्यवस्थेमधील विकृती आहे. बाजारव्यवस्थेची किंवा भांडवलशाहीची ती प्रकृती नाही. भ्रष्टाचारामुळे भांडवलशाहीचे किंवा बाजारव्यवस्थेचेही नुकसानच होते. शिवाय भांडवलशाहीत भ्रष्टाचार जास्त होतो, समाजवादात कमी होतो, असे विधान करणे चूक, असत्य होईल. टंचाई व नियंत्रणे या दोन गोष्टी भ्रष्टाचारास उत्तेजन देतात व समाजवादात (समाजवादामुळे) टंचाई व नियंत्रण जास्त प्रमाणात आढळतात, म्हणून भ्रष्टाचार देखील वाढण्यास योग्य वातावरण मिळते. नियंत्रणे नसल्यास खुली बाजारपेठ व खुले उत्पादनाचे निर्णय असतात. टंचाई निर्माण झाल्यास भाववाढ होते. भाववाढीने उत्पादन वाढते, आयात होते व टंचाई दूर होते. पण भ्रष्टाचार होत नाही. भाव पडल्यास उत्पादन कमी होते, निर्यात होते व पुन्हा भाव वाढतात. खुली बाजारपेठ स्वयं - संतुलित असते व उत्पादन व मागणी यांचे संतुलन (फाइन ट्युनिंग) ती करते. (त्यामुळेच श्री. ग. प्र. प्रधानांनी देशांतर्गत शिथिलीकरणाविरुद्ध लढा चालवण्याचा पुरस्कार करावा याचे आश्चर्य वाटते!)

**श्री. गजानन खातू**

हे दोन्ही वर्षारंभ विशेषांक वाचून समाजवादी विचारवंतांच्या बद्दल जी निराशा मनात दाटून आली ती श्री. गजानन खातू यांच्या वर्षारंभ प्रकाशनाच्या वेळी केलेल्या भाषणाचा वृत्तांत वाचून दूर झाली. लोकशाही व समाजवाद यांच्यामधील अंतर्विरोधाची त्यांना जाण आहे. समतेसाठी नियंत्रणे किती व लोकशाही स्वातंत्र्य किती याचा निर्णय करणे कठीण आहे, ही अडचण त्यांनी नमूद केली आहे. अर्थशास्त्राच्या मूलभूत नियमांचे त्यांना भान आहे. वाढावा, गुंतवणूक, प्रेरणेसाठी आवश्यक असलेली विषमता यांचे समाजवादातही अस्तित्त्व नाकारता येणार नाही, हा व्यवहार ते जाणतात. वाढावा म्हणजे शोषण नव्हे असे ते स्पष्टपणे म्हणत नाहीत एवढेच! तसेच पर्यावरण रक्षण, चिरंजीवी विकास वगैरे गोष्टी म्हणजे समाजवादाचा भाग नाही - कोणत्याही अर्थव्यवस्थेपुढची ती आव्हाने आहेत हेही ते ओळखून आहेत. लोकशाही समाजवादाला लवचिकतेची आवश्यकता आहे असे ते म्हणतात - पण लवचिकतेसाठी खुलेपणा, शिथिलीकरण व चांगली बाजारपेठ यांची आवश्यकता त्यांना

वाटत नाही काय?

त्यांनी प्रतिपादिलेल्या स्थानिक उत्पादन (व अर्थात् वितरण) व्यवस्था, उच्च तंत्रज्ञानाला वस्तू उत्पादनामध्ये विरोध, जैविक तंत्रज्ञानाला शेतीमध्ये विरोध, या गोष्टी मी समजू शकतो. पण त्यापुढील अडचणींची दखल श्री. खातू यांनी घेतली नाही. आपला देश वाहतूक व उर्जा यांच्यासाठी आयात तेल व गॅस यांच्यावर फार मोठ्या प्रमाणावर अवलंबून आहे व परदेशी कर्जही आपल्याला बरेच परत करायचे आहे. या दोन गोष्टींसाठी निर्यात मोठ्या प्रमाणावर वाढवणे आवश्यक आहे. वस्तूंची निर्यात वाढवायची असल्यास १) उच्च तंत्रज्ञान आवश्यक आहे. २) कामगार कायदे सौम्य करावे लागणार. ३) उत्पादन- वितरण यांच्यावरील स्थानिकतेचा आग्रह सोडावा लागणार. शेतमालाची निर्यात वाढवायची असेल तर १) जैविक तंत्रज्ञान स्वीकारावे लागाणार २) शेतीमालाच्या किंमती कृत्रिमरीत्या कमी ठेवण्याचा किंवा वाढवण्याचा विचार सोडावा लागणार ३) शेतमालाच्या उत्पादन, वाहतूक विक्री यांच्यावरील बंधने काढून टाकून सर्व देशाची एकच बाजारपेठ होण्यासाठी प्रयत्न करावे लागतील - म्हणजे पुन्हा स्थानिकतेचा आग्रह सोडावा लागणार. ४) W.T.O. ला पाठिंबा द्यावा लागणार.

आजपर्यंतच्या समाजवादाचा एकूण रोख उत्पादकांच्या (शेतकऱ्यांच्या व कारखानदारांच्या) विरोधात कामकरी व शेतमजूर यांच्या बाजूने राहिला आहे. परिणामी उत्पादनाच्याच विरोधात हा रोख राहिला. यापुढे उत्पादकाला - शेतकऱ्याला व कारखानदारांना मदत करावी लागेल - त्याचा कामकऱ्यांना व शेतमजुरांना आपोआप फायदा मिळेल. किमान वेतन कायदा व मजुरांना काढून टाकण्यावरील बंधने यामुळेच उच्च तंत्रज्ञानाला उत्तेजन मिळाले. श्रमप्रधान तंत्रज्ञान टिकले नाही किंवा निर्माण झाले नाही, रोजगार निर्मितीला प्रतिबंध झाला. नोकरीतील प्रमाणाबाहेरील सुरक्षिततेमुळे उत्पादकता कमी झाली, श्रम - संस्कृतीला उत्तेजन मिळाले नाही.

शेतमाल निर्यात करावयाचा असेल तर विकसित देशातील शेतमालाची सबसिडी कमी किंवा बंद व्हायला हवी. जागतिक व्यापार संघटना हा त्या दिशेने जाणारा मार्ग आहे. मार्ग अडचणीचा आहे, पण आहे. त्या संघटनेच्या विरूद्ध झगडण्याचे, ती नाकारण्याचे कारण नाही, ती सुधारून आपल्या फायद्यासाठी राबवली पाहिजे. सहकारी संस्था या अंतर्गत खऱ्या लोकशाहीच्या अभावाने, सभासदांना नीतीची चाड नसणे, विरोध करण्याचे धैर्य नसणे, जुलूम - अन्याय सहन करण्याची 'सहनशीलता' असणे अशा विविध कारणांनी, संस्थेच्या संचालकांची खासगी कुरणे बनल्या आहेत. सहकाराला खास सवलती देण्यामुळे त्या स्पर्धाशील राहत नाहीत. त्यांच्यातील दुर्गुण वाढतात. सहकार समाजाला उपयोगी असला तर खाजगी संस्थांना टक्कर देऊन उभा राहील, नाहीतर संपेल. त्याला खास संरक्षण नको. समाजवादामध्ये सरकारी व खाजगी संस्था यांना समान वागणूक दिली तरच सहकारी संस्थांची निकोप वाढ होईल. सहकारी चळवळीच्या अर्थरचनेत प्रमुख भूमिका घ्यावयाची नसून, तिने ती मिळवली पाहिजे व त्यासाठी सामान्य जनतेच्या नीतिमत्तेत व धीटपणात वाढ आवश्यक आहे.

श्री. गजानन खातू यांनी याबद्दल एक 'सदर'च साधनेत चालू ठेवावे ही विनंती.

श्री. बाबूराव मुळिक यांनी १९ ऑक्टोबर २००२ च्या 'साधना'मध्ये उपस्थित केलेले मुद्दे पुढील प्रमाणे आहेत.

१) आजवर कामगार कायद्यांमुळे कामगारांना मिळालेले फाजील संरक्षण व त्यामुळे त्यांनी गमावलेली उत्पादकता व कार्यक्षमता व कमावलेला बेफिकीरपणा.

२) पाचव्या वेतन आयोगाचे परिणाम.

३) कोणत्याही सरकारी, निमसरकारी उद्योगात नोकरांवरील खर्च ४०% पेक्षा जास्त होऊ नये यासाठी घटना दुरूस्ती.

४) उत्पादनाची साधने समाजाच्या मालकीची हवी या तत्त्वाला मुरड घालण्याची आवश्यकता.

५) लघुउद्योग व कामगार कायदे.

६) समान कामास समान वेतन हे तत्त्व स्वीकारणे व त्यानुसार विमा कंपन्या, बँका, कॉलेजेस यातील वेतन श्रेणी बदलणे.

७) उदारीकरण, जागतिकीकरण, खाजगीकरण स्वीकारणे.

८) वीज वाटपाचे खाजगीकरण.

९) वाहतूक सेवेचे खाजगीकरण व अर्थात निर्नियंत्रण.

१०) जागतिक व्यापार संघटना, जागतिक बँक व इंटरनॅशनल नाणेनिधी यांचा फायदा घेणे. योग्य ठिकाणी परकीय भांडवल स्वीकारणे.








११) शेअर बाजार स्वीकारणे - पण त्यात सुधारणा करणे.

१२) संरक्षण व्यवस्था व रेल्वे यांचे काम लघुउद्योगांना मिळावे यासाठी टेंडर पद्धतीत सुधारणा करणे.

श्री. मुळिक यांनी आपल्या चतुरस्र अनुभवावर आधारित असे महत्त्वाचे मुद्दे मांडले आहेत. त्यांच्यावर सेवादलाचे व समाजवाद्यांचे संस्कार झालेले आहेत.

खाजगी व सरकारी नोकरीचा त्यांना अनुभव आहे व गेली तीस वर्षे त्यांनी लघुउद्योग यशस्वीरीत्या चालविले आहेत. त्यामुळे त्यांच्या मतांना आरामखुर्चीतील विचारवंतांच्या मतापेक्षा, अनुभवशून्य सिद्धांतवाद्यांच्या भाषणापेक्षा व धंदेवाईक राजकारणी व कामगार नेत्यांच्या लेखांपेक्षा जास्त महत्त्व द्यायला पाहिजे होते. पण दुर्दैवाने साधनेतील त्यांच्या लेखावर पुरोगामी विचारवंतांनी पूर्ण बहिष्कार टाकला - ना सहमत दाखवले, ना त्यांचे म्हणणे योग्य पुराव्याने व युक्तिवादाने खोडून काढले. श्री. मुळिक यांच्या लेखाला उत्तर देणे पुरोगामी विचारवंतांना एवढे अडचणीचे का वाटते? आयुष्यभर जपलेली चूकीची, हटवादी मते सोडणे नामुष्कीचे वाटते काय? तुमचे म्हणणे बरोबर आहे. आमच्याही काही चूका झाल्या, गैरसमज झाले, पण अनुभवाने आम्ही आमचे मत बदलले आहे, अशी कबुली द्यायलाही मोठे मन लागते व वैचारिक प्रामाणिकपणा लागतो. या गोष्टी पुरोगामी विचारवंतांजवळ नसल्याने त्यांनी या महत्त्वाच्या लेखास अनुल्लेखाची केराची टोपली दाखविली.

☑☑☑

## २१ व्या शतकासाठी उदारमतवादी कार्यक्रम

[ब्रिटनमधील ऑक्सफर्ड येथे २७-३० नोव्हेंबर १९९७ या काळातील आंतरराष्ट्रीय उदारमतवादी परिषदेच्या ४८ व्या अधिवेशनात स्वीकारण्यात आलेला उदारमतवादी जाहीरनामा.]

पन्नास वर्षांपूर्वी उदारमतवादी जाहीरनामा प्रसिद्ध करणाऱ्या आंतरराष्ट्रीय परिषदेच्या संस्थापकांकडून प्रेरणा मिळालेले पंचखंडातून आलेले एकूण ४७५ उदारमतवादी नव्या सहस्रकाच्या उंबरठ्यावरील आव्हाने आणि संधी यांना उदारमतवाद कसा प्रतिसाद देणार याचा विचार करण्यासाठी २७ ते ३० नोव्हेंबर १९९७ या काळात ऑक्सफर्ड येथे जमले होते.

गेल्या ५० वर्षात राजकीय आणि आर्थिक स्वातंत्र्यावर आधारित मुक्त समाजांची स्थापना करण्याच्या कामी भरीव प्रगती झाली आहे. परंतु अद्याप पुष्कळच मार्गक्रमणा करायची आहे. नव्या संधी आणि धोक्यांना तोंड देण्यासाठी नव्या पिढ्यांना आपले अग्रक्रम निश्चित करावे लागतील.

उदारमतवादापुढे अद्याप पुष्कळ आव्हाने आहेत उदा. मानवी अधिकारांचा भंग; सत्ता आणि संपत्तीचे अतिरिक्त केंद्रीकरण; मूलतत्त्ववादी, एकाधिकारशाही, परद्वेषी आणि वंशद्वेषी तत्त्वप्रणाली; लिंग, धर्म, वय आणि अक्षमतेच्या कारणांसाठी भेदभाव, दारिद्र्य आणि अज्ञान; श्रीमंत आणि गरिबांमधील वाढत जाणारी दरी; नव्या तंत्रज्ञानाचा गैरवापर; कमजोर होत जाणारी सामाजिक बंधने; स्पर्धा आणि तुटपुंजी साधनसामग्री; बेसुमार गर्दीच्या जगात पर्यावरणाचा ऱ्हास; संघटित गुन्हेगारी आणि राजकीय भ्रष्टाचार इत्यादी आव्हानांना व्यक्तिस्वातंत्र्य आणि मानवी अधिकार, मुक्त समाज आणि मुक्त अर्थव्यवस्था व जागतिक सहकार्य यांची वाढ करणारे राजकीय प्रतिसाद शोधण्याची अवघड जबाबदारी २१ व्या शतकातील उदारमतवादी या नात्याने आपल्या सर्वांवर आहे.

### आपली उदारमतवादी मूल्ये

एप्रिल १९४७ च्या आंतरराष्ट्रीय उदारमतवादी जाहीरनाम्यातील पुढील तत्त्वांना असलेल्या आमच्या बांधिलकीचा आम्ही पुनरुच्चार करतो - स्वातंत्र्य आणि वैयक्तिक जबाबदारी हा सुधारलेल्या समाजाचा पाया आहे; राज्य हे नागरिकांच्या सेवेचे साधन आहे; राज्याच्या कोणत्याही कृतीत लोकशाहीच्या उत्तरदायित्वाच्या तत्त्वाचा आदर दिसला पाहिजे; घटनात्मक स्वातंत्र्य हे सत्ताविभाजनाच्या तत्त्वावर आधारलेले आहे; सर्व फौजदारी खटल्यांमध्ये न्यायाच्या दृष्टीने गुन्हेगाराला दाव्याच्या तत्पर आणि सार्वजनिक सुनावणीचा आणि राजकीय प्रभावापासून मुक्त अशा रास्त निकालाचा अधिकार मिळाला पाहिजे. अर्थव्यवस्थेतील राज्याचे नियंत्रण आणि खाजगी क्षेत्रातील मक्तेदारी दोन्हीही राजकीय स्वातंत्र्य धोक्यात आणतात; अधिकार आणि कर्तव्ये एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत आणि प्रत्येक नागरिक इतर

नागरिकांना नैतिकदृष्ट्या जबाबदार आहे; आणि या तत्त्वांबद्दल आदर बाळगून लोकशाही समाजामधील सहकार्याच्या पायावरच शांततामय जगाची उभारणी करता येईल. ही सर्व तत्त्वे सर्वांसाठी योग्य आहेत हे आम्ही पुन्हा एकदा ठासून सांगतो.

स्वातंत्र्य जबाबदारी, सहिष्णुता, सामाजिक न्याय आणि संधीची समानता ही उदारमतवादी प्रमुख मूल्ये आहेत. या तत्त्वांवरच मुक्त समाज उभारता येईल. मात्र या तत्त्वांसाठी सुधारलेले समाज, लोकशाही शासन, मुक्त बाजारपेठा आणि आंतरराष्ट्रीय सहकार्य यांच्यात व्यवस्थित समतोल साधला पाहिजे.

कायद्याचे राज्य, संपूर्ण आणि नाना प्रकारच्या शिक्षणाची समान संधी, भाषण, संघटन आणि माहिती मिळवण्याचे स्वातंत्र्य, स्त्रीपुरुषांना समान अधिकार आणि संधी, विविधतेबद्दल सहिष्णुता, खाजगी उपक्रमांना उत्तेजन आणि रोजगाराच्या संधी या सर्वांचा वैयक्तिक स्वातंत्र्याच्या अटींमध्ये समावेश होतो असा आमचा विश्वास आहे. नागरी समाज आणि घटनात्मक लोकशाही, राजकीय अर्थव्यवस्थेला जास्तीतजास्त न्याय आणि स्थिर आधार देतात यावर आमची श्रद्धा आहे. प्रस्थापित कायद्याच्या चौकटीत जीनव जगणारे स्वतंत्र्य नागरिक, वैयक्तिक अधिकारांची हमी, लोकशाही उत्तरदायित्व मानणारे आणि मर्यादित सत्ता असलेले शासन या सर्वांचा नागरी समाजात समावेश होतो. मुक्त बाजारपेठा नियमांवर आधारलेल्या अर्थकारणामुळे संपत्ती आणि साधनसामुग्रीचे जास्तीतजास्त कार्यक्षमपणे वाटप होते. नूतनीकरणास उत्तेजन मिळते आणि लवचिक व्यवहारास चालना मिळते यावर आमचा विश्वास आहे.

आम्हाला असे मनापासून वाटते की आंतरराष्ट्रीय कायद्याच्या चौकटीत जागतिक आणि प्रादेशिक संघटनांमार्फत साध्य झालेले लोकशाही समाजांमधील निकटचे सहकार्य; मानवी, राष्ट्रीय आणि वांशिक अल्पसंख्यांकांच्या अधिकाराबद्दल आदर आणि जगात सर्वत्र आर्थिक विकासासाठी वचनबद्धता या गोष्टी जागतिक शांतता आणि आर्थिक आणि पर्यावरणाच्या रक्षणासाठी आवश्यक आहेत.

**उदारमतवादाची बाटचाल - १९४७-९७**

गेल्या ५० वर्षात उदारमतवादी तत्त्वे अमलात आणण्याच्या कामात अनेक देशात जी प्रगती झाली आहे तिचे आम्ही स्वागत करतो.

- युरोपमधील पूर्वीच्या साम्यवादी देशात स्वातंत्र्य आणि लोकशाहीचे पुनरागमन
- लोकशाही शासनाचा आणि कायद्याच्या राज्याचा प्रसार
- वसाहतवादाचा अंत आणि पूर्वी पारतंत्र्यात असलेल्या लोकांना स्वयंशासनाची संधी
- राष्ट्रीय अर्थव्यवस्था अधिक कार्यक्षमतेने संपत्ती निर्माण करते व तिचे विस्तृतपणे वाटप करते याचा सार्वत्रिक स्वीकार
- अल्पसंख्यांकांचा विशेषाधिकार असलेल्या शिक्षणाचे वाढत्या प्रमाणातील नागरिकांसाठीच्या जीवन-भरच्या प्रक्रियेत रुपांतर.
- राज्यांतर्गत आणि आंतरराष्ट्रीय देखरेख व आवश्यकता असल्यास हस्तक्षेपाचा एक विषय म्हणून मानवी अधिकारांबद्दल वाढता आदर
- स्त्रिया आणि मुले यांच्या मानवी अधिकाराबद्दल वाढती राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय जाणीव
- लैंगिक अल्पसंख्यांकांपर्यंत समतेच्या नियमांचा विस्तार आणि पुरुष व स्त्रियांमधील समलिंगी संभोगाला एका वैयक्तिक नैसर्गिक प्रवृत्तीचा रास्त आविष्कार म्हणून मान्यता देणे.
- सर्वमान्य आंतरराष्ट्रीय अर्थव्यवस्था बळकट करणे.
- आंतरराष्ट्रीय कायद्याला आणि जागतिक प्रादेशिक संस्थांना समर्थ बनविणे
- राष्ट्रात आणि राष्ट्राच्या सरहद्दींच्या बाहेर माहिती, संपर्क व्यवस्था आणि प्रवास याबाबतीत अधिक स्वातंत्र्य देणे
- जगातील गरिबीचे निवारण आणि वैश्विक पर्यावरणाचे रक्षण हे जागतिक समाजाचे समान कर्तव्य आहे हे मान्य करणे.

**आपल्या पिढीसमोरील आव्हान**

वर नमूद केलेले यश मानव जातीच्या अल्पसंख्य गटापुरते मर्यादित आहे याची आम्हाला जाणीव आहे. जगभर उदामतवादी तत्त्वांचा प्रसार करणे आणि परिवर्तनाच्या शक्तींचा वापर मुक्त समाजाच्या विकासाचा पाया उखडण्यासाठी नव्हे तर बळकट करण्यासाठी करायचा आहे या आव्हानांना आम्हाला पुढील ५० वर्षात तोंड द्यायचे आहे. आमच्यापुढे खालील आव्हाने आहेत.

**१. लोकशाही वाढीचे आव्हान**

राजकीय संघटनेसाठी एक जागतिक नमुना म्हणून उदारमतवादी लोकशाहीचा मोठ्या प्रमाणावर स्वीकार

करण्यात आला आहे. परंतु अद्याप केवळ थोड्या राज्यांनीच योग्य प्रकारच्या लोकशाहीचा स्वीकार केला आहे. एकाधिकारशाही राजवटी, सत्ता बळकावणाऱ्या लष्करशाह्या, पक्षीय उद्दिष्टांसाठी राज्यसत्तेचा गैरवापर, शासनावर प्रभाव पाडणारे गुन्हेगार, जनतेच्या आशा आणि चिंतांचा गैरफायदा घेणारे सत्तालोभी हे सर्व स्वातंत्र्याच्या मार्गातील अडथळे आहेत. म्हणून आम्ही सर्व शासनांना आणि लोकांना आवाहन करतो की -

- मानवी अधिकारांचे आणि लोकशाहीचे पालन करणाऱ्या शासनांना आंतरराष्ट्रीय संबंधात झुकते माप द्यावे.
- सर्व जगभर मृत्यूदंडाची शिक्षा रद्द करावी.
- कायद्याचे राज्य बळकट करावे आणि खऱ्याखुऱ्या लोकशाही चौकटीतील चांगल्या कारभाराला पाठिंबा द्यावा.
- सार्वजनिक पैसा लष्करी खर्चापेक्षा सामाजिक भांडवल, मूलभूत गरजांची पूर्तता आणि गरिबीच्या उच्चाटणासाठी गुंतवावा.
- शस्त्रांच्या विक्रीवर मर्यादा घालावी, बिगर-लोकशाही राजवटींना शस्त्र विकण्यास प्रतिबंध करावा आणि संयुक्त राष्ट्रांजवळील पारंपरिक शस्त्रांच्या साठ्यात परिणामकारक वाढ करावी.
- शासनाच्या किंवा प्रभावशाली उद्योग समूहांच्या अयोग्य नियंत्रण आणि हस्तक्षेपापासून प्रसारमाध्यमांना मुक्त ठेवावे. भ्रष्टाचार संघटित गुन्हेगारी आणि दहशतवादाशी मुकाबला करावा.
- सुधारलेल्या समाजाच्या अस्तित्वासाठी सहिष्णुता किती महत्त्वाची आहे हे शिक्षणाच्या माध्यमातून सांगावे.

### २. हिंसा आणि जगाच्या नियंत्रणाचे आव्हान

हिंसक संघर्षाने भरलेल्या या जगात हिंसा टाळण्याची प्रभावी साधने शोधणे हे अतिशय महत्त्वाचे आणि जिकीरीचे काम आहे. सध्याच्या अधिकाधिक परस्परावलंबी जगाला एका सुरक्षित, भक्कम आणि न्याय्य जागतिक व्यवस्थेच्या निर्मितीसाठी उच्च दर्जाच्या आंतरराष्ट्रीय सहकार्याची गरज आहे. राष्ट्रांतर्गत गुन्हे. असाध्य रोग, हवेतील प्रदूषण आणि हवामानातील बदलाचा धोका ही आंतरराष्ट्रीय सहकारा समोरील आणखी काही आव्हाने आहेत. संयुक्त राष्ट्रे आणि प्रादेशिक सहकार्याच्या माध्यमातून जगाचे नियंत्रण करण्यास उदारमतवादी वचनबद्ध आहेत. जगातील सर्व शासनांना आम्ही विनंती करतो की त्यांना युद्ध गुन्हेगारांवर अधिकारक्षेत्र असणाऱ्या आंतरराष्ट्रीय फौजदारी न्यायालयाच्या स्थापनेसाठी पुढाकार घ्यावा. कायद्याच्या राज्यावर सुरक्षितपणे उभारलेले आणि सुयोग्य अशा जागतिक आणि प्रादेशिक संस्थांचा पाठिंबा मिळविणारे उदारमतवादी जग निर्माण करणे हे एकविसाव्या शतकातील आमचे ध्येय आहे.

### ३. लोकशाही सुधारण्याचे आव्हान

सुशिक्षित समाजांच्या अपेक्षांची पूर्तता करण्यासाठी आणि प्रातिनिधीक शासनांमुळे झालेल्या भ्रमनिरासाचा निषेध नोंदविण्यासाठी लोकशाही व्यवहारांचा विस्तार झाला पाहिजे याची आम्हाला जाणीव आहे. नागरिकांना माहिती मिळविण्याचा, आपल्या शासनाला प्रश्न विचारण्याचा आणि कार्यकारी सत्तेवर प्रभावी संसदीय नियंत्रण ठेवण्याचा अधिक चांगला अधिकार मिळाला पाहिजे. प्रत्येक नागरिकाला सत्तेत वाटा मिळावा म्हणून स्वयंशासित समाजात राजकीय सत्तेचे विकेंद्रीकरण हाच सर्वश्रेष्ठ उपाय आहे.

### ४. स्वयंशासन आणि मानवी अधिकार यांच्यामधील तणाव

स्वयंशासनाचा आणि विशेषतः राज्याच्या सार्वभौम सत्तेचा वैयक्तिक स्वातंत्र्य आणि मानवी अधिकारांशी संघर्ष होऊ शकतो. एकाधिकारशाही राजवटी सार्वभौमत्वाच्या तत्त्वाचा दुरुपयोग करुन स्वातंत्र्य नाकारलेल्या व्यक्तींना पाठिंबा देण्याचे मार्ग बंद करतात. अविभाज्य आणि वैश्विक मानवी अधिकार एखाद्या विशिष्ट राज्याच्या नागरिकत्वावर किंवा एखाद्या विशिष्ट वांशिक, सामाजिक, लैंगिक, धार्मिक गटाच्या किंवा राजकीय पक्षाच्या सभासदत्वावर अवलंबून नाहीत असे उदारमतवाद्यांना ठामपणे वाटते. एका मुक्त आंतरराष्ट्रीय समाजाच्या तत्त्वांचे पालन करण्यास नकार देणाऱ्या शासनाविरुद्ध आंतरराष्ट्रीय समाजाने पुरेशा दंडात्मक कारवाईचा शोध घेतला पाहिजे.

### ५. दारिद्र्य आणि सामाजिक उपेक्षा

दारिद्र्य, बेकारी आणि सामाजिक उपेक्षा पुरुषांच्या आणि विशेषतः स्त्रिया मुले आणि वृद्धांच्या जीवनाचा नाश करतात आणि नागरी समाजापुढे मोठा धोका निर्माण करतात. गरिबीतून निराशा आणि निराशेतून जहालमतवाद, असहिष्णुता आणि आक्रमकतेचा जन्म होतो. गरिबीतून वर येण्यासाठी गरिबीशी संघर्ष करण्याची साधने लोकांना कशी मिळवून द्यायची हा गरिबी दूर करण्याच्या मार्गातील मुख्य

अनुक्रमणिका

प्रश्न आहे. सार्वजनिक आणि खाजगी उपक्रमामधील भागीदारीवर आधारलेल्या, शिक्षण आणि रोजगारीच्या संधी निर्माण करणाऱ्या आणि जे स्वत: परावलंबी आहेत त्यांना सहाय्य करणाऱ्या सक्रीय धोरणाची आम्ही मागणी करतो. वैयक्तिक जबाबदारीत वाढ करण्याचे आणि वैयक्तिक परिस्थितीला प्रतिसाद देण्याचे उद्दिष्ट असलेल्या सार्वजनिक संस्था आणि कल्याणकारी व्यवस्था शक्य तेवढ्या लवचिक आणि स्थानिक प्रशासनाच्या ताब्यात असल्या पाहिजेत.

### ६. दुर्बल शासनाचे आव्हान

लोकांना सुखी करणे हे शासनाचे काम आहे ही पूर्वापार चालत आलेली भ्रामक कल्पना जगभर कोसळण्याच्या मार्गावर नसली तरी अडचणीत आली आहे. पुष्कळशा औद्योगिक देशात अतिशयोक्त व चुकीचे लक्ष्य असलेल्या सामाजिक सुरक्षिततेच्या आणि संपत्तीच्या फेरवाटपाच्या योजना नष्ट होण्याचा धोका आहे आणि राज्याची अंदाजपत्रके पुढील पिढ्यांवर सतत वाढणाऱ्या कर्जाचा बोजा लादत आहेत. तर विकसनशील देशात खाजगी उपक्रम या खऱ्याखुऱ्या आणि सातत्याने विकास करणाऱ्या एकमेव घटकाची गळचेपी करून शासनावर अतिरिक्त भार टाकणारे आणि मुख्यत: शासकीय कृतीतून साध्य होणारे विकासाचे प्रयत्न निष्फळ ठरणार आहेत. उदारमतवाद्यांच्या मते शासनाची कुवत मर्यादित आहे; बलिष्ठ शासन आणि राज्याच्या खर्चातील वाढ दोन्हीही मुक्त समाजाला गंभीर धोका निर्माण करतात. म्हणून शासनाचे कार्यक्षेत्र मर्यादित करण्यास आणि शासकीय खर्चात कपात करण्यास अग्रक्रम दिला पाहिजे.

### ७. पिढ्यामधील नव्या कराराची आवश्यकता

आम्ही हे जाणतो की मागणी आणि उपभोग यांच्यामधील दबावातून निर्माण होणारे तणाव आणि समाजाच्या आणि पर्यावरणाच्या ज्या दीर्घकालीन हितसंबंधांविषयी समाजाचा एक विश्वस्त या नात्याने शासनाला काळजी वाटते ते हितसंबंधच नष्ट करतात. दोन पिढ्यांमधील अशा नव्या कराराचा आम्ही शोध घेत आहोत की ज्यामुळे सध्याच्या उपभोक्त्यांना आणि नागरिकांना पूर्वीच्या गुंतवणूकीतून मिळालेल्या फायद्याची जाणीव आहे आणि पुढील पिढ्यांसाठी नैसर्गिक पर्यावरण, सांस्कृतिक ठेवी, सार्वजनिक मालमत्ता आणि सामाजिक भांडवल राखून ठेवण्याची जबाबदारी स्वीकारण्याची तयारी आहे.

### ८. वैज्ञानिक आणि तांत्रिक प्रगतीचे आव्हान

नवीन तंत्रज्ञान आणि शास्त्रशुद्ध नूतनीकरणामुळे उपलब्ध होणाऱ्या आर्थिक आणि सामाजिक संधींचे आम्ही स्वागत करतो. तथापि त्यांच्या संभाव्य परिणामांची आणि गैरवापराची सार्वजनिक तपासणी करण्याची आणि त्याचे राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय नियमन होण्याची गरज आहे. मानवी उद्योगाच्या सर्व क्षेत्रात सावधगिरीचे तत्त्व हे व्यवस्थापनाचे तत्त्व बनले पाहिजे. मानव जातीच्या नजीकच्या भविष्यकाळात तोंड द्यावे लागणाऱ्या हवेतील बदलापासूनच्या धोक्याविषयीसुद्धा हे खरे आहे. खनिज इंधनाच्या वापरामध्ये भरीव कपात करण्यासाठी एका सर्वांना बंधनकारक कराराची आणि वेळापत्रकाची तातडीची गरज आहे. पर्यावरण व्यवस्थेची पुनरुत्पादन शक्ती नष्ट होणार नाही या मर्यादेतच उपभोग झाला पाहिजे. सर्व रसायने आणि औद्योगिक उत्पादनांचा व्यापारी उपयोग करण्यापूर्वी काळजीपूर्व चाचणी झाली पाहिजे. सर्जनशीलता, विकेंद्रीकरण, वैयक्तिक स्वायत्तता व उपक्रम यांच्या वाढीसाठी नवीन संधी उपलब्ध करणाऱ्या दळणवळणाच्या क्रांतीचे आम्ही स्वागत करतो. मुक्त बाजारपेठेतील स्पर्धेतून मिळणाऱ्या दळणवळणाच्या विविध वाहिन्यांचा उदारमतवाद्यांनी आग्रह धरला पाहिजे. उत्पादक, उपभोक्ते आणि सार्वजनिक हितसंबंध जोपासणारी मंडळे यांच्यासाठी माहितीचे जाळे आणि दळणवळणाच्या संरचना मोठ्या प्रमाणावर उपलब्ध झाले पाहिजे.

### ९. मुक्त बाजारपेठांच्या निर्मितीचे आव्हान

मुक्त समाजाला खुल्या बाजारपेठा हव्यात. उदारमतवादी मुक्त आणि सहिष्णू समाजाला बाजारपेठेच्या अर्थव्यवस्थेची गरज आहे. राजकीय स्वातंत्र्य आणि आर्थिक स्वातंत्र्य अविभाज्य आहेत. कल्पना आणि नव्या उपक्रमांची बाजारपेठ आणि उत्कृष्ठ साध्यासाठी स्पर्धा यामुळे बाजारपेठीय अर्थव्यवस्था चैतन्यमय प्रगती आणि स्वावलंबी जीवनाची उत्कृष्ट संधी निर्माण करते. मुक्त बाजारपेठ ही खाजगी मालमत्तेच्या तत्त्वावर आणि मक्तेदारी प्रतिबंधक कायद्याच्या चौकटीवर आधारलेली आहे. त्यामुळे ती खाजगी उपक्रमांसाठी आणि समाजाच्या सहाय्यासाठी आर्थिक साधने निर्माण करते. बाजारपेठीय अर्थकारणाचे नोकरशाहीने केलेले नियम आणि संरक्षित व्यापाराचे तत्त्व हे विकसनशील आणि औद्योगिक देशातही नव्या संधी आणि रोजगारांच्या निर्मितीच्या मार्गात अडथळे असतात. पर्यावरण आणि








सामाजिक हित यासाठी श्रमिकांवरील कर योजनेपेक्षा शक्तीच्या आणि कच्च्या मालाच्या उपभोगावरील करावर जास्त भर दिला पाहिजे. असा बदल केला नाही तर पर्यावरणाच्या समस्येत आणि बेकारीत वाढ होत राहील.

**१०. जागतिक विकासाचे आव्हान**

भ्रष्टाचारी आणि एकाधिकारशाही शासन, दुर्बल राज्ये आणि समाज, बेकारी, उपासमार, निरक्षरता आणि अतिरिक्त लोकसंख्या या सर्वांचा परिणाम म्हणजे पर्यावरणाची दुर्दशा, स्थलांतरित आणि निर्वासितांच्या संख्येत वाढ आणि राजकीय व सामाजिक व्यवस्थेविरुद्ध चेतावणी होय. मानवी प्रगतीला उत्तेजन देणे आणि गरीब देशांमधील आर्थिक विकासाला मदत करणे हे विकसित जगाच्या दीर्घकालीन हितसंबंधांचे आहे. तसेच ती एक नैतिक जबाबदारीही आहे. मुक्त जागतिक बाजारपेठा श्रीमंत आणि गरीब देशातील समृद्धीच्या वाढीस हातभार लावतात. म्हणून उदारमतवाद्यांनी आर्थिकदृष्ट्या दुर्बल असलेल्या लोकांना उत्कृष्ट संधी देणारा मुक्त व्यापार हाच जगातील गरिबी दूर करण्याचा सर्वात सुरक्षित मार्ग आहे या आपल्या दृढ मताचा आपले सर्व चातुर्य पणाला लावून आक्रमकपणे पुनरुच्चार केला पाहिजे.

एकविसाव्या शतकाच्या पहाटे आपण सर्व उदारमतवादी या आव्हानांना एकजुटीने सामोरे जाण्यासाठी वचनबद्ध आहोत. आम्ही पुन्हा एकदा निग्रहाने सांगतो की व्यक्तिस्वातंत्र्याला आणि प्रत्येक व्यक्तीच्या प्रतिष्ठेला राजकीय जीवनाच्या केंद्रस्थानी ठेवण्यास उदारमतवादी चळवळ बांधील आहे.

अनुवाद - वि. चिं. फडके



## जागरूक नागरिकत्व

**प्रस्तावना**

संसद आणि विधिमंडळे यांचा कारभार, भ्रष्टाचारी आणि अकार्यक्षम शासनयंत्रणा, अस्थिर केंद्रीय सरकार आणि ढासळणारी अर्थव्यवस्था यामुळे सर्वसाधारण नागरिकाला उबग आला असून आपल्याला काहीच भवितव्य नाही असे त्याला वाटू लागले आहे. लोकशाहीला अभिप्रेत असलेली सर्व पायाभूत मांडणी अस्तित्वात असूनही लोकशाहीची ध्येय आणि फायदे यापासून आपण फार दूर आहोत असे सर्वांना वाटू लागले आहे.

निवडणुकीची जी पद्धत आपण स्वीकारली आहे, त्यातून लोकांच्या इच्छेचे खरेखुरे प्रतिनिधित्व होत नाही असे वाटू लागले आहे. लोकप्रतिनिधींच्या मुदतीच्या काळात त्यांच्या कामाचे मूल्यमापन करण्याचा कोणतही अधिकार जनतेस नसल्याचा हा परिणाम आहे.

सर्वसामान्य नागरिक सामाजिक प्रश्न आपले मानत नाही. मुंबईसारख्या महानगरातून संघटित गुंडगिरी ही आता नेहमीची बाब होऊ लागली आहे. माफिआ (कुठल्याही प्रकारचा कायदा न पाळता कोणतेही गुन्हेगारी कृत्य करायला मागेपुढे न पाहणारे लोक) शाळांतून नापास होऊन बाहेर पडलेल्या लोकांना प्रशिक्षण देत आहेत. विद्यापीठातून देखील भ्रष्टाचार आणि वशिलेबाजी यांचा सुळसुळाट झाला आहे. हे जीवनमूल्यांचा ऱ्हास झाला असल्याचे लक्षण आहे.

नागरिक सतराव्या - अठराव्या शतकातल्याप्रमाणे प्रजा म्हणून वागत आहेत. आज कोणी राजा नाही कोणी प्रजा नाही हे विसरत आहेत. जागरूक नागरिक म्हणून वागत नाहीत. स्वातंत्र्यलढ्यात भाग घेतलेल्या नेत्यांमध्ये आदर्शवाद होता. उलट सध्या निवडणुकीच्या राजकारणात गुंतलेल्या पुढाऱ्यांमध्ये नीतीमत्तेचा पूर्ण अभाव आढळतो.

लोकशाहीमध्ये लोकांचा प्रत्यक्ष सहभाग ही कल्पना भारतात रुजलेली नाही. निवडणुकीत मत देणे एवढेच लोकांचे काम नसून लोकशाही ही सततची प्रक्रिया आहे ही जाणीव आपण लोकांमध्ये कशी काय मिळवू शकू?

लोकशाहीचे फायदे मिळविण्यासाठी लोकशाही सुरक्षित ठेवण्यासाठी ती केवळ कागदावरती न राहण्यासाठी सर्वसामान्य नागरिकांना प्रशिक्षण देणे ही आपली नैतिक जबाबदारी आहे.

निवडणुकीतील यश हे उमेदवाराच्या कार्यावर अवलंबून नसते असे वारंवार आढळून येते. नाहीतर फूलनदेवीसारख्या व्यक्ती खासदार म्हणून कशा निवडून येऊ शकतील?

ही परिस्थिती सुधारण्यासाठी नागरिकानेच पुढाकार घेतला पाहिजे. तरच या अंधःकारात आशेचा किरण दिसेल. हॅरॉल्ड लास्की यांच्या मताप्रमाणे सार्वजनिक हित ओळखून त्यासाठी व्यक्तिगत सहभाग देणे म्हणजेच खरे नागरिकत्व

अनुक्रमणिका






होय. लोकशाहीत नवीन नवीन बदल होऊ शकतात कारण लोकशाहीत बदल आणि सुधारणा यांना कायम नाव आहे. ती एक लवचिक संकल्पना आहे.

## उदारमतवाद्याची भूमिका

लोकशाही मजबूत करण्यासाठी एखाद्या मतदार-संघात खालील प्रयोग करून पाहता येईल.

लोकसभा / विधानसभा / महानगरपालिका / नगर-पालिका यांच्या मतदारसंघातील एखाद्या विभागात काही नागरिक एकत्र येऊन प्रत्यक्ष कृतीमंच स्थापन करू शकतील. अशा मंचामध्ये कचरा, साफसफाई, बस सेवेत सुधारणा, प्रदूषण नियंत्रण, स्वच्छ पाणीपुरवठा, पोस्ट ऑफिसची सोय अशा विविध प्रश्नांचा विचार करण्यासाठी समाजाच्या विविध क्षेत्रातील लोक एकत्र येऊ शकतील. यामुळे रोजगार नसलेल्या युवक-युवतींच्या शक्तीला योग्य वाट निर्माण होऊ शकेल. वर सांगितलेल्या समस्यांचा जो विचार करील, त्यासंबंधी योग्य ती कारवाई करण्यासाठी धडपड करील, त्यातील प्रगतीची वारंवार माहिती होईल अशाच एखाद्या उमेदवाराला आम्ही मत देऊ असा निर्धार मंचाने करावयाला हवा.

या मंचाने लोकहितदक्ष, प्रमाणिक, कष्टाळू उमेद-वारालाच आम्ही मत देऊ, त्याचे नाव गुन्हेगारांच्या यादीत आहे किंवा ज्याचे मित्र संशयास्पद आहेत अशा व्यक्तींना आम्ही मत देणार नाही असे स्पष्ट करावयास हवे. अशी घोषणा म्हणजे एक प्रकारचा लोकांचा जाहीरनामाच होय आणि तो लोकप्रिय करावयास हवा.

विविध पक्षांच्या उमेदवारांना एकाच व्यासपीठावर बोलावून आपल्या मतदारसंघासाठी ते काय करू इच्छितात ते सांगण्याचे त्यांना मंचाने आवाहन करावयास हवे. निवडून आलेल्या उमेदवाराने काही ठरावीक मुदतीने मंचाला पुन्हा पुन्हा भेटण्याचे वचन त्याच्याकडून घ्यावयास हवे. अर्थातच कोणी नाही म्हणणार नाही. असा मंच जर खरोखर जागरूक दिसला, ठरलेल्या वेळी सभांना हजर राहून लोकप्रतिनिधींना प्रश्न विचारू लागला तर लोकप्रतिनिधी अशा मंचांना डावलणार नाहीत. तसे जर आपण केले तर आपले प्रतिनिधित्व आणि सत्ता स्थान धोक्यात आहे असे त्यांच्या लक्षात येईल.

सुजाण आणि थोडेसेही आर्थिक पाठबळ असलेले असे लोकमंच लोकप्रतिनिधींकडून काम करून घेऊ शकतील. असे झाले तर नागरिकांमध्ये जबाबदारीची जाणीव निर्माण होऊन आपली शक्ती मतदारसंघातील कामकाज पूर्ण करण्यावर केंद्रित करावी असे त्यांना वाटू लागेल.

स्वयंसेवी स्वेच्छा - संघटना, ज्येष्ठ नागरिक, रोटरी क्लब आणि लायन्स क्लब यांचे सदस्य, केबल चालक, तरुण व्यावसायिक आणि नोकरी न करणाऱ्या स्त्रिया या सर्वांना अशा उपक्रमात सहभागी करून घेता येईल. यामुळे मतदारसंघाबद्दल एक प्रकारची आपुलकीची भावना निर्माण होईल. असे मंच वारंवार भेटत राहिल्यास जाति-धर्म-भाषा-वर्ग विरहित एकसंघ समाज निर्माण होण्यास चालना मिळेल. प्रौढ साक्षरता, कुटुंबनियोजन, प्रथमोपचार, अडचणीच्या वेळी आर्थिक सहाय्य असे कार्यक्रम आर्थिक कुवतीनुसार हे मंच स्वेच्छा - पातळीवरून आयोजित करू शकतील.

आपले प्रश्न लोकप्रतिनिधीमार्फत सोडवून घेण्या-साठी खूप पैसा उभा करण्याची गरज आहे असे नाही. सामाजिक आणि राजकीयदृष्ट्या जागरूक असण्याची व त्यासाठी थोडासा, एक-दोन तास वेळ देण्याचीच फक्त गरज आहे.

लोकसभा मतदारसंघात सुमारे पाच ते सहा विधानसभेचे आमदार येतात. पंधरा ते वीस नगरसेवक येतात. लोकशाही सुदृढ करण्यासाठी ही रचना आहे आणि ही यंत्रणा कार्यरत ठेवणे - उत्तम पद्धतीने चालू ठेवणे हे नागरिकांचे काम आहे. गुन्हेगारांनी निवडणुकीला उभे राहू नये यासाठी घटनादुरुस्तीची आवश्यकता नाही. नागरिक मंच जर दक्ष राहिले तर अशी माणसे निवडून येणार नाहीत. कायद्याच्या ऐवजी अशी स्वयं यंत्रणाच अशा गोष्टींना प्रतिबंध करतील. ही गोष्ट जर एका मतदारसंघात यशस्वी होऊ शकली तर प्रसारमाध्यमाचा उपयोग करून ही यशोगाथा सर्व भारतभर पसरविता येईल. जे एका मतदारसंघात होऊ शकते ते उरलेल्या ५४२ मतदारसंघात देखील होऊ शकेल.

एक सुसंस्कृत समाज निर्माण होण्यासाठी सक्रीय जागरूक नागरिक असणे अतिशय आवश्यक आहे. लोकप्रतिनिधी लोकांना जबाबदार राहू लागतील अशी खबरदारी घेणे हा सुजाण नागरिकत्वाच्या केवळ पैलू झाला.

भारतात आर्थिक सुधारणा सुरू होऊन काही वर्षे लोटली. तरीदेखील राज्य सरकार व केंद्र सरकार यांच्या ताब्यात अनेक संस्था आहेत. या संस्थांचा आपल्या दैनंदिन जीवनाशी संबंध येतो. उदा. दूरध्वनी-यंत्रणा, विद्युतमंडळ, पोस्ट ऑफिसेस, विमा कंपन्या वगैरे अशा संस्था केशा



अनुक्रमणिका

चालतात ते समजून घेणे आवश्यक आहे. या सर्व संस्थांचे ग्राहक म्हणून या संस्थांकडून आपल्याला चांगली सेवा कशी मिळेल यासाठी आपण प्रयत्नशील राहिले पाहिजे. यासंबंधी काही ग्राहकमंचांनी न्यायलयात सादर केलेल्या अर्जाची आपण माहिती घेतली पाहिजे. प्रसंगी त्यात सहभागी व्हायला पाहिजे. ग्राहकांच्या हितासाठी अनेक कायदे असतात. पण त्यांच्या अंमलबजावणीसाठी आपण आग्रह धरला तर अशा खटल्यांची वेळच उरणार नाही. सुजाण नागरिकत्वाचा हा दुसरा पैलू म्हणता येईल.

म्हणूनच पाच वर्षातून एकदा मतदान करणे आणि मग मधूनमधून कुरकुरत राहणे म्हणजे नागरिकत्व नव्हे. राष्ट्रीय कामकाज आणि सामाजिक घडामोडी यात सहभाग घेणे म्हणजेच खरे नागरिकत्व होय. असे झाले तरच एक स्वस्थ, निरोगी आणि सुसंस्कृत समाज उभा राहील.

(उदारमतवाद या विषयावर १६ मार्च ते २८ मार्च १९९९ या कालावधीत मंगलोर येथे झालेल्या एका राष्ट्रीय कार्यशाळेत सर्वसंमत झालेल्या चर्चेवर आधारित.)

भाषांतर - श्री. एस. आर. केळकर



## सामाजिक न्याय प्रस्थापित करण्यासाठी लागणाऱ्या आवश्यक गोष्टी : उदारमतवादी भूमिका

### भाग १ : टीकाटिप्पणी

स्वातंत्र्य मिळून पन्नास वर्षे झाली, नऊ पंचवार्षिक योजना झाल्या आणि स्त्रियांपासून मागास अनुसूचित जातींना विशेष सवलती मिळवून देण्यासाठी शेकडो कायदे व नियम यांचे जणू एक घनदाट जंगलच तयार केले. पण तरीही शिक्षण, रोजगार, निवारा इ. बाबत सामाजिक न्याय अजूनही प्रत्यक्षात उतरलेला दिसत नाही. फक्त १६ टक्के कुटुंबांनाच वीज, पिण्याचे पाणी आणि मलमूत्राची योग्य ती व्यवस्था असलेली 'चैन' अनुभवायला मिळालेली दिसते. त्याचे खेड्यातील प्रमाण तर अवघे ३.९ टक्के इतकेच आहे. देशातील निरक्षर महिलांचे प्रमाण ७१ टक्के इतके आहे. केरळ आणि तामिळनाडू यांसारखी राज्ये सोडली तर आपल्या खेड्यातील आरोग्य-व्यवस्था अगदीच कुचकामी तरी आहे किंवा नसल्यासारखी आहे. त्याशिवाय लक्षावधी सुशिक्षित बेकारांचा मोठाच प्रश्न आहे.

प्रत्येक समाजात काही प्रमाणात असमानता असणारच हे जरी मान्य केले तरी लक्षावधी भारतीयांना जे मानहानीकारक जिणे जगावे लागते, त्याकडे आणि प्रचंड प्रमाणात सतत असणारी आर्थिक विषमता या गोष्टीकडे दुर्लक्ष करणे शक्य नाही. विशिष्ट अशा प्राथमिक गरजांची पूर्तता करणे या गोष्टीला अग्रक्रम दिलाच पाहिजे; कारण अन्न, वस्त्र, निवारा, प्राथमिक स्वरूपाच्या आरोग्याच्या गरजा आणि प्राथमिक शिक्षण असल्याखेरीज एखादी व्यक्ती मनुष्य या संज्ञेला पात्र होऊ शकत नाही.

आपल्याकडे असलेले जातिभेद व दलितांच्या बाबतीत होत असलेला सततचा भेदभाव या गोष्टींचा समाजातील शांततेला आणि स्थैर्याला धोका आहे. आपल्या लोकसंख्येतील फार मोठा समाज हा सामाजिक आणि शैक्षणिक क्षेत्रात मागासलेला आहे. या मागासलेपणामुळे त्यांचा सामाजिक व आर्थिक प्रगतीमधला सहभागही अवरुद्ध होतो; मनुष्याचा सर्वांगीण विकास तर दूरच राहिला. त्यामुळे सामाजिक न्यायाच्या संदर्भात समाजातील भिन्नभिन्न घटकांमधील भेदाभेद कमी करणे ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे.

स्त्रियांनादेखील ऐतिहासिक, सामाजिक आणि आर्थिक स्वरूपाचे तोटे भोगावे लागतात. इतर मागास घटकांमध्येसुद्धा स्त्रियाच सर्वात अधिक मागासलेल्या असतात. उदारमतवादी समाजाने स्त्रियांची समान हक्कांची मागणी - गंभीरपणे हाताळली पाहिजे.

सामाजिक न्याय या संकल्पनेत मानवी हक्क आणि नागरी स्वातंत्र्य यांचे रक्षण करणे या गोष्टीचाही अंतर्भाव होतो.

दुर्बलांचे प्रश्न, तसेच शारीरिक अपंगत्व असणारे लोक, बालमजूर, आदिवासी आणि पर्यावरणाचे बळी यांचाही सामाजिक न्यायाच्या कार्यक्रमपत्रिकेत समावेश असला पाहिजे.

भारताचे हे सर्वात निकडीचे प्रश्न आहेत. आपल्या देशातील राजकीय संघर्ष, सामाजिक आणि जातीय दंगली, जमावाची हुल्लडबाजी व लोकशाही संस्थांचे खच्चीकरण या सर्वांच्या मुळाशी या गोष्टी आहेत.

भाग २ : उदारमतवादी भूमिका

उदारमतवाद हा (व्यक्ती) स्वातंत्र्याला अग्रक्रम देतो हे खरेच पण माणसाला जर सुरक्षिततेची आणि समानतेची खात्री नसेल तर हे स्वातंत्र्य पोकळच आहे याची जाणही उदारमतवाद्यांना आहे. हे एक आंतरविरोधाचे उदाहरण आहे असे वाटण्याची शक्यता आहे. पण ते तसे नाही. गरीब व्यक्तीला समानता देऊन त्याला प्रगतीची संधी प्राप्त करून देणे आणि त्यातून त्याचे दारिद्र्यनिर्मूलन करणे हाच उदारमतवादाचा मार्ग आहे. आणि हे आपल्याला खुल्या अर्थव्यवस्थेच्या मार्गाने प्राप्त करता येणे शक्य आहे.

आपल्या दुःसह परिस्थितीवर मात करण्यासाठीच समाजातील फार मोठ्या घटकाला संधी आणि साधने यांचीच उणीव भासते. उदारमतवादाला या गोष्टीकडे दुर्लक्ष करता येणार नाही. कारण या गोष्टीमुळे मानवी प्रतिष्ठेलाच धक्की बसतो. मागासलेल्यांना प्रगतीच्या संधी प्राप्त करून देणे, त्याचप्रमाणे प्रगतीपथावरील अडचणींवर व आपत्तींवर त्यांना मात करण्याचे सामर्थ्य प्राप्त करून देण्यासाठी सामाजिक संरक्षणाचे जाळे विणणे हे उदारमतवादी सामाजिक धोरणाचे ध्येय असले पाहिजे.

उदारमतवादी अशी भूमिका आहे, की आर्थिक विषमता नष्ट करण्यासाठी सरकारने कायदे करु नयेत तर मागास घटकांवर लक्ष केंद्रित करून हे घटक स्वतःची प्रतिष्ठा राखून इतरांशी बरोबरीच्या नात्याने चढाओढ करण्यास कसे समर्थ होतील ते पहावे.

आजपर्यंतच्या सरकारांनी अनेक योजनांवर प्रचंड पैसा मदतीदाखल खर्च करून लोकांच्या प्राथमिक गरजा भागविण्याचा प्रयत्न केला आहे. अनेक प्रकारच्या नोकऱ्या निर्माण करण्यावर व दारिद्र्यनिर्मूलनाच्या योजनांवरही प्रचंड खर्च केला आहे. या योजनांतून वितरण व्यवस्थेसाठी मोठ्या प्रमाणात नोकरशाहीत वाढ झाली असली तरी ज्यांच्यासाठी हा पैसा - त्यातील अत्यल्प हिस्सा त्यांच्यापर्यंत पोहोचला ही वस्तुस्थिती आहे. या योजनांमुळे प्रचंड प्रमाणात भ्रष्टाचाराला जन्म दिला. देशाच्या साधनसंपत्तीचा हा अनन्यसाधारण असा अपव्ययच आहे. त्यामुळे सार्वजनिक अर्थव्यवस्था डळमळीत झाली आहे. याचा आर्थिक प्रगतीवर प्रतिकूल परिणाम होऊन त्याचे ओझे पुढच्या पिढ्यांवर पडणार आहे.

या अनुभवाच्या आधारे आपल्याला असे दिसेल की या योजना सुरु करण्याची व त्या राबविण्याची जबाबदारी ही स्थानिक लोकसमूहावरच टाकणे हितावह असते. त्यासाठी लोकांनाच आपली परिस्थिती सुधारण्यासाठी जबाबदार करणे आणि त्यासाठी सत्तेचे विकेंद्रीकरण करमे आवश्यक आहे.

आपल्याला अशी भूमिका घेणे शक्य आहे की जेणेकरुन लोक जी साधनसामुग्री निर्माण करतील त्यावर त्यांचाच अधिकार राहील. यामुळे त्यांना सामाजिकदृष्ट्या स्वावलंबी बनवणे शक्य होईल. परिणामत: त्यांना त्यांच्याच समाजघटकात समानता आणता येईल. अशातऱ्हेची समानता आपल्या खेड्यापाड्यातही आढळत नाही. खरी गरज आहे ती खेड्यापाड्यापर्यंत लोकशाहीच्या विविध संस्था स्थापण्याची की ज्यामुळे प्रत्येक नागरिकाला त्याच्या रोजच्या जीवनाचा भाग म्हणून सबलीकरण प्राप्त होईल. याकडे जर सकारात्मक कृती म्हणून पाहिले तर ती अंती एक अतिशय परिणामकारक कृती करून लोकांसाठी 'सकारात्मक भेदभाव' (पॉझिटिव्ह डिस्क्रिमिनेशन) ठेवण्याची गरज भासणार नाही.

आर्थिक उदारीकरणाने अनेक प्रकारच्या नोकऱ्यांच्या संधी निर्माण होतील. त्याचबरोबर शास्त्रीय प्रगतीच्या पार्श्वभूमीवर उद्योजकता व स्वयंरोजगार यांनाही उत्तेजन देता येईल. यातून ऊर्ध्वगामी प्रगतीची लोकांमध्ये शक्यता निर्माण झाल्यामुळे प्रत्येक उद्योजक एका किंवा अनेक व्यक्तींना काम पुरवू शकेल.

त्याचप्रमाणे शेती, बागायत, फलोद्याने आणि मूलभूत सुविधा निर्माण करणारे उद्योग या क्षेत्रातही नोकऱ्या व स्वयंरोजगाराच्या संधींना प्रोत्साहन दिले पाहिजे. यंत्र व मानव यांची सुयोग्य सांगड घालून आपल्या देशाच्या प्रचंड आर्थिक सुप्त शक्तीची उपयोग करणे शक्य होईल.

सामाजिक न्यायाचे तत्त्व तेव्हाच यशस्वी होईल. जेव्हा शासकीय आणि राजकीय तत्त्वावर विकेंद्रीकरण केले जाईल. आपल्या गरजा कोणत्या आहेत हे लोकांनाच ठरवू द्या. त्यामुळे त्यांच्यात सामाजिक व राजकीय जागृती होईल. त्यांच्यात मानवी प्रतिष्ठेची कल्पना रुजेल आणि स्थानिक व लोकसमूह पातळीवर खंबीर नेतृत्व उभे राहील.

(मंगळूर येथे दि. २६ ते २८ मार्च १९९९ या काळात झालेल्या उदारमतवादावरील राष्ट्रीय कार्यशाळेत चर्चा होऊन वरील लेखातील दुसरा भाग सर्वमताने स्वीकारला गेला होता.)

भाषांतर - डॉ. व. वि. बडवे

☑ ☑ ☑










# लोकसंख्या - गरिबी
# डॉ० वसंत पेठे यांचे जुळे अभिनव प्रतिमान

## गरिबी निर्मूलन व आर्थिक विकास
## एक स्वदेशी प्रतिमान

### डॉ० वसंत पेठे

राष्ट्रपिता महात्मा गांधी यांच्या नेतृत्वाखाली भारताने स्वातंत्र्य मिळविले. स्वराज्यानंतर सुराज्य होईल, अशी जनतेने अपेक्षा केली. परंतु आज पन्नास वर्षे लोटली, तरी सामान्य जनतेच्या दृष्टीने देशाची आर्थिक व सामाजिक परिस्थिती बिकट व चिंतनीय होत चालली आहे. देशातील असंख्य कुटुंबांना बहुव्यापी गरिबीने (mass poverty) जणू ग्रासले आहे. दारिद्र्यनिर्मूलनासाठी सरकारने कोट्यवधी रुपये खर्च केले; पण यात अपेक्षित यश आले नाही. शासनालाही हे मान्य आहे. गरिबी-हटावसंबंधीची शासनाची धोरण-नीती सपशेल फसली आहे. १७ ऑक्टोबर या आंतरराष्ट्रीय गरिबी निर्मूलन दिनाच्या निमित्ताने या अपयशाची चिकित्सा उथळपणाने न करता, ती प्रश्नाच्या मुळाशी जाऊन करणे आवश्यक आहे.

सामान्यत: शासनाचे धोरण हे विशिष्ट अशा प्रतिमानावर आधारलेले असते. ही विचारसरणीच मुळात चुकीची असेल, तर धोरणही चुकीचे व परिणामत: अपयशी ठरते. इमारतीचा पायाच कच्चा असेल, तर ती केव्हा तरी कोसळणारच. गरिबी-प्रतिमानासंबंधी नेमके हेच घडले आहे! दुर्दैवाने सरकारचे गरिबी निर्मूलनासंबंधीचे धोरण भारतीय परिस्थितीला अप्रस्तुत अशा पाश्चिमात्य विचारसरणीवर आधारलेले आहे. यानुसार, आर्थिक विकास झाला की आपोआपच गरिबी नष्ट होते. आर्थिक विकासाचे एक विशिष्ट प्रतिरूप आपण अंगीकारले आहे, ते म्हणजे प्रचंड उद्योगधंदे असणारी अर्थव्यवस्था निर्माण करणे, हे होय. यामध्ये अत्याधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करणे अपरिहार्य ठरते. 'मोठमोठे कारखाने म्हणजे आधुनिक मंदिरे आहेत.' अशा शब्दांत जवाहरलाल नेहरू यांनी कारखानदारीची भलावण केली. या जोशात शेती आणि लहान व मध्यम स्तरावरील घरगुती व कुटीर उद्योगधंदे मात्र दुर्लक्षित केले गेले.

#### गालब्रेथ यांचे उद्‌गार

गेल्या पन्नास वर्षांचा अनुभव असा आहे की, विशाल उद्योगप्रधान अर्थव्यवस्थेचे (mega industralisation) पाश्चिमात्य प्रतिमान आपल्या देशाच्या संदर्भात पूर्णत: कुचकामी ठरले आहे. हार्वर्ड विद्यापीठाचे प्रा. केनेथ ग्रालब्रेथ यांनी प्रांजलपणे असे उद्‌गार काढले की, 'महाभांडवलशाही असो वा समाजवादी, प्रगत महाउद्योगप्रधान देशांची अर्थव्यवस्था, मागासलेल्या देशांना आदर्श ठरेल अशी आमची समजूत होती, ती पूर्णत: चुकीची ठरली आहे.' एका दृष्टीने औद्योगिक प्रगतीमुळे भारत आर्थिकदृष्ट्या प्रबल झाला आहे, पण त्याचबरोबर बहुव्यापी दारिद्र्यानेही उग्र स्वरूप धारण केले आहे. या विरोधाभासाचे विश्लेषण खोलात जाऊन केले पाहिजे.

पाश्चात्त्य दृष्टिकोन का अपयशी ठरला? याची तीन प्रमुख कारणे आहेत : प्रथम, या प्रतिमानात असे गृहीत धरले आहे, की उद्योगधंद्यांच्या विकासामुळे राष्ट्रीय उत्पन्नात झालेली वाढ गरिबांपर्यंत जाऊन झिरपते. परंतु हे ठिबकतत्त्व (trikle bown theory) प्रत्यक्षात मात्र उतरले नाही! आर्थिक विकासाची फळे प्रस्थापित हितसबंधितांनीच चाखली. दुसरे, मोठे कारखाने, मोठी धरणे, अशा प्रकारच्या विकासात भांडवल खूप लागते. पण त्या प्रमाणात रोजगाराची निर्मिती होत नाही. पर्यायाने गरिबी कमी करण्यास याचा उपयोग होत नाही. तिसरे, सरकारने दारिद्र्य नाहीसे करण्यासाठी काही खास योजना आखल्या. पण त्यांचेही फायदे लाचखाऊ प्रशासनाधिकारी, राजकीय नेते व स्थानिक पुढारी यांनीच मधल्यामध्ये लुटले. पाश्चिमात्त्य प्रतिमानाच्या अपयशाचे मूलभूत कारण असे आहे की, ते गरिबी निर्मूलनाच्या संदर्भात 'प्रत्यक्ष' प्रतिमान (direct model) नसून, मध्यस्थी प्रतिमान (Proxy model) आहे. ते गरिबीच्या प्रश्नावर प्रत्यक्षपणे प्रहार करीत नाही.


अनुक्रमणिका

गेली काही वर्षे मी गरिबी-निर्मूलनासंबंधी संशोधन करीत आहे. माझ्या रुपसरणीचा (Paradigm) मध्यवर्ती सिद्धांत पुढीलप्रमाणे आहे. भारतातील बहुव्यापी गरिबी ही अज्ञान, अनारोग्य, बेकारी, गुन्हेगारी अशा अनेक आर्थिक व सामाजिक समस्यांची जननी आहे. म्हणून गरिबी कशामुळे आहे, या मूलभूत प्रश्नाचे उत्तर देणे सरकारी धोरण-नीती ठरविण्याच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचे आहे. मानवामध्ये असणाऱ्या उत्पादनक्षमता, सर्जनशीलता इत्यादी सुप्त गुणांचा ऱ्हास होणे अथवा पूर्ण विकास न होणे हे गरिबीचे 'निकटचे' कारण होय. मानवी गुणांच्या विकासाच्या विरोधात येणारे विषमता, शोषण, चंगळवाद व शस्त्रास्त्रावरील अफाट खर्च हे घटक गरिबीची 'माध्यमिक' कारणे आहेत आणि उच्चभ्रू -प्राङ्मुखी आर्थिक नियोजन, कालबाह्य समाजरचना, दुष्ट प्रवृत्ती व नैतिक मूल्यांचा ऱ्हास ही त्याची अंतिम कारणे आहेत.

या अनुषंगाने शासनाची गरिबी-निर्मूलानाची धोरण-नीती कशी असावी व कशी असू नये, यासंबंधीची मार्गदर्शक तत्त्वे स्पष्टपणे साकार होतात. प्रथम, दारिद्र्याची पाळेमुळे समाजाची कालबाह्य रचना व भ्रष्ट मानसिकता यामध्ये खोलवर जाऊन रुतलेली आहेत. म्हणून दारिद्र्य समूळ नष्ट करावयाचे असेल, तर मलमपट्टीवजा फुटकळ योजना अगदी निरुपयोगी आहेत. शोषणावर आधारित बुरसटलेल्या समाजरचनेवर प्रहार करुन मूलभूत जनता-प्राङ्मुखी समाज-परिवर्तन करणे, हाच एकमेव अंतिम उपाय गरिबी निर्मूलन धोरणाच्या केंद्रस्थानी ठेवला पाहिजे. दुसरे, स्वतःच्या निसर्ग-दत्त, पण सुप्त गुणांचा विकास करण्यासाठी तळागाळातील गरिबांना समाजात समान संधी मिळत नाही. त्यामुळे प्रचंड मानवी शक्ती निकामी ठरते. विषमता, भ्रष्टाचार, वशिलेबाजी यासारखे समान संधीमध्ये येणारे अडसर नष्ट करुन गरिबांना स्वतःच्या विकासाची दालने खुली करून देणे, हे गरिबी-निर्मूलन धोरणातील महत्त्वाचे सूत्र असावे.

**प्रक्रियारुपी नाटकातील नायक!**

प्रत्येक सर्वसाधारण गरीब माणूस हाच सामाजिक परिवर्तनामधील व सुप्त गुणांच्या विकासामधील मध्यवर्ती घटक आहे. दारिद्र्य निवारणाच्या प्रक्रियेत त्याला सक्रिय सहभागी घटक (active participant) म्हणून समाविष्ट करणे अत्यावश्यक आहे. यासाठी त्याला योग्य रीतीने सामर्थ्यशाली बनविले पाहिजे. त्याची उत्पादकता, सर्जनशीलता आणि स्वोन्नतीबद्दलची ईर्षा वाढीस लागली पाहिजे. यासाठी दोनच मार्ग उपलब्ध असतात. ते म्हणजे १. शिक्षण व संस्कार आणि २. आरोग्य संवर्धन. प्रत्येक गरीब व्यक्तीला योग्य ते व्यावसायिक शिक्षण दिले पाहिजे. आणि त्याचे आरोग्य सुरक्षित राहिले पाहिजे. तरच प्रत्येक व्यक्ती व्यक्तिगत स्तरावर शेती, उद्योग व सेवा अशासारख्या योग्य त्या उत्पादन कार्यासाठी सक्षम होऊ शकेल व स्वतःची गरिबी स्वतःच घालवू शकेल. आपल्या देशात मनुष्यबळ ही एक सुप्त, पण अत्यंत मौलिक अशी साधनसंपत्ती आहे; परंतु ती नाहक फुकट जात आहे. अतिशयोक्तीचा धोका पत्करुनही असे म्हणावेसे वाटते की, सरकारने सर्वांसाठी शिक्षण व आरोग्य हा एक कलमी कार्यक्रम 'धडक कार्यक्रम' म्हणून येत्या चार-पाच वर्षात जरी यशस्वी केला, तरी बहुव्यापी गरिबी तर नष्ट होईलच, पण कधीही अनुभवले नाही, असे सुवर्णयुग या देशात अवतरेल. गरिबी-निर्मूलनात व आर्थिक विकासात भांडवल व तंत्रज्ञान यापेक्षा मानवी साधनसंपत्तीचे योगदान अधिक प्रभावी व अधिक प्रमाणात असते, हे संशोधनाने सिद्ध झालेले ऐतिहासिक सत्य आहे.

शेती व लहान उद्योगधंदे अशाप्रकारच्या आर्थिक व्यवस्थेतच प्रत्येक गरीब माणूस आत्मविश्वासाने आपली आर्थिक स्थिती सुधारु शकेल. गरीब शिक्षणाने उत्पादनक्षम झाला, तरी त्याला रोजगाराची संधी नसेल, तर तो उपाशीच राहणार. महाऔद्योगिकरणाच्या संस्कृतीत अशा संधी फार कमी असतात. म्हणून आपल्या अर्थनीतीत लघुउद्योगांना प्राधान्य दिले पाहिजे. भारतात भांडवल-संचय कमी, पण मनुष्यबळ विपुल आहे. म्हणून सुधारित शेती, पशुसंवर्धन, घरगुती व्यवसाय, कुटीरउद्योग, स्थानिक साधनसंपत्तीवर आधारलेले उद्योग अशा लघुउद्योगांचे जाळे खेड्यापाड्यातून पसरले पाहिजे. म्हणजे गावातच रोजगाराची सोय होऊन उत्पन्न मिळेल व गरिबी हटेल. शहरी विस्फोट टळेल. खरी भारतीय संस्कृती हीच आहे. म. गांधींनी याच विचारसरणीचा पुरस्कार केला. विख्यात संख्याशास्त्रज्ञ प्रा. महालनवीस यांनी यासाठी भक्कम सांख्यिकीय पुरावा दिला. प्रसिद्ध विचारवंत शुमाकर यांचे Small is beautiful हे वाक्य याच संदर्भात एक सुभाषित होऊन जगप्रसिद्ध झाले.

**चंगळवादाचे थैमान**

भारतातील मोकाट सुटलेला चंगळवाद कमी झाला,








तर गरिबी कमी होण्याला खूप मदत होईल. आपले आर्थिक व्यवस्थापन गरजांवर आधारलेले हवे, लालसेवर नव्हे. म. गांधी म्हणत : 'या पृथ्वीतलावर प्रत्येक माणसाची 'गरज' भागविण्या इतकी साधनसामग्री आहे; परंतु एका व्यक्तीची सुद्धा हाव पुरविण्यास ती अपुरी पडेल. भोगवाद बकासुरासारखा आहे. त्याच्या हावेला मर्यादा नाही. राष्ट्रीय साधनसामग्रीचा अवास्तव वापर चैनीच्या वस्तू उत्पादनावर होतो. हीच संपत्ती मानवी विकासासाठी वापरली, तर गरिबांना फायदा होईल. आपले उत्पादन जनता-अभिमुख हवे.

गरिबीच्या संदर्भात पाश्चिमात्य प्रतिमान व वर मांडलेले प्रतिमान यांत मूलभूत फरक आहेत. पाश्चात्त्य प्रतिमान प्रतिपत्री आहे, तर अपरोल्लिखित प्रतिमान हे गरिबी-समस्येवर सरळसरळ हल्ला करते. पाश्चात्त्य प्रतिमानाने आर्थिक विकास होऊ शकेल. पण गरिबी नष्ट होणार नाही - किंबहुना ती अधिक उग्र होईल. पुरावा? संयुक्त राष्ट्रसंघाच्या अहवालात हेच सिद्ध झाले आहे. आर्थिक प्रगतीच्या निकषावर भारताचा पाचवा नंबर लागतो. पण मानवी विकासाच्या निकषावर १३४ वा! दुसरा फरक असा की, त्यानुसार व्यक्तिगत गरिबी निर्मूलन व राष्ट्रीय उत्पन्नातील वाढ एकसमया-वच्छेदेकरुन होते. गरिबीच्या सुप्त उत्पादनक्षमतेची वाढ झाली, की तो काम करन द्रव्यार्जन करतो. तिसरा फरक असा की, पाश्चात्त्य विचारसरणीचे ध्येय जेरेमी बेंथमच्या तत्त्वानुसार 'सर्वाधिक लोकांचे सर्वाधिक हित' असे आहे. माझ्या प्रतिमानाचे ध्येय मात्र 'गरिबीतल्या सर्वात गरिबाचे हित' असे आहे. हे गांधी-विनोबा-जयप्रकाश नारायण यांच्या सर्वोदय - अंत्योदय विचारांशी सुसंगत आहे.

(महाराष्ट्र टाइम्स, १६ ऑक्टोबर १९९७)



## डॉ. वसंत पेठे यांची गरिबी निर्मूलन प्रतिमाने

### प्र० चिं० शेजवलकर

महात्मा गांधींच्या नेतृत्वाखाली भारताने स्वातंत्र्य मिळविले. स्वातंत्र्यानंतर सुराज्य येईल, रामराज्य येईल, अशी जनतेने अपेक्षा केली. परंतु आज त्रेचाळीस वर्षे लोटली तरी सामान्य जनतेच्या दृष्टीने देशाची आर्थिक आणि सामाजिक परिस्थिती अधिकाधिक बिकट व चिंतनीय होत चालली आहे. दारिद्र्य निवारण आणि लोकसंख्या-नियंत्रण यासंबंधीच्या कार्यक्रमावर आजपर्यंत कोट्यवधी रुपये खर्च झाले. पण लोकसंख्या व गरिबी या एकमेकांशी निगडित अशा जुळ्या समस्येच्या बाबतीत अपेक्षित प्रगती होत नाही असे दिसून आले आहे. सरकारलासुद्धा हे मान्य आहे.

श्रीमंत व गरीब यामधील दरी वाढत आहे. अज्ञान, अनारोग्य, बेकारी, महागाई, काळा पैसा, दहशतवाद इ. अनंत प्रश्नांनी सामूहिक व वैयक्तिक जीवन त्रस्त व दूषित झाले आहे. लोकसंख्येच्या आघाडीवर केरळसारखी तुरळक राज्ये सोडली तर, उत्तरप्रदेश, बिहार, राजस्थान, मध्यप्रदेश यासारख्या अनेक राज्यांत लोकसंख्या-नियंत्रणाच्या दृष्टीने फारशी प्रगती होऊ शकली नाही. थोडक्यात, लोकसंख्या व गरिबी यासंबंधीची शासनाची धोरण-नीती अपयशी ठरली आहे.

#### प्रतिमानेच चुकीची

शासनाचे धोरण काही प्रतिमानांवर (मॉडेल्सवर) आधारलेले आहे. ही प्रतिमानेच कशी चुकीची आहेत व पर्यायी प्रतिमाने कशी असावीत हे दाखविण्याचा फारसा गंभीर व सखोल प्रयत्न झाला नाही. या संदर्भात, आंतरराष्ट्रीय कीर्तीचे लोकसंख्या-शास्त्रज्ञ प्रा. वसंत प्रभाकर पेठे यांचे संशोधन मौलिक ठरते. डॉ. पेठे यांनी गेली १५-२० वर्षे सातत्याने संशोधन व चिंतन करून एक नवीन सुसूत्र व मूलगामी विचारसरणी मांडली आहे. अलीकडेच विद्यापीठ अनुदान आयोगाने डॉ. पेठे यांना सन्माननीय फेलोशिप (एमिरिटस फेलोशिप) देऊन त्यांचा गौरव केला आहे.

#### शास्त्रशुद्ध हल्ला

प्रचलित सनातनी व कालबाह्य विचारसरणींवर घणाघाती पण शास्त्रशुद्ध हल्ला चढवून पेठे यांनी तिचा फोलपणा दाखवून दिला आहे. पण केवळ विध्वंसकाची भूमिका न घेता त्यांनी अभिनव व विधायक विचारही मांडले आहेत. त्यांच्या संशोधनाचे दोन महत्त्वाचे पैलू आहेत. प्रथम, त्यांनी नव-माल्थसवाद किंवा मार्क्सवाद यांच्याप्रमाणे लोकसंख्या प्रश्नाचा एकांगीपणाने विचार केला नाही, तर लोकसंख्येची वाढ, आर्थिक विकास, सामाजिक परिवर्तन आणि नैतिक मूल्ये या सर्व प्रक्रियांना एका सूत्रात गुंफून एक










व्यापक अशी विचारप्रणाली मांडली आहे. दुसरे, लोकसंख्या समस्येचा विचार लोकसंख्या शास्त्राच्या पलीकडे जाऊन आर्थिक, राजकीय, सामाजिक, मानसिक, नैतिक व जीवशास्त्रीय अशा विविध दृष्टिकोनातून करण्याच्या संसोधन प्रक्रियेचे ते प्रणेते आहेत. त्यांच्या 'बियाँड डेमोग्राफी' या सुप्रसिद्ध प्रबंधामुळे विविध ज्ञान शास्त्रांतील विचारवंतांना एकत्र येऊन लोकसंख्या प्रश्नावर संशोधन करण्यासाठी नवीन दालने खुली झाली आहेत.

### सक्तीविरुद्ध धर्मयुद्धच

पेठे यांनी सक्तीच्या निर्बिजीकरणाविरुद्ध जवळ-जवळ धर्मयुद्धच पुकारलेले दिसते. 'सक्तीचे कुटुंबनियोजन' हा त्यांचा ग्रंथ खूपच गाजला आहे. पेठे यांच्या या मौलिक संशोधनाची प्रशंसा अनेक विख्यात विचारवंतांनी व मासिकांनी केली आहे.

### वास्तवाचे भान हवे

पेठे यांची लोकसंख्येसकट सामाजिक प्रश्नाबाबत निश्चित व साकार अशी तात्त्विक भूमिका आहे. पण ही भूमिका हस्तिदंती मनोऱ्यात राहून कल्पनाविलास करणाऱ्या प्राध्यापकाची नाही. तिला वास्तवाचा भक्कम आधार आहे. तसेच कोणत्याही वादाची अतिरेकी भूमिका ते घेत नाहीत. तर विविध विचारधारांतील गतिमान धागे एकत्र विणून ते प्रत्येक प्रश्नाचे वैश्विक दृष्टीने विवेचन करतात.

आजच्या युगात परिस्थितीचे आकलन करताना आणि सामाजिक धोरण-नीती आखताना विचारवंतांनी दोन वास्तव घटकांचे सतत भान ठेवणे आवश्यक आहे. एक, अणुयुद्ध झाले तर, सर्वनाश होणार, जगाची केवळ राखच होणार. दुसरे, पृथ्वीवरील ऊर्जा व इतर साधनसामुग्री आता काही मर्यादित काळापुरतीच शिल्लक आहे. म्हणून बेफाम भोगवादाला (अनब्राइडल्ड कन्झुमरिझमला) आताच लगाम घातला नाही तर भविष्यात सर्वच मानव जातीचे जीवनमान कोलमडून पडेल. सुदैवाने, या दोहोंची जाण महाशक्तिशाली राष्ट्रांतील, काही सुजाण नेत्यांना व विचारवंतांना होत आहे. अशा वैश्विक व आंतरशास्त्रीय दृष्टिकोनातून पेठे सामाजिक प्रश्नांकडे पाहतात.

असा सर्वंकष दृष्टिकोन ठेवूनच भारताने आपल्या प्रगतीसाठी संकल्पना व प्रतिमाने तयार करावीत असा पेठे यांचा आग्रह आहे. परंतु दुर्दैवाने भारताने आपल्या आर्थिक व सामाजिक विकासासाठी आतापर्यंत पाश्चिमात्त्य प्रतिमानां-चाच स्वीकार केलेला आहे. त्यासंबंधी गंभीरपणे अजूनही फेरविचार होत नाही ही खरी आपली शोकांतिका आहे.

### पाश्चात्त्य प्रतिमाने विपर्यस्त

पाश्चात्त्य प्रतिमानांनी आपले फारच नुकसान केले आहे असे पेठे यांचे प्रतिपादन आहे. हॅरॉड डोमर आणि कोल हूव्हर यांच्या प्रतिमानांवर आजपर्यंत आपली आर्थिक नियोजन-नीती आणि लोकसंख्या धोरण आधारलेले आहे. या प्रतिमानांनुसार जनन-प्रमाण कमी झाले की, लोकसंख्यावाढ कमी होते, त्यामुळे बचत व गुंतवणूक वाढते आणि राष्ट्रीय उत्पन्नात वाढ होते, अशा दुव्यांची ही साखळी आहे. त्यामुळे जननप्रमाण कमी करणे ही आर्थिक विकासाची गुरुकिल्ली आहे असे सरळ अनुमान निघते. म्हणूनच कुटुंब-नियोजन कार्यक्रमाला आपल्या सामाजिक धोरणनीतीत अभूतपूर्व महत्त्व प्राप्त झाले.

या प्रतिमानाचा काय परिणाम झाला तो पाहण्यासारखा आहे. गेल्या ४० वर्षांत भांडवलशाही समाजरचनेची पाळेमुळे, भारतात घट्ट रोवली गेली. पाश्चात्त्य प्रतिमानांत, आर्थिक विकासाच्या बाबतीत राष्ट्रीय उत्पन्न वाढीला आणि लोकसंख्येच्या बाबतीत कुटुंब-नियोजनाला अवास्तव महत्त्व दिले गेले. जणू काही ती आपली 'दैवते' झाली आहेत. परंतु या वेडापायी गरिबी, विषमता, नागरी-विस्फोट, अनारोग्य, जीवनातील गुणवत्तेची घसरण, प्रदूषण असे अनंत प्रश्न निर्माण झाले आहेत. या आपल्या एकाच देशात दोन भारतांचे दर्शन घडते.

एकीकडे श्रीमंत, राजकीयदृष्ट्या बलवान व उच्च सामाजिक प्रतिष्ठा असलेल्या वर्गाचा भारत दिसते, तर दुसरीकडे दरिद्री, दुर्बल, व दबलेल्या वर्गाचा भारत दिसतो. पेठे यांच्या विचारसरणीप्रमाणे आम जनतेला 'विकासासाठी विकास' नको आहे, तर ज्यामुळे त्यांच्या जीवनाच्या गुणवत्तेत निश्चित सुधारणा होईल असे समाजपरिवर्तन हवे आहे. तसेच केवळ 'कुटुंब-नियोजनासाठी कुटुंब नियोजन' नको आहे, तर मुले कमी असली तर सर्व कुटुंबाला आर्थिक चिंता राहणार नाही अशा तऱ्हेच्या सामाजिक सुरक्षिततेची हमी हवी आहे.

व्यक्तिगत पातळीवर याचा अर्थ असा की शिक्षण, बालमृत्यूत घट, रोजगाराचा हक्क, पुरेसे वेतन व वृद्धापकाळाची सोय या गोष्टींची आवश्यकता आहे. सामाजिक स्तरावर स्वच्छ प्रशासन, उत्पादन साधनसामग्रीबाबत समता आणि नैतिक मूल्यांवर आधारित राजकीय जीवन यांची गरज आहे. सामाजिक क्रांतीची हीच खरी दृश्य फलिते असतात.

### झाले मात्र विडंबन

सरकारने म. गांधींच्या सर्वोदय व अंत्योदय या तत्त्वांवर आधारित कल्याणकारी राज्य निर्माण करण्याच्या घोषणा केल्या. परंतु इंग्रज तत्त्वज्ञ वेन्थॅम याच्या 'सर्वाधिक लोकांसाठी सर्वाधिक हित' या कल्पनेप्रतसुद्धा आपण पोहोचू शकलो नाही. प्रत्यक्षात कमीतकमी लोकांचा जास्तीतजास्त फायदा असे विडंबन मात्र झाले. आइनस्टाइन, मार्टिन ल्यूथर किंग, गुन्नर मिरडाल, एरिकसन, शुमाकर, इ. विश्वविख्यात विचारवंतांनी म. गांधींच्या तत्त्वज्ञानाची प्रशंसा केली. पण भारताने मात्र याकडे दुर्लक्ष केले, प्रसंगी उपहासही केला.

पाश्चात्त्य विचारसरणीचा आणखी एक अविभाज्य भाग म्हणजे नवमाल्थसवाद. यावर तुफान हल्ला करून डॉ. पेठे यांनी माल्थसवादाचे भूत गाडून टाकण्याचा प्रयत्न केला आहे. लोकसंख्या नेहमी साधनसामुग्रीपेक्षा अधिक वेगाने वाढते, त्यामुळे लोकसंख्याधिक्य होऊन सर्वत्र दैन्य व दुःस्थिती यांचे साम्राज्य पसरते असे नवमाल्थसवाद मानतो. भारतातील बहुधा सर्वच लोकसंख्याशास्त्रज्ञ व विचारवंत हा सिद्धांत भाविकपणे मान्य करतात. यामुळे जनतेपुढे लोकसंख्या व गरिबी या जुळ्या प्रश्नांचे स्वरूप 'अतिरिक्त लोकसंख्या', 'पॉप्युलेशन क्रायसिस', पॉप्युलेशन बॉंब', 'लोकसंख्या विस्फोट' अशा अतिरंजित व सर्वस्वी अशास्त्रीय भाषेत उभे केले गेले. पण पेठे यांनी सप्रमाण असे दाखवून दिले आहे की, या नवमाल्थसवादी विचारात काहीच अर्थ नाही. आजवरच्या मानवी इतिहासात हे अगदी स्पष्ट दिसते की, लोकसंख्या कमी असो किंवा जास्त असो, शोषित सामान्य लोक नेहमीच दरिद्रीनारायण राहिले आहेत. गुलामगिरीच्या समाजरचनेत गुलाम, सरंजामशाहीत भूदास आणि सध्याच्या भांडवलशाही युगात शेतमजूर, आदिवासी व झोपडपट्टीत राहणारी आम जनता, हे नेहमीच दारिद्र्यरेषेखाली खितपत पडलेले आहेत.

### निराळा प्रकाश

आपलेच उदाहरण घेऊ. १९२१ पूर्वी भारताची लोकसंख्या फक्त २५ कोटी होती. आज ती ८० कोटी आहे. पण दरडोई उत्पन्न आज १९२१ च्या मानाने कितीतरी अधिक आहे. ते १२ पटीने वाढले आहे. हे कसे? म्हणून लोकसंख्या दारिद्र्याचे कारण असते हा युक्तिवाद वास्तवाला धरून नाही. उलट दारिद्र्यामुळे बालमृत्यूप्रमाण वाढते. नोकरी व मिळकत यांची शाश्वती नसते म्हणून अधिक मुले असावीत अशी मनोधारणा होते. तेव्हा दुष्टचक्राच्या साखळीमधील दुवे लोकसंख्येमुळे दारिद्र्य व त्यामुळे सामाजिक अधोगती असा क्रमाने नसतात. खरे तर ते सामाजिक पुनर्रचना, त्यामुळे आर्थिक विकास व नंतर वाजवी लोकसंख्या अशा क्रमाने असतात. या संदर्भात गरिबी व आर्थिक मागासलेपणा याची कारणे लोकसंख्या प्रश्नापलीकडे शोधणे अपरिहार्य ठरते. ह्या कारणांचा शोध घेऊन पेठे गरिबी व लोकसंख्या या घटकाच्या कार्यकारण संबंधावर अगदी निराळा प्रकाश टाकतात.

उदाहरणार्थ पेठे, विकसित राष्ट्रातील वेड्यापिशा भोगवादाची लोकसंख्या - गरिबी या समीकरणाच्या संदर्भात मोठ्या प्रभावीपणे चिरफाड करतात. अमेरिकन माणूस जगाच्या सरासरीच्या सुमारे १०० पट अधिक ऊर्जा वापरतो, म्हणून अमेरिकेची लोकसंख्या २५ कोटी नसून २५०० कोटी म्हटले तर त्यात वावगे काय? लोकसंख्या 'दरडोई एक' याप्रमाणे मोजणे हे पाटीवरली गणित आहे. पण अखिल मानवाच्या कल्याणाच्या पाटीवर माणसाची मोजणी उपभोक्ता एकांकावरुन (कन्झ्युमर युनिटस्) करणेच योग्य आहे, विख्यात अमेरिकन ग्रंथकार जेरेमी रिफिकिन् याने एन्ट्रॉपी या पुस्तकात हेच तर्कशास्त्र वापरले आहे. भारतात नव्याने श्रीमंत होत असलेला वर्ग, भारतासारख्या गरीब देशाला न परवडणाऱ्या, आपल्या संस्कृतीला न शोभणाऱ्या व किळसवाणे प्रदर्शन करणाऱ्या भोगवादाचे अंधानुकरण करीत आहे ही दुर्दैवाची गोष्ट आहे.

अवास्तव उपभोग याबरोबर वाढती विषमता बहुदेशीय कंपन्या व बडे कारखानदार यांच्या हाती एकवटलेली धनशक्ती, लष्करावर होणारा अमाप खर्च, सदोष अर्थयोजना, आणि सरकारी खात्यांत होणारी पैशाची उधळपट्टी यावरून भारतातील व साऱ्या जगातील गरिबीचे मूळ लोकसंख्येशिवाय अन्य कोठेतरी दूषित समाजरचनेत व मानवाच्या अनिष्ट






प्रवृत्तींमध्ये खोलवर रुजले आहे हे सिद्ध होते.

दारिद्र्याचे मूळ लोकसंख्येत नाही हे खरे, तर नेते आणि शासन अशा प्रकारचा युक्तिवाद नेहमी का करतात? पेठे यांच्या मते याचे उत्तर सरळ आहे. आपल्या नाकर्तेपणावर व अपयशावर पांघरूण घालण्यासाठी पुढारी मंडळी लोकसंख्या विस्फोटाचा बागुलबुवा निर्माण करतात व लोकांची दिशाभूल करण्याचा प्रयत्न करतात. दुर्दैव हे की सत्य हाच ज्यांचा धर्म असावा, असे विचारवंतसुद्धा आपल्या करिअरसाठी यात सहभागी होतात!

## गैरसमजांची शक्यता

पेठे यांची विचारप्रणाली पाहिली की त्यांच्याबद्दल काही गैरसमज होण्याची शक्यता वाटते. परंतु त्यांच्या लेखनाचा सखोल अभ्यास केला तर असे स्पष्ट दिसते, की ते पाश्चिमात्त्य संकल्पना व प्रतिमाने यावर ते कडाडून टीका करीत असले तरी ती टीका पाश्चिमात्त्य समाज व संस्कृती यावर नाही. ती प्रतिमानांवर आहे. ही टीका जेथे या संकल्पना गैरलागू आहेत अशा भारतासारख्या देशासाठी वापरणाऱ्या शासन व विचारवंत यांच्यावर आहे. याचप्रमाणे पेठे लोकसंख्येची वाढ ही एक गंभीर समस्या आहे व त्यासाठी कुटुंबनियोजन केले पाहिजे, या गोष्टी मानीत नाहीत असे वर वर वाटण्याचा संभव आहे. पण असा कोणाचा गैरसमज झाला तर तो सत्यापासून फारच दूरचा ठरेल. पेठे यांचे म्हणणे असे आहे की आपण लोकसंख्या व गरिबी या प्रश्नाचे आकलन आपल्या परिस्थितीच्या संदर्भात बरोबर करून लोकसंख्येची वाढ जरूर कमी केली पाहिजे. या समस्येस राष्ट्रीय कार्यक्रमात अग्रक्रम दिला पाहिजे. कुटुंबनियोजनाची मोहीम हा केवळ शासनाचा कार्यक्रम न राहता जनतेची मोहीम कशी होईल हे पाहिले पाहिजे. परंतु दुर्दैवाने शासनाचे यासंबंधीचे आकलन व धोरणे चुकीच्या मार्गाने, किंबहुना विपर्यस्त मार्गाने गेली आहेत. म्हणून पेठे यांनी शासनावर टीकेचे सतत, विशेषतः आणीबाणीच्या काळात व त्यानंतर परखडपणे प्रहार केले आणि आपले पर्यायी विचार व धोरणनीती सादर केली.

पेठे यांच्या वैचारिक भूमिकेनुसार लोकसंख्या-नियंत्रण व दारिद्र्यनिर्मूलन यासाठी कोणती धोरण-नीती अवलंबिली पाहिजे?

स्वातंत्र्यानंतरच्या काळात गेली ४० वर्षे सरकारने लोकसंख्या व गरिबी या संबंधात अनेक प्रयोग केले, अनेक कार्यक्रम राबविले. यात काहीसे यश आले, परंतु बरेचसे अपयशच पदरात पडले. विविध योजनांना गतिमानता व परिणामकारकता कधीही प्राप्त झाली नाही, अशा तऱ्हेचे मूल्यमापन विविध अहवालांतून आढळते. शासनालाही ते मान्य आहे. याचे प्रमुख कारण हे की लोकसंख्येसंबंधीचा कार्यक्रम व गरिबी उच्चाटनाचा कार्यक्रम हे फुटकळ स्वरूपात व अलगपणे राबविले गेले. हे पाश्चिमात्त्य संकल्पनेशी सुसंगत पण वास्तवाशी विसंगत होते. त्याचा हा दुष्परिणाम!

पेठे यांच्या धोरणनीतीत प्रमुख तत्त्वे आहेत. पहिले तत्त्व हे की शासनाच्या सर्व योजनांचा व धोरणांचा केंद्रबिंदू शांततामय क्रांती हा राहिला पाहिजे. या दृष्टिकोनातून लोकसंख्यानियंत्रण व दारिद्र्यनिर्मूलन यासंबंधीची धोरणे यांची एकमेकांशी सांगड घालून ती मूलभूत सामाजिक क्रांतीची अतूट अशी अंगे-उपांगे आहेत असे मानले पाहिजे आणि यानुसारच त्यांची कार्यवाही झाली पाहिजे. दुसरे, आर्थिक विकास व सामाजिक प्रगती यासंबंधीच्या संख्यात्मक इष्टांकांच्या (टारगेट्सच्या) फार मागे न लागता, गुणात्मक परिवर्तनाकडे संपूर्ण लक्ष केंद्रित केले पाहिजे. सम्राट नीरो रोम आगीत भस्मसात होत असताना आपल्या राज्यप्रासादात फिडल वाजवीत बसला होता. तद्वत देशात अनेकांना दोन वेळच्या जेवणाची भ्रांत असताना योजनाकार आणि विद्वान वातानुकुलित चेंबर्समध्ये बसून राष्ट्रीय उत्पन्नाच्या वाढीचा दर शे. ५ असावा की ८ यावर चर्चा करीत असतात. तिसरे, जनमानसात सुखी जीवनासंबंधी 'अपेक्षांचा विस्फोट' (एक्स्प्लोजन ऑफ एक्स्पेक्टेशन्स) झाला आहे. मर्यादित आणि संपणाऱ्या ऊर्जा व साधनसंपत्ती ह्या आजच्या युगाच्या पार्श्वभूमीवर सर्वच्या सर्व अपेक्षा संपूर्णपणे पूर्ण करणे केवळ अशक्य आहे. म्हणून अपेक्षांच्या विस्फोटाला योग्य वळण लावणे निकडीचे आहे. हे वळण गुणात्मक जीवनाप्रत नेले पाहिजे, ऐशारामी जीवनाप्रत नव्हे. उदाहरणार्थ, व्ही.सी.आर. आणि फ्रीज यांपेक्षा शिक्षण महत्त्वाचे हे सर्वांना पटवून दिले पाहिजे. भारतीय संस्कृतीचा वारसा असलेल्या या समाजाला हे अशक्य नसावे.

## सुवर्णयुग अवतरेल, पण

लोकसंख्या व गरिबी यासंबंधी नीती ठरविताना

अनुक्रमणिका






आणखी एका वास्तवाला आपण समर्थपणे सामोरे गेले पाहिजे. लोकसंख्यानियंत्रणाचा आपण कितीही व कसाही प्रयत्न केला तरी इ.स. २००० मध्ये आपली लोकसंख्या सुमारे १०० कोटी इतकी होणार आहे, हे मान्य केले पाहिजे. यासंबंधी आरडाओरडा किंवा छाती बडवून कांहीही साध्य होणार नाही. आज भारतात मनुष्यबळ ही एक सुप्त स्वरुपातली अत्यंत मौल्यवान अशी साधनसंपत्ती आहे. याकडे बोजा म्हणून न पाहता, जमेची बाजू म्हणून पाहिले पाहिजे. मानवात गुणात्मक गुंतवणूक ही प्रगतीची गुरुकिल्ली आहे. अर्थशास्त्रीय इतिहासाने हे सिद्ध केले आहे, की माणसात केलेली गुंतवणुक ही भांडवली गुंतवणुकीपेक्षा विकासाला अधिक सहायक ठरते. म्हणून भारतात शिक्षण व आरोग्य हा एककलमी कार्यक्रम जरी यशस्वीपणे कार्यान्वित केला तरी पूर्वी कधीही अनुभवले नाही असे सुवर्णयुग या देशात अवतरेल.

पेठे यांच्या वरील धोरणनीती-विषयक तत्त्वज्ञानातून प्रत्यक्ष आघाडीवरील कार्यक्रम आपोआपच साकार होतात.

लोकसंख्यावाढीचे प्रमाण कमी करण्यासाठी कुटुंबनियोजन कार्यक्रम महत्त्वाचा आहे हे खरेच. पण त्याहीपेक्षा महत्त्वाचा कार्यक्रम म्हणजे विवाहाचे वय वाढविणे आणि दोन मुलांमध्ये अधिक अंतर ठेवणे. अनेकांना एक ऐतिहासिक अनुभव माहीत नाही. पाश्चिमात्त्य देशात संततीनियमनाच्या साधनांच्या वापरापेक्षा विवाहवय वाढल्या-मुळे अधिक प्रमाणात जननप्रमाण कमी झाले. माल्थसने विवाह वयावर भर दिला. माल्थसवाद्यांनी मात्र संतति-नियमनाच्या साधनांवर अधिक भर दिला. माल्थसवाद्यांपेक्षा माल्थसच जास्त बरोबर होता हे इतिहासाने दाखवून दिले.

आतापर्यंत शासनाने कुटुंबनियोजनाची उद्दिष्टे (टारगेटस्) पूर्ण करण्यासंबंधी फाजील महत्त्व दिले, शासनाला जणू काही उद्दिष्ट-शूळ (टारगेटायटिस) हा रोगच झाला आहे. विकास हेच उत्तम संतति-नियमनाचे साधन आहे असे एका बाजूने म्हटले जाते. परंतु प्रत्यक्षात त्याकडे पूर्ण दुर्लक्ष होते आणि कुटुंबनियोजनाचा घोषा चालू राहतो. कुटुंब-नियोजनाच्या पुजाऱ्यांना ही गोष्ट माहीत नाही की त्यासाठी माणसामध्ये आंतरिक प्रेरणा निर्माण व्हावी लागते. ही प्रेरणा शून्यातून निर्माण होत नाही की आकाशातून पडत नाही. मानवी वर्तणुकीत योग्य असे परिवर्तन घडण्यासाठी काही क्रिया-प्रक्रिया व्हाव्या लागतात. मानवी वागणूक ही एकीकडे त्याच्या अनुवंशिक ठेव्यावर व दुसऱ्या बाजूने परिसर व सामाजिक परिस्थितीवर अवलंबून असते. आपणाला व्यक्तीने कुटुंबनियोजन अवलंबावे असे वाटत असेल तर प्रथम आपण त्यासाठी लागणाऱ्या प्रेरणेला योग्य अशी परिस्थिती निर्माण केली पाहिजे. या परिस्थितीचे मुख्य घटक बालमृत्यू कमी करणे, महिलांचे शिक्षण, रोजगार, कुटुंबाला पुरणारे वेतन आणि आजार, अपघात, वृद्धापकाळ इ. संकटकाळांसाठी सामाजिक सुरक्षा हे आहेत. म्हणून ही आर्थिक व सामाजिक उद्दिष्टे पूर्ण करण्याला प्रथमक्रम द्यावयास पाहिजे. यामुळे दारिद्र्य नष्ट होईल, माणसाला 'माणूस' म्हणून मानाने जगता येईल, एवढेच नव्हे तर जनन-दरही कमी होईल. सध्या संततिनियमनाचे कार्यकर्ते लोकांच्या मागे लागले आहेत. गरीबाला 'तू शेअर्समध्ये गुंतवणूक का करत नाहीस?' हे विचारणे जितके मूर्खपणाचे, तितकेच ज्याची मुले जगण्याची शाश्वती नाही अशा शेतमजुराला 'तू संततिनियमन का करीत नाहीस?' असे विचारणे तितकेच मूढतेचे लक्षण आहे. सुशिक्षित वर्ग संततिनियमन करतो तो काही 'देशात लोकसंख्या-विस्फोट झाला आहे म्हणून आपल्याला दोन मुले पुरेत' या 'राष्ट्रप्रेमामुळे' नव्हे, तर त्यांना लहान कुटुंब असणे यातच त्यांचा फायदा असतो. गरिबांना एकच मूल असणे परवडण्यासारखे नाही. एका संशोधनानुसार एखाद्या व्यक्तीला ६५ वयात एक जिवंत मुलगा पाहिजे असेल तर त्याला ६-७ इतकी मुले व्हावी लागतात. इतके बालमृत्यूचे मोठे प्रमाण खेड्यापाड्यातून असते.

### सदोष विभागणी

आजपर्यंत आपल्या देशातील कुटुंबनियोजन कार्यक्रमावर कोट्यवधी रुपये खर्च झाले, परंतु त्याची विभागणी सदोष झाली. त्यामुळे त्यात हवे तितके यश आले नाही. कुटुंब नियोजनाच्या प्रसाराचे व वापराचे जाळे सर्वत्र व सर्व जनतेत टाकले. त्यामुळे पैसे आणि श्रम या दोघांचाही प्रचंड प्रमाणात अपव्यय झाला. पेठे यांचे म्हणणे असे आहे की, जेथे कुटुंबनियोजनासाठी प्रेरणा (मोटिव्हेशन) मुळातच अस्तित्वात आहे किंवा तशी प्रेरणा निर्माण करायला अनुकूल परिस्थिती आहे अशा जनता-समूहातच कुटुंबनियोजनाच्या प्रसारासाठी पैसे प्रथम खर्च करावयास हवे होते. उदा. असे गट म्हणजे विशेषत: शहरातील संघटित कामगारवर्ग, शिक्षक,







अनुक्रमणिका

झोपडपट्टीत राहणारे सुशिक्षित व त्यातल्या त्यात आर्थिक परिस्थिती बरी असणारी कुटुंबे इ. म्हणून खेड्यापाड्यापेक्षा शहरी विभागात कुटुंबनियोजन प्रसाराचे कार्य प्रथम केंद्रित करून मग हळूहळू ते निम-शहरी भागात, नंतर खेडोपाडी पसरावे अशा तऱ्हेची व्यूहरचना करावयास पाहिजे होती. अजूनही असे केले तर या कार्यक्रमाला खर्चाच्या मानाने अधिक यश येईल. तसे पाहिले तर स्थलांतरामुळे लोकसंख्येचा प्रश्न मोठ्या शहरांत निर्माण झाला आहे. तर गरिबीचा प्रश्न खेडोपाडी आहे. म्हणून गरिबीचे उच्चाटन खेड्यातून प्रथम करून अन्वये कुटुंबनियोजनाच्या प्रेरणेचा मार्ग मोकळा करून दिला पाहिजे.

### बोलणे एक, कृती वेगळी

आज आपण मूल्याधारित सामाजिक जीवनाबद्दल बोलतो, पण प्रत्यक्ष कृती मात्र करीत नाही. कुटुंबनियोजन ही 'जनतेची मोहीम' व्हावयाची असेल तर त्यासाठी प्रथम सर्व क्षेत्रातील नेतेमंडळींनी आदर्श घालून देणे आवश्यक आहे. खासदार, आमदार, जिल्हापरिषद, नगरपालिका व ग्राम-पंचायती यामध्ये निवडून गेलेले लोकप्रतिनिधी, सहकारी संस्थांमधून निवडून आलेले सदस्य, तसेच शासनातील अधिकारी, शिक्षक, प्राध्यापक अशा सर्व स्तरावरील नेतृत्व करणाऱ्यांनी संततिनियमन करून एक किंवा दोन मुलांचे मर्यादित कुटुंब असा जनतेला आदर्श घालून दिला पाहिजे. तरच नेत्यांना आम जनतेला कुटुंबनियोजन करण्यासंबंधीचा उपदेश करण्याचा नैतिक अधिकार लाभेल. सक्तीपेक्षा आदर्श घालून देणे हा जनजागृतीचा प्रभावी मार्ग आहे.

सारांशरूपाने सांगायचे झाले तर, पेठे यांचे लोकसंख्या व गरिबी या समस्येवरील वैचारिक मतप्रदर्शन चार प्रकारचे आहे - प्रथम, पेठे हे नवमाल्थसवादासह पाश्चिमात्य प्रतिमानांचे परखड टीकाकार आहेत. त्यांनी ही प्रतिमाने भारताच्या संदर्भात कालबाह्य, चुकीची व विपर्यस्त आहेत हे सप्रमाण सिद्ध केले आहे. दुसरे, ते एका नवीन विचारसरणीचे प्रवर्तक आणि प्रणेते आहेत. सामाजिक प्रक्रियेतील कार्यकारणभावातील दुवे लोकसंख्यावाढ म्हणून गरिबी आणि शिथिलता व परागती असे नसून सामाजिक परिवर्तनातून आर्थिक विकास व सहजसुलभ लोकसंख्या-नियंत्रण असे आहेत, असे त्यांनी दाखवून दिले आहे. म्हणूनच सामाजिक क्रांती हा केंद्रबिंदू समजून कुटुंबनियोजन उद्दिष्टांच्या संदर्भात आर्थिक-सामाजिक उद्दिष्टांना अग्रक्रम देणे महत्त्वाचे आहे. कुटुंबनियोजनाची उद्दिष्टे मग सहजसाध्य होतील असे त्यांचे प्रतिपादन आहे. तिसरे, लोकसंख्याशास्त्राच्या साहित्यात प्रथमच एक संपूर्ण ग्रंथ लिहून सक्तीच्या कुटुंबनियोजनाने लहान कुटुंब या मोहिमेची प्रगती होण्याऐवजी हानीच होईल हे त्यांनी दाखवून दिले आहे. शेवटी, लोकसंख्या व गरिबी यांचे विश्लेषण अशा आंतरशास्त्रीय दृष्टिकोनातून केले पाहिजे या विचारांचे प्रत्यक्ष सवरूप त्याच्या संशोधनातून प्रकर्षाने प्रतीत होते. याही विचाराचे त्यांनी नेतृत्व केले आहे.

☑☑

## अभिनव व विधायक विचारांपेक्षा गोंधळच फार !

### सुनील जोगळेकर

दि. ३० सप्टेंबरच्या 'मैफल' पुरवणीत डॉ. वसंत पेठे यांच्या विचारांचा परिचय करून देणारा डॉ. शेजवलकर यांचा लेख वाचला. मात्र प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे त्यांचे 'अभिनव व विधायक' विचार न जाणवता जरासा वैचारिक गोंधळच दिसला.

### नवे असे काय आहे?

पेठे यांच्या विचारात संपूर्ण नवे असे काहीच आढळत नाही. माल्थसवाद (किंवा नवमाल्थसवाद) खोडून काढणारे लोकसंख्याशास्त्रज्ञ अनेक (खरे तर बहुसंख्य) आहेत. किंबहुना टीकेची झोड उठवायला माल्थसवाद हा एक नित्याचा असा विषय आहे. डेकार्टची रिडक्शनिस्ट विचारसरणी किंवा डार्विनचा नॅचरल सिलेक्शनचा सिद्धांत जसे खोडून काढण्याचे ठराविक विषय झाले आहेत तसाच आहे लोकसंख्याशास्त्रातील माल्थसवाद!

खरे तर, माल्थसनी अगदी साधा विचार मांडला. लोकसंख्या भूमिती श्रेणीने वाढते; अन्नधान्य वगैरे तेवढ्या प्रमाणात वाढत नाही. त्यामुळे त्यांचा तुटवडा पडतो. रोगराई, युद्ध, उपासमार यामुळे लोकसंख्या नियंत्रणात ठेवली जाते. असा साधारण विचार थॉमस माल्थसनी १७९८ साली मांडला. अन्नधान्याचे उत्पादन विज्ञानाच्या मदतीने वाढवता येते किंवा

संततिनियमनाचे कृत्रिम मार्ग यांची माहितीच माल्थसना नव्हती.

लोकसंख्याशास्त्राच्या पलीकडे जाऊन आर्थिक, राजकीय वगैरे दृष्टिकोनांतून या समस्येचा विचार करणाऱ्या प्रक्रियेचे डॉ. पेठे प्रणेते आहेत हे विधान अतिशयोक्त आहे. लेखातच पुढे शूमाखर, गांधी वगैरेंचा उल्लेख आहे. ही मंडळीसुद्धा असा सर्वांगीण विचार करत नव्हती असे शेजवलकरांना म्हणायचे आहे काय?

लोकसंख्याशास्त्राच्या पलीकडे जाण्याच्या नादात पेठे ज़ास्तच पुढे गेले आहेत आणि लोकसंख्याशास्त्र वगळून विचार करत आहेत असे जाणवते. वाढणारी लोकसंख्या हे गरिबीचे एकमेव कारण नसेल; पण गरिबीच्या राजकीय, सामाजिक वगैरे कारणांपैकी ते एक महत्वाचे कारण नक्कीच आहे. १९२१ पासून आजपर्यंत दरडोई उत्पन्न १२ पट वाढल्याचे पेठे सांगतात. ते हास्यास्पद आहे. उत्पन्न वाढलेले दिसते ते रुपयाच्या अवमूल्यनामुळे आणि श्रीमंतीचा दरडोई उत्पन्नातला वाटा वाढल्यामुळे. देशात गरिबी वाढतेय, श्रीमंत-गरिबांमधली दरी रुंदावतेय या बाबत पेठे अनभिज्ञ नसावेत.

नागरी विस्फोट ही समस्या तर लोकसंख्यावाढीमुळे निर्माण झाली आहे. जास्त अपत्ये असल्याने जमिनीची वाटणी होत जाऊन अल्पभूधारकांची संख्या वाढली आहे, ही शेती आतबट्ट्याची झाल्याने लोकांनी शहराकडे धाव घेतली, शहरात कुटुंब नियोजनाचा प्रचार करून शहरातील लोकसंख्या नियंत्रण करता येणार नाही. उद्ध्वस्त होणारी ग्रामीण अर्थव्यवस्था सावरणे हाच त्यावर उपाय असेल.

**अप्रस्तुत उल्लेख**

देशात अनेकांना दोन वेळच्या जेवणाची भ्रांत असताना योजनाकार विद्वान वातानुकुलित चेंबरमध्ये बसून चर्चा करतात, हा उल्लेख अप्रस्तुत आहे. हा वेगळाच विषय आहे आणि त्यावर दोन्ही बाजूंनी विचार मांडणारे आहेत. शिवाय असा आरोप कोणीही दुसऱ्यावर करू शकतो.

पेठे स्वतःची जी धोरणनीती सांगतात ती केवळ शाब्दिक कसरत वाटते. 'शासनाच्या सर्व योजनांचा, धोरणांचा केंद्रबिंदू शांततामय सामाजिक क्रांती हा असला पाहिजे' म्हणजे नेमके काय असले पाहिजे? अपेक्षांच्या विस्फोटाला योग्य वळण कसे लावायचे? ते कोण लावणार? व्ही.सी.आर. फ्रीजपेक्षा शिक्षण महत्वाचे हे लोकांना पटवायचा कोणता मार्ग डॉक्टरांजवळ आहे? ते आजवर कितीजणांना त्यांनी पटवून दिले आहे? कमीतकमी स्वतःला आणि आपल्या कुटुंबियांना त्यांनी व्ही.सी.आर, फ्रिजमुक्त केले आहे का? नसल्यास लोकांना पटविण्याची उठाठेव त्यांनी कशाला करावी? शिक्षण, आरोग्य हा एककलमी कार्यक्रम यशस्वीपणे राबवला तर सुवर्णयुग येईल यात ते विशेष काय सांगतात?

भारतात कुटुंबनियोजन सक्तीचे आहे अशी काहीतरी समजूत डॉ. पेठे यांची झालेली दिसते. कारण लेखात दोन-तीन ठिकाणी 'सक्तीपेक्षा जनजागृती' करायला त्यांनी सांगितले आहे. आणीबाणीचा काळ सोडल्यास भारतात कुटुंबनियोजनाची सक्ती नव्हती आणि नाही. (भविष्यात होण्याची शक्यता नाही कारण राज्यकर्त्यांना मतदारांची संख्या वाढण्यातच रस आहे) आपल्या विचारांना प्रसिद्धी देण्यापूर्वी एवढी सामान्य माहिती पेठे यांना किंवा शेजवलकरांना का मिळू शकली नाही, हे कळत नाही

हे सर्व लिहिण्याचा उद्देश शासकीय कार्यक्रमाची भलामण करण्याचा नाही. सरकारी धोरणात, अंमलबजावणीत अनेक त्रुटी आहेत. पण त्या त्रुटींवर नेमके बोट ठेवणे पेठे यांना जमल्याचे लेखात दिसत नाही. सरकारी धोरणावर आणि पाश्चात्त्यांच्या विचारसरणीवर टीका करण्याचे त्यांनी पक्के ठरविलेले दिसते. त्यामुळे ते एकीकडे वातानुकूलित चेंबरमधल्या विद्वानांवर उखडतात तर दुसरीकडे कबरीत शांत पडलेल्या जीर्ण माल्थसला बाहेर काढून झोडपतात!

☑☑

## अपेक्षांचा विस्फोट वगैरे

### डॉ० वसंत पेठे

गरिबी व लोकसंख्या या जुळ्या प्रश्नावरील माझ्या विचारसरणीसंबंधीचा डॉ प्र. चिं. शेजवलकर यांचा लेख महाराष्ट्र टाइम्सच्या ३० सप्टेंबरच्या अंकात प्रसिद्ध झाला. त्यावर सुनील जोगळेकर यांनी लिहिलेला टीकात्मक लेख मी वाचला. (१४ ऑक्टोबर).

लोकसंख्या, गरिबी आणि अपेक्षांचा स्फोट याबद्दल विवेचन करताना डॉ. शेजवलकरांनी लिहिले होते की, " डॉ.

पेठे यांच्या मते अपेक्षांच्या विस्फोटाला योग्य वळण लावणे निकडीचे आहे. हे वळण गुणात्मक जीवनाप्रत नेले पाहिजे, ऐषारामी जीवनाप्रत नव्हे. उदा. व्ही. सी. आर. व फ्रिज यापेक्षा शिक्षण महत्त्वाचे हे सर्वांना पटवून दिले पाहिजे." यावर टीका करताना जोगळेकर लिहितात, "डॉ. पेठे यांनी व्ही.सी.आर. व फ्रिजपेक्षा शिक्षण महत्त्वाचे हे आजवर कितीजणांना पटवून दिले आहे?" अगदी वैयक्तिक हल्ला करताना पुढे ते म्हणतात - "कमीतकमी स्वतःला व आपल्या कुटुंबियांना त्यांनी व्ही. सी. आर. आणि फ्रिज मुक्त केले आहे का? नसल्यास लोकांना पटविण्याची उठाठेव त्यांनी कशाला करावी?"

शिक्षण आणि व्ही.सी.आर. यासारख्या चैनीच्या वस्तू यांच्या अग्रक्रमासंबंधी दोन प्रकारे विचार करता येईल. १. वैयक्तिक स्तरावर व २. सामाजिक स्तरावर. ज्यावेळी चैनीच्या वस्तू बाजारात उपलब्ध असतात, त्यावेळी व्यक्तीने आपल्या जीवनाची योजना कशी आखावी? नवकीच शिक्षण, आरोग्य, यासारख्या मानवी गुंतवणुकीत आपली मिळकत प्रथम क्रमाने खर्च करावी असे माझे ठाम मत आहे. प्राध्यापक असल्यामुळे माझ्या अनेक विद्यार्थ्यांना या प्रकारचा सल्ला मी जरूर दिला आहे. ज्यांनी हे केले त्यांचा उत्कर्ष झाला. जोगळेकर यांचा सवाल असा की पेठे स्वतः व त्यांचे कुटुंबीय व्ही.सी.आर. मुक्त नसताना, त्यांनी 'लोका सांगे ब्रह्मज्ञान' ही उठाठेव कशाला करावी?

वाचकांचा संशय राहू नये, म्हणून मी व माझे कुटुंबीय यांच्या दृष्टिकोनाबद्दलची वस्तुस्थिती येथे सादर करीत आहे. आमच्या कुटुंबात माझ्या आईवडिलांनी आम्हा भावंडांच्या शिक्षणाचे जणू व्रत घेतले होते. यासाठी जरूर तेव्हा आईने स्वतःचे दागिनेसुद्धा विकले. माझ्या स्वतःच्या शिक्षणाला मी मिळवलेल्या स्कॉलरशिप्स व फेलोशिप्स यांनी खूप हातभार लावला. प्रसंगी कर्जही काढले. नोकरीनंतर चैनीच्या वस्तू खरेदी करण्यामागे न लागता पीएच.डी. व प्रिन्स्टन-हारवर्ड येथे पदव्युत्तर शिक्षण घेतले. मला तीन मुली आहेत. त्या काळी तीन अपत्ये हा इष्टांक समजण्यात येई. 'मुली' म्हणून त्यांच्या शिक्षणाबद्दल दुर्लक्ष केले नाही. नातेवाईक, शेजारीपाजारी, मुली म्हणजे लग्न केव्हा असा सतत घोषा करीत असताना आम्ही सर्वांनी 'प्रथम शिक्षण व मग इतर गोष्टी' हे ध्येय ठेवून जीवनाचे नियोजन केले. माझ्या दोन मुली एम.डी. आहेत. त्यांतील एक बोर्डाच्या परीक्षेत सर्वात चौथी व मुलींमध्ये दुसरी आली होती. तिसरी मुलगी एम.फील. झाली व आता ती सी.एस.आय.आर. च्या फेलोशिपवर केमिस्ट्री विषयात पीएचडी करीत आहे. आता या विषयाची सामाजिक बाजू पाहू. जोगळेकर म्हणतात, त्याप्रमाणे 'आधी केले मग सांगितले' हे तत्त्व नैतिक मूल्यांच्या बाबतीत खरे असेल. पण शास्त्रीय सिद्धांत मांडताना वैयक्तिक आचरण हे अप्रस्तुत असते. आर्थिक प्रगतीसाठी शिक्षण, आरोग्य, यासारखी मानवातील गुंतवणूक भांडवली गुंतवणुकीपेक्षाही अधिक प्रभावी असते हा एक ऐतिहासिक पुराव्यावर आधारलेला सिद्धांत आहे. आपल्या आर्थिक नियोजनकारांनी आजपर्यंत भांडवलशाही समाजरचनेला पूरक अशा उच्चभ्रू पराङ्मुखी उत्पादनाला (एलिथओरिएन्टेड प्रॉडक्शनला) महत्त्व दिले, मानवातील गुंतवणुकीला, तसेच आम जनतेला लागणाऱ्या वस्तूंच्या उत्पादनाला (मास प्रॉडक्शनला) नव्हे. तुलनेने आपला देश गरीब व अल्पविकसित आहे. म्हणून फ्रिज, वॉशिंग मशीन, व्ही.सी.आर. यांसारख्या केवळ श्रीमंतांना परवडणाऱ्या विलासी, शोभेच्या व चैनीच्या वस्तूंचे उत्पादन म्हणजे मर्यादित साधनसामग्रीचा अयोग्य उपयोग असेच म्हणावे लागेल, यापेक्षा शाळा, दवाखाने, इत्यादींवर खर्च करणे अंतिमदृष्ट्या अधिक फलदायी होईल.

काही वस्तू सकृतदर्शनी चैनीच्या वाटल्या तरी त्यांचा उपयोग आर्थिक सामाजिक प्रगतीसाठी चांगल्या प्रकारे करून घेता येईल. उदा. रेडिओ व टीव्ही. या वस्तू अर्थशास्त्रात विलासी वस्तू म्हणून मानल्या जातात. पण यांचा वापर शिक्षण, आरोग्य, कुटुंबनियोजन यासारख्या आधुनिकतेच्या व शास्त्रीय दृष्टिकोनाच्या प्रसार-प्रबोधनासाठी केला तर ती एक राष्ट्रीय स्तरावर महत्त्वाची मानवी गुंतवणूक होईल. पण यांचा उपयोग विलासी वस्तूंच्या उपभोगासाठीच्या अपेक्षांच्या विस्फोटात झाला तर मात्र ते कल्याणकारी सामाजिक परवर्तनाला व आर्थिक प्रगतीला मारकच ठरेल. आजचे टीव्ही वरील कार्यक्रम व झगमगाटी - चमचमणाऱ्या जाहिराती बव्हंशी अशा प्रकारच्या अपेक्षाविस्फोटाप्रत नेणाऱ्या आहेत. थोडक्यात, या देशाची आर्थिक व सामाजिक धोरणनीती शिक्षण व आरोग्य या मानवी भांडवलात वृद्धी करणारी असावी. विपरित अपेक्षा-विस्फोट निर्माण करणारी वा त्याला प्रोत्साहन देणारी नसावी.





अनुक्रमणिका

# हस्तिदंती मनोऱ्यातून गरिबीची पाहणी!

अनिल महेन्द्र

'सरकारचे गरिबी-निर्मूलनाचे धोरण सर्वथा चुकीचे' या डॉ. वसंत पेठे (म.टा. १६ ऑक्टोबर) लेखामुळे काही नवेच मुद्दे चर्चेसाठी उपस्थित झाले आहेत. मुळात लेखकाने गरिबीची व्याख्याही केली नाही की गेल्या पन्नास वर्षांतील तुलनात्मक चित्र रेखाटून आपला मुद्दा सिद्ध केलेला नाही. फक्त गरिबी नष्ट करण्यात सरकारला (कोणत्या?) अपयश आले आहे, या गृहीतावर त्यांचे सारे विवेचन आधारलेले आहे. गरिबी हटवण्यासाठी सरकारने कोणत्या योजना हाती घेतल्या, त्या योजना वा त्यांची अंमलवजावणी यात कोणत्या चुका झाल्या, याचे साधार-सोदाहरण स्पष्टीकरण त्यांनी करावयाला हवे होते.

गरिबी ही आपल्या देशापुढील प्रमुख व ज्वलंत समस्या आहे, याचा साक्षात्कारच मुळी राज्यकर्त्या पक्षाला स्वातंत्र्यानंतर २५ वर्षांनी झाला. १९७२ साली इंदिरा गांधींनी 'गरिबी हटाओ'चा नारा दिला. तो खूप प्रभावी ठरला व त्याच्या जोरावर त्यांनी निवडणुकांत अभूतपूर्व यशही मिळविले. पण गरिबी हटाओ या घोषणेने त्यांनी अप्रत्यक्षपणे दोन गोष्टींची कबुली दिली. एक गरिबी हा देशापुढील सर्वात मोठा प्रश्न आहे ही आणि दुसरी म्हणजे स्वातंत्र्याच्या २५ वर्षांतही देशातील गरिबी दूर करण्यात त्यांच्या पक्षाला यश मिळाले नव्हते ही... त्यानंतर मग या घोषणेचा पाठपुरावा करण्यासाठी वीस कलमी कार्यक्रम वगैरे प्रकार पुढे आले. या कार्यक्रमाची मोडकी-तोडकी अंमलबजावणी झाली तरी पुढील २५ वर्षांतही देशाची गरिबी दूर झाली नाही.

गरिबी नष्ट न होण्याच्या अनेक कारणांपैकी एक कारण असे की, मुळात कोणत्याही व मुख्यत: डाव्या राजकीय पक्षांना देशातील सर्वसामान्य माणसाची गरिबी दूर व्हावी, असे मनापासून कधी वाटलेच नाही. या पक्षांनी विकासक्षम आर्थिक कार्यक्रमांना सतत विरोध केला. अवास्तव व देशाला न परवडणारे कामगारविषयक कायदे केले. चुकीची आर्थिक धोरणे राबवून देश कायम गरीब राहील याचीच काळजी घेतली. या अशा धोरणांमुळे समाजातील संघटित वर्गाने हावरटपणे आर्थिक विकासाचे सारे लाभ ओरबाडून घेतले व असंघटित मजूर आणि शेतमजूर मात्र अर्धपोटीच राहिला. आजही परिस्थिती काय आहे?

समान शारीरिक व बौद्धिक क्षमता असणाऱ्या मुंबईतील अकुशल सफाई कामगारांना (त्यांच्या संघशक्तीच्या बळावर) एका महिन्यात जितका पैसा मिळतो, तितका खेड्यातील शेतमजुराला वर्षभर उन्हातान्हात मेहनत करूनही मिळत नाही. संघटित कामगारवर्ग गेल्या पन्नास वर्षांत गरीब राहिला, असे म्हणणे हास्यास्पद ठरेल. उलट त्याच्या अधाशी व हावरट आणि स्वार्थी वृत्तीने शेतीवर उपजीविका करणाऱ्या कोट्यवधी लोकांना उपासमार घडविली. ही प्रचंड विषमता निर्माण करण्यात सर्वच राजकीय पक्षांनी हातभार लावलेला आहे, हे नाकारता येतन नाही.

'बेकारी व गरिबी नष्ट करण्यासाठी लघुउद्योगांना प्रोत्साहन द्या' ही जुनीच घोषणा लेखकाने पुन्हा एकवार दिली आहे. अशी सवंग घोषणा करताना लेखकाने या प्रश्नाचा खरोखरच गंभीरपणे विचार केला आहे काय, याची शंका येते. गेली ३०-३५ वर्षे लघुउद्योगांना प्रोत्साहन देण्याचे फलित काय आहे? आज ७५ टक्के लघुउद्योग आजारी तरी पडले आहेत किंवा बंद तरी पडले आहेत. अर्थसंस्थांनी त्यांना सुलभ अटींवर दिलेली कोट्यवधी रुपयांची कर्जे बुडाली आहेत. लघु उद्योगाविषयीचे हे धोरण का फसले, याची चिकित्सा करावयास हवी. फार थोडे उद्योग स्वतःच्या पायावर उभे राहू शकतात. बहुतेक लघुउद्योगांना - वेलींना वृक्षाचा आधार लागतो तसाच आपल्या अस्तित्वासाठी मोठ्या उद्योगांचा आधार हवाच असतो. ज्या ठिकाणी मोठ्या उद्योगांना पूरक उद्योग म्हणून लघुउद्योगांना आधार मिळाला, त्या ठिकाणी ते कसेबसे टिकून आहेत. कसेबसे म्हणण्याचे कारण म्हणजे त्यांच्या उत्पादनाचे मूल्य व त्यांना मिळणारा मोबदला हा मोठ्या उद्योगांच्या लहरीवर अवलंबून असतो. त्यातही एखादा मध्यम वा मोठ्या उद्योगाने त्यांच्या क्षेत्रात प्रवेश केला, तर स्पर्धेमध्ये टिकाव न लागल्यामुळे या लघुउद्योगांचे कंबरडेच मोडते.

घरगुती तयार मसाले बनविण्याचा उद्योग हा केवळ लघुच नव्हे तर कुटिरोद्योग आहे. त्या धर्तीवरच त्याला संरक्षण मिळायला हवे होते. पण आता ब्रुकबाँडसारख्या कंपन्या त्यात उतरल्या. आपले नाव, प्रचंड जाहिरात, नखरेबाज वेष्टने यांच्या बळावर त्यांनी या कुटिरोद्योगाची दमछाक करून टाकली.






सर्वांत महत्त्वाचा मुद्दा, देशाच्या वाढत्या लोकसंख्येचा. वाढती लोकसंख्या आणि गरिबी यांचे अगदी जिवाभावाचे अतूट नाते आहे. 'देशात गरीब अधिक गरीब व श्रीमंत अधिक श्रीमंत झाले' ही घोषणा आता झिजूनझिजून बोथट झाली आहे. देशातील गरिबी वाढली आहे, म्हणण्यापेक्षा गरीब वर्गाचे प्रमाण वाढले आहे, असे म्हणणे अधिक सयुक्तिक होईल. हे प्रमाण लोकसंख्येचा प्रमाणात वाढले आहे. याची दखल घ्यायला नको काय? विकास योजनेच्या आर्थिक फायद्यांना प्रचंड वेगाने वाढणारी लोकसंख्या उभाआडवा छेद देऊन अर्थहीन बनवते हे विसरता येईल काय? लोकसंख्येवर परिणामकारक नियंत्रण ठेवले नाही, तर पुढील पन्नास वर्षांनंतरही देशातील दारिद्र्य, अज्ञान, बेकारी, अनारोग्य यांचे अधिकच भीषण व विदारक चित्र पहावयाला मिळेल.

लेखकाला सामाजिक जीवनातील अर्थशास्त्रीय प्रश्नांची जाण नाही, लोकांच्या ज्वलंत समस्येशी त्यांची जराही ओळख नाही. आणि आपल्या हस्तिदंती मनोऱ्यात बसून खिडकीच्या बाहेर जराही डोकावून न पाहता त्यांनी भरमसाठ विधाने ठोकून दिली आहेत, असे दुर्दैवाने म्हणणे भाग आहे.



## गरिबी : चाकोरीबद्ध विरुद्ध नवीन विचारसरणी

### डॉ० वसंत पेठे

माझ्या गरिबी-निर्मूलनावरील लेखासंबंधी श्री. अनिल महेंद्र यांचा टीकात्मक लेख वाचला (म.टा.१६ ऑक्टो., १९ नोव्हें. ) महेंद्र यांचा पहिला आक्षेप असा की मी गरिबीची व्याख्या केली नाही. व्याख्येचा विषय निघाला की मला महान तत्त्वज्ञ हेगेल यांची आठवण होते. त्यांनी 'प्रेम' या संकल्पनेची खालीलप्रमाणे व्याख्या केली. 'प्रेम म्हणजे अपरिमित सत्च्या निरपेक्ष समग्रतेच्या शून्यलब्धि भागातून प्रतीत होणाऱ्या वास्तवतेच्या सापेक्षतेतील चित्वाद!' काही अर्थबोध होतो? स्टुअर्ट चेझ याने याचा सोपा अर्थ सांगितला. प्रेम म्हणजे अशी भावना की ज्याचे अनेक रूपांनी आविष्कार होतात. गरिबी या संकल्पनेचे असेच काही झाले आहे. ती उष्णतामूल्याच्या (कॅलरी-मूल्याच्या) जाळ्यात अडकली आहे. दारिद्र्याच्या व्याख्येसाठी प्री. व्ही. सुखात्मे, वि. म. दांडेकर, मिन्हास, अहलुवालिया, इ. अनेक विद्वानांनी आपली बुद्धी पणाला लावली. परंतु या वादविवादरूपी मंथनातून कोणता निष्कर्ष निघाला? तर गरिबीची व्याख्या करणे केवळ अशक्य आहे. याचे साधे कारण असे की किमान उष्णतामूल्याची गरज ही व्यक्ती, स्थल व कालसापेक्ष आहे. त्यामुळे दारिद्र्याची व्याख्या किमान, सरासरी उष्मांकाच्या निकषावर करणे हे अशास्त्रीय व अर्थहीन आहे. अशा तऱ्हेची चर्चा नियतकालिकांतून खूपच गाजली. यासंबंधीचे श्री. महेंद्र यांचे अज्ञान पाहून आश्चर्य वाटते. महेंद्र यांच्यासकट विद्वानांनी गरिबीच्या व्याख्येसंबंधी अजूनही खुशाल वादंग करावे. माझ्या दृष्टीने, या देशात स्वातंत्र्याच्या सुवर्णमहोत्सवी काळातसुद्धा कोट्यवधी लोकांना रोजचे दोन वेळचे जेवणही मिळणे मुश्कील होते, हे वास्तव देशात कोण गरीब आहे हे ठरविण्यास पुरेसे आहे. आज व्याख्येपेक्षा गरिबीच्या कारण-मीमांसेची अधिक जरूर आहे. आणि माझ्या १६ ऑक्टो.च्या लेखाचा हाच प्रमुख विषय होता.

#### महान माल्थसवादी मिथ्यकथा!
#### (The great malthusian Myth)

श्री. महेंद्र यांचा दुसरा मुद्दा असा की लोकसंख्या वाढीमुळे दारिद्र्य, अज्ञान, बेकारी, अनारोग्य हे प्रश्न निर्माण होतात व अधिक भीषण होतात. अशा प्रकारच्या विचारसरणीला मी महान माल्थसवादी मिथ्यकथा (The great Malthusian Myth) असे म्हणतो. कारण १८ व्या शतकात माल्थस नावाच्या इंग्रज धर्मोपदेशकाने अतिरिक्त लोकसंख्येमुळे दैन्य व दारिद्र्य निर्माण होते. हा सिद्धांत मांडला. मी माझ्या ग्रंथातून व अनेक शोधनिबंधातून पुराव्यानिशी सिद्ध केले आहे की नवमाल्थसवाद हा एकूण पाश्चात्त्य विचारसरणीचा एक अविभाज्य घटक असून तो भारताच्या संदर्भात चूक, अप्रस्तुत, एवढेच नव्हे, विकृत असा एक सिद्धांत आहे. अशातऱ्हेचे प्रतिपादन करणाऱ्या माझ्या वनराई मधील सहा पानी लेखाला केंद्रसरकारचा रु. १००००/- चा पुरस्कार मिळाला. (वनराई ऑक्टो. १९९२, संपादक - मोहन धारिया) माल्थसवादी दृष्टिकोन ऐतिहासिकदृष्ट्या तसेच तात्त्विकदृष्ट्या सर्वथा चुकीचा आहे. मानवाचा इतिहास पहा,





अनुक्रमणिका

लोकसंख्या छोटी असो वा मोठी, वंचित समाज नेहमीच दरिद्री राहिला आहे. गुलामगिरीत गुलाम, सरंजामशाहीत भूदास आणि आधुनिक भांडवलशाही युगांत शेतमजूर, असंघटित कामगार, गिरिजन, झोपडपट्टीतील रहिवासी, इ. मंडळी दरिद्रीनारायणच राहिली आहेत. दुसरे, माल्थसवादानुसार, गेल्या ५० वर्षात भारतातील प्रचंड लोकसंख्यावाढीमुळे देशात दैन्य व उपासमारीने हाहाःकार उडावयास हवा होता. परंतु आजचा ९६ कोटींचा भारत १९५१ च्या ३६ कोटींच्या भारतापेक्षा कितीतरी सामर्थ्यवान व विकसनशील झाला आहे. सारांश, लोकसंख्या वाढीमुळे दारिद्र्य येते हे प्रमेय पूर्णत: असत्य आहे. डार्विन, न्यूटन, केन्स इत्यादी अनेक विश्वविख्यात शास्त्रज्ञांचे सिद्धांत कालबाह्य झाले. परंतु माल्थसचा संकृतदर्शनी स्वयंसिद्ध सत्य (self-ecident truth) वाटणारा, पण अत्यंत भाबडा सिद्धांत मात्र अजूनही घट्टपणे तग धरुन आहे. याची श्री. महेंद्र यांचा लेख वाचल्यावर प्रचिती येते.

**गरिबी : लोकसंख्या वाढीसह अनेक समस्यांची जननी**

माझ्या गरिबीनिर्मूलनासंबंधी प्रतिमानांचे जे आता 'पेठे-प्रतिमान' या नावाने ओळखले जाते, तिचे पहिले प्रमेय असे आहे - लोकसंख्या-वाढीमुळे गरिबी येते हे खरे नाहीं; तर गरिबीमुळे लोकंख्या वाढ होते, हा सामाजिक प्रक्रियेतील खराखुरा कार्यकारणभाव आहे, गरिबाला जास्त मुले, विशेषत: मुलगे, का हवीशी वाटतात हे आपण त्याच्या मानसिकतेत शिरून समजावून घेतले पाहिजे. याला अनेक कारणे आहेत. त्यातील दोन अगदी महत्त्वाची अशी. एक, गरिबाला झालेली मुले जिवंत राहतील याची खात्री नसते. कारण अलीकडे बालमृत्यूचे प्रमाण कमी झाले आहे. तरी प्रगत देशांच्या तुलनेने ते खूप आहे. दुसरे, आपल्या देशात मुलाला 'म्हातारपणाची काठी' किंवा 'वार्धक्याचा विमा' असे सामजण्यात येते. शिवाय अधिक मुले म्हणजे कमावती अधिक माणसे. थोडक्यात, दारिद्र्यामुळे मोठे कुटुंब व लोकसंख्या वाढ होते. गरिबी ही लोकसंख्यावाढ धरुन अज्ञान, अनारोग्य, हिंसाचार इ. अनेक समस्यांची जननी आहे.

**नवीन विचार आणि पोथीनिष्ठांचा पलायनवाद!**

श्री. महेंद्र यांचा तिसरा आक्षेप सर्वसाधारण स्वरूपाचा (general comment) आहे. लेखाच्या शेवटी, नेमका मुद्दा न मांडता, माझ्यावर वैयक्तिक पातळीवर हल्ला करताना ते म्हणतात, 'लेखकाने हस्तिदंती मनोऱ्यात बसून भरमसाठ विधाने ठोकून दिली आहेत... त्याला प्रश्नांची जाण नाही... समस्येशी जराही ओळख नाही.' महेंद्र यांनी, पसरट असला तरी, त्यांच्या लेखाची आधीची बऱ्यापैकी शास्त्रीय चर्चेची पातळी सोडून वरील प्रकारची सवंग व बेजबाबदार हेडमास्तरी शेरेबाजी - त्यांच्याच शब्दात बोलायचे म्हणजे 'ठोकून' दिली आहे. त्यामुळें त्यांच्या विवेचनाचा शेवटी निःपात (anti-climax) झालेला आढळतो! महेंद्र हे पाश्चात्त्य नवमाल्थसवादी प्रतिमानाच्या चाकोरीबद्ध विचार-सरणीच्या चक्रव्यूहात सापडलेले दिसतात. साहजिकच, नवीन स्वदेशी विचारांचे आव्हान स्वीकारताना त्यांच्या विचारात गोंधळ निर्माण झालेला दिसतो. अशावेळी पोथीनिष्ठ समीक्षकांपुढे दोन पर्याय असतात. एक, नवीन विचारांचे स्वागत करून ते स्वीकारणे, किंवा दुसरे जुन्याच विचारात अडकून राहून पलायनवादी (escaopism) कास धरणे. या दुसऱ्या पर्यायात, टीकाकाराने नवीन विचार 'हस्तीदंती मनोऱ्यातले आहेत. कपोलकल्पित आहेत. आदर्शवादी आहेत' किंवा अशा प्रकारची सर्वसाधारणपणे विशेषणे वापरुन, विधाने करणे 'ठोकून' देणे अशी चाल आहेत! अशा विधानांना पुराव्यांची जरूरी नसते. पण अशी विधाने वस्तुनिष्ठ व शास्त्रीय नाहीत, हे त्यांच्या गोंधळलेल्या स्थितीत लक्षात येत नाही. अभिनव विचार समजून घेण्यासाठी, बुरसटलेल्या विचारांनी मलीन झालेली मनाची पाटी आधी स्वच्छ करून घ्यावी लागते. प्रचलित ठरावीक साच्याच्या विचारसरणीचा चष्मा फेकून देऊन महेंद्र यांनी माझा लेख परिशीलन करावा असा त्यांना नम्र सल्ला.

(महाराष्ट्र टाइम्स, १५-१२-१९९७)

☑☑

## चर्चासाठी आवाहन व निवेदन

**डॉ० वसंत पेठे यांचे लेखन**

गरिबी, आर्थिक विकार्स व लोकसंख्या या विषयात आणि यासंबंधीच्या प्रा. वसंत प्रभाकर पेठे यांच्या योगदानाबद्दल (त्यांच्या प्रतिमानांबद्दल) ज्यांना रस असेल




त्यांच्यासाठी खास निवेदन :

प्रा. पेठे यांनी वृत्तपत्रीय, साप्ताहिक व व्यावसायिक मासिके (professional journals) या स्तरावर लेख लिहिले आहेत त्यांचा तपशील असा :

गरिबी व आर्थिक विकास प्रतिमान यासंबंधी प्रा. पेठे यांचे लेख -

I

१. साधना - ११ व १८ सप्टेंबर २००५
२. महाराष्ट्र टाइम्स १६-१०-१९९७
३. महाराष्ट्र टाइम्स टीका १९-११-१९९७
४. टीकेला उत्तर
५. अर्थसंवाद - ऑक्टोबर २००५ व एप्रिल २००६
६. मूल्यांकन - पेठे प्रतिमानाचे (अर्थसंवाद जानेवारी २००३, पुनर्मुद्रित नवभारत मे-ऑगस्ट २००६. याच अंकात प्रा. देवदत्त दाभोलकर, प्र.चिं. शेजवलकर.)

II

१. गरिबी व लोकसंख्या प्रतिमान - १. म.टा. ३०-१-१९९०
२. म.टा. टीका १४-१०-१९९०
३. उत्तर २-१२-१९९० आणि १८-११-१९९०
४. साधना १२-७-२००३
५. अर्थसंवाद एप्रिल व जुलै २०००

III इंग्रजीमधील लेखन

१. Yojana - August १९९८
२. Arthavijana (Gokhale Institute) June १९९२

ज्यांना वरील मूळ लेखात रस आहे त्यांनी प्रा. पेठे यांच्याशी संपर्क साधावा. त्यांचा पत्ता -

प्रा. वसंत पेठे,
दशभुजा गणेश सोसायटी,
पौडफाट्याजवळ, कर्वे पथ, पुणे - ४११०३८
फोन (०२०) २५४३०२५३.

त्यांना पाठविलेल्या पत्राची एक प्रत प्रा. देवदत्त दाभोलकर यांना पाठवावी.

☑☑☑

**Form IV**

रूल नं. ८, रजिस्ट्रेशन ऑफ न्यूजपेपर्स सेंट्रल रूल्स १९५६ अन्वये प्रकाशित

| | | |
|---|---|---|
| प्रकाशन स्थळ | : | प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई ४१२८०३ (जि. सातारा) |
| प्रकाशन दिनांक | : | दरमहा १ तारीख |
| मुद्रक | : | घनश्याम वासुदेव जोशी, व्यवस्थापक, *नवभारत* मासिक |
| राष्ट्रीयत्व | : | भारतीय |
| पत्ता | : | द्वारा - प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई ४१२८०३ (जि. सातारा) |
| प्रकाशक | : | यशवंत शंकर कळमकर, चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई |
| राष्ट्रीयत्व | : | भारतीय |
| पत्ता | : | द्वारा - प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई ४१२८०३ (जि. सातारा) |
| कार्यकारी संपादक | : | यशवंत शंकर कळमकर |
| राष्ट्रीयत्व | : | भारतीय |
| पत्ता | : | द्वारा - प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई ४१२८०३ (जि. सातारा) |
| मालक | : | प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा) |

मी, यशवंत शंकर कळमकर जाहीर करतो, की वर दिलेली माहिती माझ्या माहितीप्रमाणे व समजुतीप्रमाणे संपूर्णतः खरी आहे.

यशवंत कळमकर
प्रकाशक

# ▶ जनआंदोलने ◀

## 'नर्मदा' चे टीकाकार आणि उफराटे भाष्य

मेधा पाटकर

नर्मदा खोऱ्यातील आदिवासी शेतकऱ्यांना शासनकर्त्यांनीच वेठीस धरल्यामुळे संघर्ष तीव्र झाला. अशावेळी आंदोलनाच्या भूमिकेपासून रणनीतीपर्यंत सरदार सरोवर प्रकल्पाच्या लाभहानीपासून मोठ्या धरणांच्या योग्यायोग्यतेच्या चर्चा होणार, हे स्वाभाविकच आहे. खरे तर कुठल्याही जनआंदोलनाला आपल्या वैचारिक भूमिकेविषयीच नव्हे तर साधने, मार्ग याविषयीही चर्चा होणे केव्हाही रुचेल. कारण त्यामुळे आपल्या उणिवा समजण्याची व त्या दूर करण्याची संधी मिळते आणि विचार व रणनीती अधिक प्रगल्भ व प्रभावी होऊ शकते. आंदोलन जेवढे नावाजलेले, समाजाच्या विविध थरांत पोहोचलेले, तेवढी ही चर्चा अधिक जाहीर, व्यापक व सखोलही व्हावी - हेही स्वाभाविकच.

कुठलेही आंदोलन हे केवळ चर्चेवर संतुष्ट होऊ शकत नाही, त्याला ठोस निष्कर्षाबरोबरच साध्यही गाठायचे असते, तेही टप्प्याटप्प्याने. या प्रक्रियेत दुरुन पाहणाऱ्यांना आंदोलनाचे तात्कालिक व दूरगामी लक्ष्य, कार्यपद्धती, ताकद बदलल्यागत वाटते, तेव्हा त्याचे स्पष्टीकरण करत, आपली तात्त्विक तडजोड न करण्याची भूमिका पुन्हा पुन्हा मांडत रहावे लागते. आजकाल प्रसार माध्यमांच्या क्षणार्धात खेळी करण्याच्या, लक्ष खेचण्याच्या व लक्ष्य बनवण्याच्या क्षमतेमुळे, प्रत्येक चर्चेत आंदोलनाचे प्रमुख कार्यकर्ते सहभागी होऊ शकतच नाहीत. नर्मदा आंदोलनाने देशभरातील साथीसहयोगींमार्फत शक्य तितका सहभाग प्रबोधन व उत्तरदायित्वाच्या भावनेतून घेतला. परंतु तेही कमीच पडते. विशेषत: आंदोलनाविरोधी कुणा हितसंबंधी वा हितसाधकानेही आरोप केला आणि खुलासा करणे राहून गेले तर जनसामान्यांना आमच्याकडे जबाब नाही, हिंमत नाही वा आरोपच खरा आहे, असे वाटणेही घडू शकते. पण त्याला नाइलाज आहे.

यावर्षी, सरदार सरोवर धरणाची उंची १२ मी. ने वाढवून मुंबई ते नाशिक एवढे, सुमारे २१० कि.मी. क्षेत्र, त्यात सुमारे ३५००० कुटुंबे आजही वसली असताना, बुडितात ढकलण्याचा निर्णय गुजरात व मध्यप्रदेशच्या दबावाखाली घेतला गेला. तसेच 'विस्थापनापूर्वी पुनर्वसन' या धोरणाचे, त्यासंदर्भात सर्वोच्च न्यायालयाच्या १९९२ ते २००५ दरम्यानच्या चार निर्णयांचे खुले उल्लंघन केले गेले, तेव्हा आंदोलनाचा संघर्ष टोकाला न्यावा लागला. पुनर्वसन करतो आहोत, करुच, जेवढे केले ते आदर्शच आहे, असा दावा अनेक वर्षे केल्यानंतर पुनर्वसनातील गंभीर त्रुटींमुळे, खोट्या व परस्परविरोधी अहवालांमुळे, त्यांच्याच कोर्टातील शपथपत्रांमध्येही अखेरीस हजारो कुटुंबांचे पुनर्वसन बाकी असल्याचे मान्य करावे लागले, तरीही धरण थांबले नाही.

धरण गुजरातेत असले तरी बुडितक्षेत्र मध्य प्रदेशात सर्वात जास्त (१९३ गावे). त्यातील १०० हून अधिक गावे, मोठी पक्की घरे, दुकाने, फळबागायती, उत्कृष्ठ सुपीक शेती, शाळा, दवाखाने, प्राचीन मंदिरे, मशिदी इ. सह वसलेली. ती जिवंत, भरली गावे या पावसाळ्यात बुडणार. पुनर्वसनासाठी पर्यायी शेतजमीन, गावठाणे तयार नसल्यामुळे त्या राज्याविषयी सर्वाधिक ऊहापोह झाला, तीन केंद्रीय मंत्र्यांनी क्षेत्राचा दौरा केला, तेव्हा दिसलेली वस्तुस्थिती निर्भीडपणे मांडली म्हणूनही. अधिकाऱ्यांच्या आंतरराज्य समूहाने घेतलेला निर्णय चुकीच्या आधारांवर, पुनर्वसन पूर्ण न होता घेतला असल्याचेही शाबीत झाले. देशभरातील विस्थापन, विकासाबाबत मानवीय भूमिका घेणाऱ्यांनी, विस्थापन भोगणाऱ्यांनी आवाज उठवला. मात्र पंतप्रधान व सर्वोच्च न्यायालयही या परिस्थितीत, आपला अधिकार वापरून नर्मदाकाठच्या आदिवासी शेतकऱ्यांचा जगण्याचा-पुनर्वसनाचा अधिकार वाचवण्यापासून ढळले. त्यांनी आपापली जबाबदारी व निर्णयही टाळला. पुन्हा एकदा, तीन मंत्र्यांचा रिपोर्ट बाजूला सारून, तीन माजी अधिकाऱ्यांची समिती नेमली व धरण पुढे चालू दिले.

अनुक्रमणिका

काळ-वेळ, आकडा चुकला तर भूत-भविष्याचा वेधही खोटा ठरतो. तसेच इथेसुद्धा अगदी कुठले वर्ष, कुठला प्रकल्प, किती लाभ या एकेका बाबींमध्ये चुकीची माहिती दिल्याने त्यांचे 'भाष्य'च उफराटे झाले आहे.

लेखक 'नर्मदा धरणां' विषयी लिहू लागतात. त्यालाच 'प्रकल्प' म्हणतात. परंतु त्यांना 'नर्मदा खोरे विकास प्रकल्प' आणि ज्यासंबंधी २० वर्षे लढा चालू आहे ते सरदार सरोवर धरण - यातील नेमका फरक कळलेला नाही. १९४७ साली सरदार सरोवराची कल्पना सरदार पटेल यांनी मांडली व १९८८ पर्यंत उलटसुलट चर्चा झाली, हाही भ्रमित करणारा मुद्दा. संपूर्ण नर्मदा खोरे प्रकल्प हा राज्याराज्यांनी परस्परांशी भांडत, आपापल्या क्षेत्रातील नदीवर योजना आखत, अस्तित्वात आला असला तरी एक गुजरातेतील सरोवर सोडता बाकी छोटी, मध्यम, मोठी सर्व धरणे मध्य प्रदेशातच आहेत, त्यांची योजना सरदार पटेलांची नाही. महाराष्ट्राला कुणी ना विचारले ना विचारते! १६६०-६१ सरदार सरोवर धरणाचा प्रस्ताव - तोही केवळ १६२ फूट उंचीचा - गुजरात व महाराष्ट्रातच बुडित आणि गुजरातलाच लाभ, अशा प्रकारचा पुढे आला व त्याला कुणी हरकतही घेतली नाही. तरी पुढे खोसला कमिशन व अन्य समित्या सरकारांकडून आलेल्या प्रस्तावांनुसार ५३० फुटांपर्यंत वाढत्या उंचीचे धरण सुचवत गेल्याने, महाराष्ट्र व मध्य प्रदेशने या धरणाला पूर्ण विरोध सुरु केला. या दोन्ही राज्य सरकारांनी 'आंदोलन' अस्तित्वातही नसताना, सरदार सरोवर धरणाचे फायदे-तोटे, धोके सारे काही केंद्रशासनाने विवाद मिटवण्यासाठी नेमलेल्या 'लवादा' पुढे मांडले, जे आजही उद्‌बोधक ठरतात. साळगावकरांनी ते तरी वाचले आहे का?

लवादाने १० वर्षे, १९६९ ते १९७९ पर्यंत, खोऱ्यातील बाधित होणाऱ्या गावांत न जाताच, राज्य शासनांच्या इंजिनियर्स, वकील ते राजकीय नेते - अधिकाऱ्यांपर्यंत म्हणणे ऐकून १९७९ मध्ये निवाडा दिला. या निवाड्याचा फायदा गुजरातला होण्याचे प्रमुख कारण, गुजरातच्या मोरारजी देसाईंकडे तेव्हा पंतप्रधानपद होते. दोन राज्य सरकारांनी स्वतःच सरदार सरोवर प्रकल्प राज्यहिताच्या विरोधातील म्हणून लाखो रुपये खर्चून, मध्य प्रदेशात सर्वपक्षीय राजकीय नेते आंदोलन करुन, धसाला लावला होता, पण निवाडा त्यांच्या विरोधात गेला, तरी त्यांनी उभे केलेले विस्थापन, पुनर्वसनाची असंभाव्यता व लाभांची अनिश्चितता, नदीतील पाण्याचा खरा अंदाज कमी असल्याचा दावा, हे सारे आजवर अनुत्तरित आहे.

नदीतील पाण्याचे वाटप व सरदार सरोवर जलाशयातील पाण्याचे वाटप यातील फरक साळगावकरांना कळायला हरकत नव्हती. नदी खोरे प्रकल्पांतर्गत मध्य प्रदेशाला १८.२५ दशलक्ष एकर फूट (साळगावकर 'घनफूट' म्हणतात), गुजरातला ९ दशलक्ष एकर फूट व महाराष्ट्राला ०.२५ दशलक्ष एकर फूट वाट्याचे पाणी लवादाने मान्य केले. ते पाणी इतरांनी नदीखोऱ्यात, नदीत येण्यापूर्वी, उपनद्या-नाले वा जलसंग्रहण क्षेत्रात अडवायचे, मात्र, सरदार सरोवर जलाशयातील पाण्यावर केवळ गुजरातचा हक्क (९ दशलक्ष एकर फूट) आणि ०.५ दशलक्ष एकर फूट - त्यापलीकडे गेले तर राजस्थानला मिळणार. थोडक्यात, सरदार सरोवराच्या पाण्याच्या थेंबावरही महाराष्ट्र व मध्य प्रदेशचा हक्क नाही. महाराष्ट्राच्या संपूर्ण उत्तर सीमेवरील नर्मदा महाराष्ट्राची राहणार नाही. मध्य प्रदेशालाही आजच्यासारखे २५ ते ३० हजार पंपाद्वारे सिंचनासाठी मिळणारे पाणी उचलता येणार नाही. नदीपासून ५ ते १० कि.मी. वरील शहरांना मिळणारे पाणीही तुटणार हे स्पष्ट आहे. सरदार सरोवराचे गुजरातला होणारे लाभ दाखवताना जलाशयात साठणारे सर्व पाणी गृहीत धरण्यात येते - जे आजही नदीतून मध्य प्रदेश (व महाराष्ट्रालाही आदिवासी गावांत) वापरले जात आहेच.

१९८२ पूर्वी प्रकल्पग्रस्तांसाठी पर्यायी शेतजमीन व गावठाणे वसवणार ते कुठे, याची तपशीलवार योजना तयार करण्याच्या अटीचे उल्लंघन आजवर हजारो कुटुंबांच्या बाबत, प्रत्येक वेळी धरण पुढे नेताना केले गेले. म्हणूनच तर कोर्टाने चार वर्षे धरण थांबवले. पुनर्वसन झाले नसेल तर धरणाची उंची वाढवता येणार नाही असे पुनःपुन्हा लवादाचा 'आधार घेऊन २००५ पर्यंतच्या चार निकालांतून बजावले. धरण झाले की विस्थापित असणार... विस्थापन असेल तर पुनर्वसन होणार, अशा बाळबोध स्वरात साळगावकर काय सांगू पाहताहेत? हजारो कुटुंबांची घरे-शेते पुनर्वसन झाले नसताना बुडवण्यास हरकत नाही? जमिनीला जमीन मिळण्याची पात्रता ज्यांची आहे, त्या सर्व आदिवासींना, शेतकऱ्यांना अजून जमीन मिळू शकलेली नाही. मध्यप्रदेशात यासाठी हजारो हेक्टर्स जमीन आवश्यक आहे, ही वस्तुस्थिती आहे. मात्र राज्य सरकार अधिकाऱ्यांमार्फत केवळ रोख नुकसानभरपाईच देऊ

इच्छित आहे. त्यातही कोट्यवधींचा भ्रष्टाचार आहे. पुरेसे घरप्लॉटस् व नागरी सोयींसह पुनर्वसनस्थळे तयार नाहीत. शेतजमीनच उपलब्ध नाही, तर या पावसाळ्यात हजारो कुटुंबांनी त्यांच्या भरल्या गावातून उठून जायचे कुठे, या प्रश्नाचे उत्तर न सरकारकडे आहे न साळगावकरांकडे. महाराष्ट्रातही मध्य प्रदेशच्या तुलनेत अत्यल्प (मध्य प्रदेश १९३, महाराष्ट्र ३३) गावेच बुडितात असताना, बाधितांची नावे घोषित करणे, खासगी जमीन शोधणे, वाटप करणे हे सर्व बाकीच आहे. अशा वेळी, जमिनीशिवाय, सर्व हक्क मिळाल्याशिवाय हटणार नाही, असे आदिवासींनी म्हटले तर यात चुकले कोणाचे? याचा उपहास करत साळगावकर आंदोलनाचा मुद्दा सर्वोच्च न्यायलयाने खोटा ठरवला, आंदोलनाचे म्हणणे रास्त नाही हे सुप्रीम कोर्टात सिद्ध झाले आहे, हे कोणत्या आधारावर म्हणतात?

सुप्रीम कोर्टाचा २००० चा निर्णय हा एकमताने नव्हे तर २ : १ असा एका न्यायधीशाच्या बहुमताने झाला. त्यातील अल्पमताचा म्हणजे न्या. भरुचा (माजी मुख्य न्यायाधीश) यांचा निर्णय प्रकल्पाचे पूर्ण नियोजन व आवश्यक ते अभ्यास (पर्यावरणीय नव्हे तर पुनर्वसनाचेही) झालेले नाहीत म्हणून धरण थांबवावे - असाच होता. दोन न्यायाधीशांचा बहुमताचा निर्णयही 'पुनर्वसन व पर्यावरणीय कामे फार मागे पडलेली आहेत, तेव्हा ती पूर्ण झाल्याची खात्री करूनच टप्प्याटप्प्याने, सर्व संबंधित अधिकारी-नियुक्त संस्थांची मंजुरी घेऊनच धरण पुढे जाऊ द्यावे, असाच होता. म्हणून धरण थांबत थांबतच पुढे जाऊ शकले आहे व २००५ मध्ये पुन्हा कोर्टाने स्पष्टपणे विनापुनर्वसन धरणाची उंची वाढू देता नये' असा निवाडा, नर्मदा लवाद निवाड्याचा अर्थ लावूनच दिला. म्हणून पुढेही दोन वर्षे काम थांबवावे लागले. आजही हजारो कुटुंबांचे (मात्र आकडा कमी करून) पुनर्वसन झालेले नाही, असे मध्यप्रदेशचे शपथपत्र दाखवत असताना (महाराष्ट्र सरकारने 'कुणीच बाकी नाही', असे खोटे शपथपत्रच भरले) धरण पुढे नेण्यास या मार्चमध्ये नर्मदा कंट्रोल ॲथॉरिटीने मंजुरी दिली. पंतप्रधानांनी नेमलेल्या निवाड्याने पंतप्रधानांना अंतिम अधिकार दिले असतानाही पंतप्रधानांनी जेव्हा स्वतः निर्णय घ्यायचे टाळले, कोर्टावर ढकलले आणि अखेर कोर्टानेही लवादाचे व स्वतःचेही यापूर्वीचे निर्णय धाब्यावर बसवून धरण पुढे नेण्याचा आदेश दिला. यात कोर्टाच्याच पूर्वीच्या निकालांचे उल्लंघन झाल्याचे अनेक विधिविशेषज्ज्ञांनी स्पष्टपणे मांडले आहे.

नर्मदा आंदोलनाने पर्यावरणाचे ठोस मुद्दे उठवले, ते पाण्याचे नियोजन निरंतर व समतावादी होण्याच्या, जमिनीचे, जंगलाचे रक्षण होण्याच्या दृष्टीने. सरदार सरोवरच नव्हे, तर भाक्रानांगल वा उकई धरणासह सर्व मोठ्या धरणांमुळे निसर्गावर दलदल, क्षारीकरणासारखा झालेला परिणाम, हजारो हेक्टर्स जमिनीचा नाश हे समोर आलेले वास्तव नाकारण्यासारखे नाही. सरदार सरोवरातून गुजरातमध्ये १८ लाख हेक्टर सिंचनक्षेत्र निर्माण होणार, हा सरकारी दावा म्हणजे वास्तवता नव्हे. ११० मी. धरणाच्या उंचीवर सुमारे २.५ ते ३ लाख हेक्टर्स सिंचनाचा दावा होता, मात्र प्रत्यक्षात ५७००० हेक्टरच्या वर सिंचन गेले नाही. मध्य प्रदेशाला चमकावून टाकणाइतकी वीज बनणार होती. प्रत्यक्षात महाराष्ट्र व मध्यप्रदेशाला नगण्य वीज मिळाली, त्याही आकडेवारीत एमएसईबीच्या निरनिराळ्या अहवालांमध्ये तफावत आहे. पूर्ण धरणाची किंमत अधिकृत स्रोतानुसार ४०००० कोटी रुपये आहे. धरणाच्या खर्चात दरवर्षी २२ टक्के मुद्दल व व्याजापरतीचा खर्च आहे. तेव्हा नेमका फायदा-तोटा हा दिसू लागला आहे व यापुढेही दिसणार!

ही सर्व हकीकत, धरणाच्या आर्थिक बाबींवर सीएजीनेही ओढलेले ताशेरे व योजना आयोगाने त्याचे पुनर्मूल्यांकन करणे आवश्यक असल्याचा सीएजीचा निष्कर्ष - हे सारे दडपून, तसेच कच्छच्याच दुष्काळग्रस्तांनी गुजरात सरकारविरुद्ध हक्काचा जलवाटा देत नाहीत, म्हणून सर्वोच्च न्यायालयात केस दाखल केली आहे, हेही सांगणे टाळून, उलट आमच्यावरच खोटे, मोघम व विकृत आरोप करणे यातून साळगावकर काय साधत आहेत?

नर्मदेसंदर्भातच नव्हे एन्रॉन, कृष्णा खोरे याबाबतीतही साळगावकर आमच्यावर (इथे काहीही संबंध नसताना) अत्यंत गंभीर आरोप करतात, तेव्हा त्याचाही खुलासा करणे आवश्यक ठरते.

एन्रॉनच्या दाभोळ प्रकल्पाला विरोध हा गॅसवर आधारित म्हणून नव्हे, तर त्यामुळे महाराष्ट्र व देशातील ग्राहकांपासून ते वीज मंडळापर्यंतचे आर्थिक नुकसान, शेतकरी व मच्छीमारांचे विस्थापन या मुद्द्यांवर होता. या दरम्यान एन्रॉनला हटवणे सरकारलाच करावे लागले, म्हणून खरे सिद्ध

झाले. मात्र युनियन कार्बाईड प्रकल्प व एन्रॉनमध्ये काय फरक आहे, काय नाही, याच्या तत्त्व व वस्तुस्थितीची चर्चा आम्ही अनेक ठिकाणी केली आहे. साळगावकर या प्रकल्पाचे अभ्यासक असतील तर त्यांच्याशी जाहीर मंचावरही करू! मात्र ज्या कुठल्या व्हिडिओ टीममधील कुणा तरुणाने अंजनवेली-मधील कुठल्या 'रानवी' जमातीच्या मुलीवर अतिप्रसंगाचा प्रयत्न केल्याने आम्हाला आमचे चंबुगबाळे आवरायला लागले, त्याचा खुलासा साळगावकर करतील का? त्यांनी अंजनवेलमध्येच उभे राहून आमच्या व गावकऱ्यांच्या समोर जाहीर करावे, नाहीतर आम्हाला बदनामीची केस दाखल करावी लागेल.

कृष्णा खोरे प्रकल्पाबाबत आम्ही कुणा हंकार (हे कोण? मलाही आठवत नसताना, साळगावकर कुठे भेटले?) त्यांना हाताशी धरून विरोधाचा प्रयत्न केला, फसला अशी कथा साळगावकर रचतात. कृष्णा खोरे प्रकल्पाबाबत नुकताच प्रसिद्ध झालेला माधव गोडबोलेंचा लेख, अनेक वस्तुनिष्ठ अभ्यास व अहवालही प्रकल्पाची भंडाफोड करणारे आहेत. माधवराव चितळेंचाच दाखला देणारे सर्व मोठ्या धरणांचे छानच चालले आहे, असे सांगत आले आहेत. परंतु उकई, जायकवाडी ते भाक्रानांगलपर्यंत काय चालले आहे, हे सांगणारी आकडेवारी, विश्लेषणाचे संदर्भ आम्ही पुरवू शकते. विश्व बँकेला मानणारे, त्यांनी धरणांना पैसा दिल्याचे व आमच्या नतद्रष्ट विरोधामुळे त्यांचा पैसा रोखल्याचे सांगतात. पण आता, मोठ्या धरणांविना शेतीसाठी जलनियोजन कसे योग्य प्रकारे होऊ शकते, याचा विश्व बँकेतीलच शेतीतज्ज्ञांचा अहवाल आहे, हे त्यांना कोण सांगणार?

साळगावकरांनी त्यापुढील हल्ला, आम्हाला मिळणाऱ्या विदेशी समर्थनाविषयी केला आहे; तोही अपुऱ्या या विकृत माहितीवर. अमेरिकेतल्या एनजीओजच नव्हे तर आंतरराष्ट्रीय स्तरावरच्या लॉबीजच्या हातातील बाहुले बनून, त्यांच्या स्तुतीला भुलून मी काम करते, असा आरोप करणारे साळगावकर या देशातील सरकारे अमेरिकेचा पैसा, अमेरिकेचा दबाव-प्रभाव, त्यांची ध्येय-धोरणे, अणुऊर्जेसंबंधी करार-मदार वा अमेरिकेच्या अध्यक्षांचे स्वागत, सारे काही आपल्या व्यवहारात, निर्णयात वापरतात - त्याबद्दल काही बोलत, लिहीत नाहीत.

देशातील विविध प्रकल्पांना, योजनांना आज प्रश्नचिन्ह लावत आहेत, ते केवळ नर्मदा आंदोलनाचेच सार्थी नव्हेत तर अनेक राजकीय पक्ष, संघटना, सर्वसामान्य नागरिकही. ज्यांचे सर्वस्व, पर्यायही न देता, सहमती न घेता, पारदर्शिता वा उत्तरदायित्व नाकारून, हिरावून घेतले जाते; ते दलित, श्रमिक, ग्रामीण वा शहरी गरीब प्रश्न विचारू लागले - ही खरे तर लोकशाहीची खूण आहे. केवळ विरोधी पक्षच विकास वा विकास प्रकल्पाविषयी बोलू शकतात, त्याला विरोध करु शकतात व तोही विधानसभा-लोकसभा या मंचावरूनच, हा साळगावकर वा दत्तप्रसाद दाभोळकरांचाही जो समज दिसतो तो दुधखुळा म्हणायचा की राजकीय अज्ञान? नागरी समाज, सामाजिक-राजकीय संघटनांना तसा अधिकार आहे, हे ठणकावून सांगणे भाग आहे.

(लोकरंग, रविवार, ११/०६/२००६.)

☑ ☑ ☑

## 'जासामं' चा जाहीरनामा

१) जासामं हे एक खुले व्यासपीठ आहे. विविध गट व जनआंदोलनांच्या परस्पर जोडणीसाठी आणि परिणामकारक कृतीसाठी -विचारांसाठी - अनुभवांची देवाणघेवाण, संकल्पनांबाबत चर्चाविचार, आराखड्यांची मांडणी येथे होईल. नवउदारीकरणाद्वारे जगाला भांडवलाच्या किंवा वसाहतवादाच्या दावणीला विश्वबंधुत्त्वाचे नाते फलद्रूप करण्यास सिद्ध होतील.

२) पोटो ॲलेग्रे येथील जासामं ही एक तत्त्कालिक आणि स्थानिक घटना होती. मात्र तेथे ठरवल्याप्रमाणे 'वेगळे जग शक्य आहे'. त्याचा शोध घेण्याची व पर्यायांची उभारणी करण्याची प्रक्रिया आता सुरु होत आहे.

३) जासामंच्या सर्व बैठका जागतिक पातळीवरच्या असतील.

४) जागतिकीकरणाच्या प्रक्रियेवर विशाल बहुराष्ट्रीय कंपन्या स्वार होत आहेत, अनेक राष्ट्रांची सरकारे व आंतरराष्ट्रीय संस्था या कंपन्यांच्या गैरकृत्यांना पाठबळ पुरवत आहेत. त्यांच्या विरोधात जासामंमधून पर्याय प्रसृत करण्यात आले आहेत. त्याद्वारे सामाजिक न्याय, समता आणि लोकांची स्वायत्तता यांसाठी कार्यरत राहणाऱ्या लोकतंत्राने चालणाऱ्या








व्यवस्था आणि संस्था निर्माण होतील. त्यांच्या आधारे सर्व जगातील स्त्री - पुरुषांच्या मानवाधिकारांचा तसेच पर्यावरणाचा आदर केला जाईल.

५) जासामंचे कार्य देशोदेशीच्या संघटना व आंदोलने यांना एकत्र आणणे व जोडणे एवढेच असेल. जासामं हे जागतिक नागरी समाजाचे प्रतिनिधित्व करणारे मंडळ होणे अभिप्रेत नाही.

६) जासामं हे मंडळ नसल्याने जासामंची अधिवेशने कोणाच्या तरी वतीने झाली असे होणार नाही. जासामंमध्ये अधिकारपदे नसतील किंवा सहभागी झालेल्यांच्या पाठिंब्याचा कोणी दावेदार नसेल. येथे एखाद्या ठरावाबाबत वा कृतीकार्यक्रमाच्या प्रस्तावाबाबत मतदान नसेल. सर्वानुमताने अथवा बहुमताने कोणताही निर्णय घ्यायला लावणे नसेल. मंचाच्या वतीने एखादी भूमिका घेणे अथवा तशी मागणी करणे यांस मनाई असेल. मंच म्हणजे सहभागींनी बळकावण्याचे सत्तास्थान नाही. सहभागी संघटनांना एकत्रित विचार व कृतीस प्रवृत्त करणारा एकमेव मंच असल्याची धारणा जासमांची नाही.

७) मंचाच्या बैठकांमध्ये सहभागी होणाऱ्या संघटनांना अथवा त्यांच्या गटांना आपापले कार्यक्रम - उपक्रम - घोषणा सर्वांसमोर मांडण्याचा अधिकार निश्चितच राहील. त्या - त्या संघटनांचे वा गटांचे निर्णय कुठलाही भेदभाव न करता, त्यात बदल न करता, अडसर न आणता सगळीकडे प्रसारित करण्याचे कार्य जासामं करेल.

८) जासामंमध्ये विविधता आहे. तो निष्पक्ष आहे. कोणाकडून कबुलीजबाब घेण्यासाठी त्याची निर्मिती नाही. स्थानिक पातळीपासून आंतरराष्ट्रीय पातळीपर्यंत विविध ठिकाणी ठोस कार्य करणाऱ्या संघटना व आंदोलनाची जोडणी विकेंद्रीत स्वरुपात करणारा तो मंच आहे.

९) या जाहीरनाम्यातील तत्त्वे मान्य असणाऱ्या, सहभागी होण्यास उत्सुक असणाऱ्या, विविध क्षेत्रांत विविध मार्गांनी कार्यरत असणाऱ्या संघटना व आंदोलनांचे लिंगभेद - वांशिकता - संस्कृती - वय - शारीरिक कुवत असा भेदभाव न करता, स्वागत आहे.

१०) अर्थव्यवहार, विकास आणि इतिहास यांबाबतच्या एकसाचीपणाच्या वा एकारलेपणाच्या दृष्टीकोनास तसेच शासनाने समाजनियंत्रणासाठी हिंसात्मक कारवाई करण्यास जासामंचा विरोध आहे. मानवीय अधिकारांचा सन्मान, सच्च्या लोकतंत्राची अंमलबजावणी, लोकसहभाग, विविध सामाजिक घटकांमधील संबंध समता व एकजुटीवर आधारित असणे यांना मंचाचा पाठिंबा आहे. कोणीही कोणाचेही कोणत्याही प्रकारचे दमन करणे वा वर्चस्व गाजवणे याचा मंच निषेध करतो.

११) भांडवली जागतिकीकरणाची प्रक्रिया वंशवादी, लिंगवादी आणि पर्यावरणाचा विनाश करणारी आहे. ती लोकांच्या जगण्याच्या साधनांवर गदा आणते, विरोधकांना नेस्तनाबूत करते, सामाजिक समस्या वाढवते, लोकांना उखडवून भुकेकंगाल करते, या समस्या टाळण्यासाठी सुचवलेल्या पर्यायांना अव्हेरते. अशी भांडवली यंत्रणा व तिचे मार्ग यांबद्दलचे विचार व त्यावरील प्रतिक्रियांचे प्रसारण करणारी एक चळवळ म्हणजे जासामं.

१२) वर्तमानकाळात आणि भविष्यातही निसर्ग संतुलन राखत समाजघडणीसाठी लोकांच्या गरजा भागवत केले जाणारे आर्थिक कार्यक्रम आणि राजकीय कृती यांना केंद्रस्थानी ठेवून, सहभागी संघटना व आंदोलने यांचा आपसातील संवाद आणि समजूत वाढण्यासाठी व अनुभवांच्या देवाणघेवाणीसाठी जासामं सतत प्रयत्नशील असेल.

१३) शासनप्रणीत हिंसा तसेच जागतिक अमानुषीकरणाच्या विरोधात अहिंसात्मक सामूहिक प्रतिकाराची धारणा व्यक्तींमध्ये तसेच समाजामध्ये वाढावी आणि माणूसपणाची पुनर्स्थापना करण्यासाठी सहभागी संघटना व आंदोलनांची राष्ट्रीय तसेच जागतिक पातळीवर सांधेजोड होऊन ती बळकट व्हावीत यासाठी जासामं सतत शोध घेत राहील.

१४) स्थानिक पातळीवरुन देश पातळीवर येण्याची व वैश्विक नागरिकत्त्वाचा संदर्भ ठेवून एकात्म जग घडवण्यासाठी आपल्या कृती कार्यात योग्य ते बदल करुन सहभागी होत राहण्याची प्रेरणा संघटना व आंदोलनांना देण्याचे काम करणारी जासामं ही एक प्रक्रिया आहे. (विविध संघटनांनी एकत्र येऊन उभारलेल्या जासामंच्या व्यवस्थापन समितीने ९ एप्रिल २००१ रोजी साओ पावलो येथे मान्य व स्वीकृत केलेला मसूदा, त्यात काही सुधारणा करुन जासामंच्या आंतरराष्ट्रीय समितीने १० जून २००१ रोजी मान्य केला.)












जन आंदोलनांचा राष्ट्रीय समन्वय

## समन्वयाची भूमिका आणि महत्त्व

देवदत्त दाभोलकर

गुजरातचे प्रतिनिधी व मेधा पाटकर यांचे प्रतिनिधी यांच्यामध्ये खुल्या व्यासपीठावर वाद व्हावा असा प्रयत्न सुमन आणि मी सुमारे दोन दशकांपूर्वी केला होता. 'Sardar Sarovar Debate : The debate that Was'nt' या शीर्षकाखाली त्याची पुस्तिकाही आम्ही लगेचच प्रकाशित केली होती.

परिचयात्मक म्हणून एवढे पुरेसे आहे. सुमन मेधाची भावनात्मक व वैचारिक कट्टर अनुयायी आहे. मी तसा कधीच कोणाचा नव्हतो व आजही नाही.

परंतु मेधाने व तिच्या अनुयायांनीही आपली भूमिका परत शांतपणे तपासून पाहिली पाहिजे असेही मला वाटते. हे माझे वाक्य वाचले की अनेकजण आपल्या मनाची कवाडे खाडदिशी बंद करतील हा धोका मला स्पष्टपणे दिसतो. परंतु तो मला स्वीकारला पाहिजे.

आज केवळ भारतच अस्वस्थ आहे असे नाही तर जगात आज कोणताही असा देश नाही (पूर्व-पश्चिम उत्तर-दक्षिण प्रगत-अप्रगत) की ज्यामध्ये तीव्र स्वरुपाचे असंतोष नाहीत. संपूर्ण जगात अशी ज्वालाग्रही परिस्थिती यापूर्वीच्या जागतिक इतिहासात कधीही नव्हती. (इतिहासाचे अधिक जाणकार मला क्षमा करतील.)

बी.बी.सी. वर Hard Talk मध्ये मुलाखत ऐकली. जगातील 'Internally displaced' लोकांच्या सहाय्यासाठी प्रयत्न करणाऱ्या यूनो संघटनेच्या विभागाचे प्रमुखपद सांभाळणाऱ्या व्यक्तीची मुलाखत घेतली जात होती. प्रश्न नेहमीप्रमाणे धारदार होते आणि उत्तरेही नेहमीपेक्षा अधिक प्रामाणिक आणि पारदर्शी होती. याठिकाणी 'Internally disturbed' याचा अर्थ अंतर्गत यादवीमुळे विस्थापित झालेले लोक एवढाच मर्यादित होता. नर्मदा-विस्थापितांसारखे जे सर्व देशात असंख्य लोक आहेत त्यांचा समावेश या विभागाच्या कार्यकक्षेत येत नाही. परंतु तरीही या मूलभूत मानवी कणवेच्या प्रश्नाला राजकीय, सामाजिक, आर्थिक अशी अनेक अंगे असतात व प्रत्यक्ष धोरण राबविताना त्यांचा सुरुचिर समन्वय साधणे हे फार दुष्कर कसरतीचे असे काम असते.

हितसंबंधी गटांचा विरोध होणार हे आपण गृहीतच धरले पाहिजे. (हितसंबंधी गटाचे निकष काय असावेत हाही वादाचा मुद्दा असू शकतो. Public interest की Publicity interest हा अनाहूत मुद्दा सुप्रीम कोर्टदेखील उपस्थित करू शकते याचे यामुळे आश्चर्य वाटावयास नको.)

यापूर्वी मी चारएक दिवस (मला वाटते बी.बी.सी. वरच) दुसरी एक चर्चा ऐकली होती. G-८ संघटनेचा यावर्षी रशिया अध्यक्ष असेल. ही संघटना औद्योगिकदृष्ट्या प्रगत लोकशाही धारणेच्या राष्ट्रांची आहे. या संघटनेत रशिया असूच कसा शकतो याविषयी ही चर्चा होती. मान्यवर सहभागी होते. पुतिन यांना सल्लामसलत देणाराही त्यात होता. त्याला चर्चेच्या सूत्रसंचालकाने थेट विचारले, 'तुम्ही पुतिनचे सल्लागार आहेत, रशियाच्या लोकशाही विरोधी आचरणाबद्दल जे आरोप आहेत त्याविषयी आपण त्यांना काय सल्ला दिला?' उत्तर देणारा कसलेला मुत्सद्दी वाटला, तो म्हणाला, मी पुतीनना काय सल्ला देतो ही त्यांच्या माझ्यामधील खाजगी बाब आहे. तिचा मी कधी बाहेर उच्चार करीत नाही.

या जागतिक पार्श्वभूमीचे संदर्भ भारतीय जनआंदोलन समन्वयाच्या नेत्यांनी समजून घेतले पाहिजेत व आपली त्या त्या संदर्भातील कार्यपद्धती निश्चित करत गेले पाहिजे. हे असे आज घडत आहे असे मला वाटत नाही व आपल्याकडे मतमतांतरे इतकी असतात आणि ती इतकी हट्टाग्रही असतात की नजीकच्या किंवा दूरच्याही भविष्यकाळात हे शक्य होईल असे मला वाटत नाही. आपापल्या अनुयायांना आपल्या निर्णयासोबत नेण्याची कुवत असणाऱ्या नेत्यांनी शांतपणे छोट्या गटात चर्चा करून हा प्रश्न सोडवत जावयास हवे.

मी आशावादी आणि सरदार सरोवर चर्चेचा व इतर काही चर्चांचा कटु अनुभव लक्षात घेऊनही या दिशेने कोणी विचार वा कार्य करणार असेल तर त्या व्यक्तीशी, गटाशी, संघटनेशी, संस्थेशी सहकार्य करण्यात मला आनंदच होईल.

☑ ☑ ☑

# ▶ प्रतिमानांपलीकडे ◀

## सत्याचा आग्रह धरायचा तरी कसा ?

डॉ० नरेंद्र दाभोलकर

हिंसक आंदोलन महाराष्ट्राने नुकतेच अनुभवले. सार्वत्रिक सूर असा होता, की वेदना व्यक्त करा - प्रखरतेने; पण शांततेने. याचाच अर्थ सत्याग्रही मार्गाने लोकशाहीत प्राणभूत महत्त्वाची ठरणारी सत्याग्रहाची संकल्पना राष्ट्रपित्याने दिली. या कल्पनेचे शताब्दी वर्ष चालू आहे. सत्याग्रहाचा व्यक्तिगत मार्ग उपोषणाचा. सत्याग्रहात दोन बाबी स्पष्टच हव्या. पहिली म्हणजे माझा आग्रह सत्यच आहे. आणि दुसरी म्हणते तो मी शांततामय सनदशीर मार्गानेच व्यक्त करीन. पहिल्या निकषाबाबत मतभिन्नता संभवते. उसाला किती भाव द्यावा किंवा कोरडवाहू अल्पभूधारक शेतकऱ्यांची संपूर्ण कर्जमाफी करावी का? याबाबतीत वेगवेगळे सत्य प्रतीत होते. वाटचाल अधिक अवघड बनते. याशिवाय सत्याग्रहाचा मार्ग कालबाह्य, हास्यास्पद, परिणामशून्य झाला आहे, असा आक्षेप असतो. मुर्दाड सरकार कायदा सुव्यवस्थेचा प्रश्न गंभीर झाला तरच विचार करते, हे बऱ्याचदा खरे आहे. अर्थात लोकशाहीला अहिंसेचे पथ्य अत्यावश्यक आहे, असे ज्यांना वाटते, त्यांना ही झुंडशाही बाब वास्तवात प्रसंगी परिणामकारक ठरते, असे दिसूनही कठोरपणे नाकारावी लागते.

दोन्ही बाजूंचे सत्याचे आकलन एकच आहे. आणि तरीही अशक्य दिरंगाई चालू आहे, तर सत्याग्रही मार्गाने कसे झुंजावे, याच्या एक तपाच्या वाटचालीशी माझा संबंध आहे. आणि सत्य अजून प्रतिक्षेतच उभे आहे. 'जादूटोणा विरोधी कायदा' करण्याचे महाराष्ट्राच्या विधान परिषदेने जुलै १९९५ मध्ये प्रचंड बहुमताने ठरवले. पुढील साडेचार वर्षांच्या युतीच्या काळात प्रत्येक अधिवेशनात शासनाने कायदा करण्याचे आश्वासन दिले. त्यानंतर लोकशाही आघाडीचे शासन आले. त्यांच्या समान किमान कार्यक्रमात सत्तेवर आल्यापासून एक वर्षाच्या आत कायदा करण्याचे वचन होते. तीन वर्षे तशीच गेली. १५ ऑगस्ट २००३ ला केवळ मंत्रीमंडळातच कायदा मंजूर झाल्यावर 'असा कायदा करणारे भारतातील पहिले राज्य' अशी जाहिरात शासनाने मिरवली. पुन्हा सत्तेवर आलेल्या राज्यकर्त्यांनी २००४ चे आश्वासन दिले. २००५ च्या एप्रिल महिन्यात मंत्रिमंडळात तिसऱ्यांदा कायदा मंजूर झाला. तो विधानसभेत मांडताना सत्तारूढ पक्षाच्याच आमदाराने त्याला गैरसमजातून कडाडून विरोध केला. मुख्यमंत्र्यांनी तो शांतपणे पाहिला. नंतर व्यापक सहमतीसाठी कायद्याचे प्रारूप सौम्य करण्यात आले. सर्व विरोधकांशी सरकारच्या पुढाकाराने चर्चा झाली. डिसेंबर २००५ ला विधानसभेने विधेयक मंजूर केले. त्यानंतर पुढच्या अधिवेशनात विधान परिषदेत कायदा संमत होणे, ही औपचारिकता होती; परंतु तब्बल तीन अधिवेशने पार पडली; अजूनही पाऊल अडखळलेलेच आहे. या सर्व कालखंडात सर्व सत्याग्रही मार्ग पुन्हापुन्हा आणि व्यापक प्रमाणावर वापरून झाले. धरणे धरली, लाक्षणिक उपोषणे झाली. शेवटी येत्या नागपूर हिवाळी अधिवेशनात पहिल्या दिवशी विधेयक मांडावे व लगेच मंजूर करावे; अन्यथा उपोषण करावे लागेल, असे पत्र शासनकर्त्यांना दिले. स्पष्ट जाहीर आश्वासन मिळाले. पहिल्यादिवशीच विधेयक मांडण्यात येईल, दुसऱ्या दिवशी मंजूर करू. पहिल्या दिवशी विधेयक कामकाज पत्रिकेत होते; पण चर्चेला आले नाही. दुसऱ्या दिवशी तर ते कामकाज पत्रिकेतूनच गुप्त झाले.

पूर्वसूचनेप्रमाणे लातूर येथे उपोषण चालू केले. भूमिका अत्यंत स्वच्छ होती. सत्याग्रहाचा हेतू शुद्ध होता. हे उपोषण कोणा विरोधी नव्हते. मुख्यमंत्र्यांच्या विरोधी तर नव्हतेच नव्हते. राजकीय इच्छाशक्ती कमी पडते आहे, त्याला सामाजिक इच्छाशक्तीची जोड देण्याचा तो प्रयत्न होता. उपोषणाच्या आत्मक्लेशाने शासनाच्या व समाजाच्या सद्सद्विवेकबुद्धीला आवाहन करण्याचा हेतू होता. यासाठीच मागणी करणारी प्रचंड निधी फेरी निघाली तीही मूक होती. पुण्यासारख्या ठिकाणी पाठिंबा म्हणून श्रीराम लागू, न्या. कोळसे पाटील, बाबा आढाव, विद्या बाळ, रा. ग. जाधव अशा ज्येष्ठ मंडळींनी लाक्षणिक उपोषण केले. बाबा आमटे, ग. प्र.

अनुक्रमणिका






प्रधान, सदाशिव अमरापूरकर यांनी मुख्यमंत्री कार्यालयाशी संपर्क साधला. ही सारी कमाई संघटनेच्या कर्तृत्वाची नाही. उपोषण नावाची नैतिक कृती आजही लोकांना हलवू शकते, याची ती आश्वासक खूण होती? तर २१ व्या शतकात समाजसुधारकांच्या महाराष्ट्रात जादूटोणा, चेटूक, जारण-मारण, मंत्रतंत्र डाकीण, प्रथा, भानामती यामधील शोषण थांबविण्यासाठी थेट कायदा करा, की जो विधानसभेने आधीच मंजूर केला आहे.

उपोषणाच्या १० दिवसांत शासनाकडून कसलाही अधिकृत संपर्क साधण्यास आला नाही. जिल्हाधिकारी सोडाच, कारकून अथवा हवालदारही मंडपाकडे फिरकले नाही. दोन्ही सत्तारूढ पक्ष स्वतःच्याच सरकारने करू घातलेल्या कायद्यासाठी पाठपुरावा करणाऱ्या उपोषणाकडे संपूर्ण पाठ फिरवून उभे राहिले.

दिशाभूल करणारा असत्य प्रचार करून कायद्याला विरोध करणाऱ्या मंडळींनी लाक्षणिक उपोषणाचे प्रती आंदोलन केले. 'हा कायदा झाला तर हिंदूंना धर्माचरण अशक्य होईल, ते केले तर तुरुंगात जावे लागेल.' असा बिनदिक्कत प्रचार पत्रके वाटून केला. शासनाने या खोटेपणाचा अधिकृत प्रतिवाद केला नाहीच. जिल्हा पोलिसप्रमुखांना ही बाब नजरेला आणल्यावर कायदा होण्याआधीच 'त्यात काय आहे, हे तुम्हाला कसे कळले' असा अजब प्रश्न त्यांनी विचारला. वृत्तपत्रे जिल्हा वा प्रादेशिक झाली आहेत, हे तीव्रतेने जाणवले. मराठवाडा विभागातील महत्त्वाच्या ठरणाऱ्या उपोषणाच्या बातम्या अन्य विभागांत तुरळकपणे प्रसिद्ध झाल्या. विधान परिषदेत या विधेयकाला कडाडून विरोध करणाऱ्या शिवसेनेला ना प्रबोधनकार ठाकरे आठवले ना भाजपला सावरकरांचा संदेश स्मरणात आला. सत्तारूढ पक्ष निव्वळ मते मिळवण्याची यंत्रे बनली आहेत. आपल्याच पक्षाने परिवर्तनाचे एक पाऊल अडखळत व अर्धवट टाकले आहे. फुले-आंबेडकरांचा वारसा उठता-बसता बोलणाऱ्या आपण त्याचा आग्रह धरला पाहिजे, हे त्यांच्या गावीही नव्हते. पक्षांनी परिवर्तनाचा विचारच जणू हरवला आहे. आणि सामाजिक प्रश्नाबद्दल तर ते कमालीचे असंवेदनशील बनले आहेत, असे जाणवले.

या देशाशी सुतराम संबंध नसलेला, व्यापारासाठी आलेला, धर्माने ख्रिश्चन असलेल्या लॉर्ड बेंटिंगने सती विरोधी कायदा सर्व विरोध न जुमानता १७५ वर्षांपूर्वी केला आणि जादूटोणा विरोधी कायद्याची वाटचाल एक तप ओलांडून अजून चालूच आहे. आपल्या देशातील लोकशाहीचे गोडवे सर्वत्र गायले जातात. त्याचबरोबर महाराष्ट्राच्या सामाजिक वारशाचा रास्त अभिमानाने उल्लेख होतो; परंतु या 'कथनी'ची 'करणी' शी जर गाठच पडत नसेल तर हे चित्र बदलावे, यासाठी सत्याचा आग्रह धरायचा तरी कसा? सत्याग्रही संकल्पनेचे हे शताब्दी वर्ष आहे. पूर्वीचे दाखले देत अमूर्त चिंतन मांडले जाते; परंतु या कल्पनांच्या आजच्या प्रस्तुततेची, त्याबाबतच्या वास्तवाची, आणि ते बदलण्यासाठी करावयाच्या प्रयत्नांची चर्चा होणे अगत्याचे आहे.

(सकाळ, २५ डिसेंबर २००६.)

☑ ☑ ☑

## या ग्राहक चळवळीत आमूलाग्र क्रांतीची बीजे !

### देवदत्त दाभोलकर

जयप्रकाशजी जेव्हा पुण्यात आले होते त्यावेळी त्यांचा कार्यक्रम ठरविणे माझ्या हातात असते तर मी त्यांना सांगितले असते की तुम्ही या ग्राहक पंचायतीच्या कार्यकर्त्यांशी बोला व त्यांच्या हातून महाराष्ट्रात पुढे कोणते कार्य घडण्यासारखे आहे याचा विचार करा. मी जयप्रकाशजींना म्हटले असते की, महाराष्ट्राला देण्यासारखा एक महत्त्वाचा कार्यक्रम आपल्यासमोर आहे; आणि तो कार्यक्रम म्हणजे ग्राहक चळवळीचा. मला वाटते की, प्रत्येकाची केवळ विवाहित पत्नी या कार्याला लाभली तरी समाजपरिवर्तन होऊ शकेल. ग्राहक पंचायतीच्या आजपर्यंतच्या कार्याकडे दृष्टी टाकता मी असे निश्चितपणे म्हणू शकतो की, हे कार्य भक्कम पायावर उभे राहिले आहे, आणि ते यापुढे सर्वत्र पसरण्याची शक्यता आहे, पसरले पाहिजे.

या चळवळीच्या पाठीमागचे महत्वाचे सूत्र कोणते की ज्याच्या आधारावर ही चळवळ चालू आहे, किंवा पुढेही चालू राहील? मला वाटते की ही चळवळ केवळ परस्पर विश्वासाच्या आणि सहकारी कर्तृत्वाच्या आधारावर उभी राहू

शकेल. २५ - २५ ग्राहकांचा एक गट आणि त्या गटांची उत्तरोत्तर चढत जाणारी अशी ही एक संघटना आहे. एक जिवंत संघटना म्हणून २५ कुटुंबांचा एक गट या संघटनेकडे पाहत असतो. केवळ धान्य देणारे किराणा मालाचे दुकान या भावनेने या संघटनेकडे लोकांनी पाहता कामा नये. आपण सगळे मिळून करीत असलेला हा प्रयत्न आहे आणि या प्रयत्नात यशस्वी होण्याची जबाबदारी केवळ नेत्याची नसून आपल्या सर्वांची आहे. कदाचित् या व्यवहारात काही चुका होतील, नुकसान होईल. परंतु ते सर्व प्रामाणिक पद्धतीच्या आणि शक्य तितक्या कार्यक्षमतेच्या प्रयत्नानंतर घडलेले असेल. परस्परांविषयीचा विश्वास, वरच्या स्तरावरील नेत्यांच्या प्रामाणिकपणाविषयी सुतराम् शंका नाही आणि त्यांचे अपेक्षित प्रमाणातील कर्तृत्व अशा पद्धतीची रचना जर उभी राहिली तर ती रचना केवळ ग्राहक चळवळीलाच नव्हे, तर भारतातील लोकशाहीच्या विकासाला अतिशय पोषक ठरेल.

या चळवळीत येताना पक्षोपक्षांची वस्त्रे उतरवूनच आत यावे. कारण देशाच्या सर्वतोपरी हिताची असलेली ही चळवळ आहे. या दृष्टीने हे कार्य केले तर ज्याप्रमाणे या कार्यकर्त्यांनी पुण्याचे चित्र गेल्या ४- ५ महिन्यांत बदलून दाखविले त्याप्रमाणे सबंध महाराष्ट्राचे चित्रदेखील येत्या ५ -६ महिन्यांत बदलल्यावाचून राहाणार नाही. कारण This is now a proved experiment.

हे घडू शकते याविषयी आता कोणाच्याही मनात शंका येण्याचे कारण नाही. याची गरज केवळ पुण्यात आहे असे नसून ज्या ज्या ठिकाणी कुटुंबे राहतात त्या त्या ठिकाणी आहे हे स्पष्ट झाले आहे. ही रचना झाल्यानंतर जे समाजाचे शोषण करीत असतील त्यांना जरूर धक्का बसेल. परंतु समाजाचे शोषण करणाऱ्या वर्गाला आम्हाला धक्का बसेल ही तक्रार करता येणार नाही. श्री. बिंदुमाधव जोशी यांनी सांगितल्याप्रमाणे कोणाला अकारण धक्का बसावा हाही या चळवळीचा हेतू नाही.

गांधीजींना ही कल्पना आवडली असती का? मी असे मानतो की गांधीजींना ही कल्पना शंभर टक्के आवडली असती. त्यांनी म्हटले असेत की मी हेच सांगण्याचा प्रयत्न करतो आहे की, "आपले प्रश्न सोडविण्यासाठी आपल्या पायांवर उभे राहा. अकारण अन्याय होत असेल त्या ठिकाणी सामर्थ्यानिशी उभे राहा. परंतु संयमाने उभे राहा. कोणत्याही वर्गाविषयी, कोणत्याही गटाविषयी मनात विद्वेष बाळगू नका. परंतु त्या गटांना तुमच्या सामर्थ्याचा प्रत्यय या विधायक मार्गाने आणून द्या की त्यांचेदेखील परिवर्तन झाल्याखेरीज राहणार नाही; आणि एक नवीन समाज, लोकशाहीप्रेमी समाज या मार्गाने निर्माण होईल." गांधीजींचे हे स्वप्न पुन्हा कदाचित् आकार घेईल अशी एक भाबडी आशा माझ्या मनात पुन्हा वावरू लागली आहे.

जिला एक अमुलाग्र क्रांती म्हणता येईल त्या संपूर्ण क्रांतीची बीजे या रचनेत आढळतात. ही बीजे आकार कसा घेतील हा आपणा सर्वांच्यापुढे असलेला प्रश्न आहे.

(उद्घाटन भाषण - सुमारे तीन दशकांपूर्वी)

☑ ☑ ☑

## किर्लोस्कर मासिक... हायकोर्टात

### अशोक कुलकर्णी

सहकारी साखर कारखानदारीतील गैरव्यवहारांची हायकोर्टात गंभीर दखल...

साखर कारखाना अनुदानात पन्नास हजार कोटींचा घोटाळा...

साखर आयुक्तांना खुलासा करण्याचे आदेश...

What ails sugar industry? Courts poser to state...

अशा अनेक ठळक बातम्यांनी २७ एप्रिल २००६ रोजी महाराष्ट्रात एकच खळबळ माजवून दिली आणि सहकार सम्राटांचे धाबेच दणाणले.

आपल्या देशात काही खरं नाही, या देशाला आता कोणी वाचवू शकणार नाही, ही भावना सामान्य माणसांत सर्वत्र बळावलेली असून आपण भले आणि आपले काम भले, या चौकटीत लोकांनी स्वत:ला बांधून घेतलं आहे. मात्र एक छोटा माणूस असून देखील सहकारी साखर उद्योगाची परिस्थिती जवळून पाहून मी अस्वस्थ झालो. आपल्याला काय त्याचे, असा संकुचित विचार न करता, सहकारातील गैरव्यवहाराबाबत, भ्रष्टाचाराबाबत, अकार्यक्षमतेबाबत आवाज उठवायचा असे मी ठरविले. मी गेली अनेक वर्षे






सहकारी साखर उद्योगांत पुरवठादार, सल्लागार म्हणून काम करीत आहे. या उद्योगात वावरत असताना सहकाराच्या नावाखाली सामान्य शेतकऱ्याला व तिथल्या कामगारांना रसातळाला लोटणाऱ्या सत्ताधाऱ्यांचे कुटील राजकारण मी जवळून पाहिले आहे. माहितीच्या अधिकाराखाली अनेक गोष्टींची माहिती गोळा करून एक सविस्तर टिपणी तयार केली व सर्व पुराव्यानिशी ती पुण्या - मुंबईतील प्रमुख वर्तमानपत्रांच्या संपादकांकडे पाठविली. अनेक संपादकांना प्रत्यक्ष भेटूनही त्याबाबत सविस्तर चर्चा देखील केली; पण ती टिपणी प्रसिद्ध झाली नाही.

माझ्या विनंतीला वाटाण्याच्या अक्षता लागल्या. या संपादकांचे मन वळविण्याचा प्रयत्न करणे निरर्थक ठरणार हे ओळखून शेवटी सहज म्हणून मी ती टिपणी किर्लोस्कर मासिकाच्या संपादकांकडे प्रसिद्धीसाठी पाठविली. आणि आश्चर्य म्हणजे त्यांनी ती 'कव्हर स्टोरी' म्हणूनच त्यांच्या एप्रिल २००५ च्या अंकात 'साखर उद्योगाचे कोडकौतुक थांबवा' ह्या शीर्षकाखाली बेधडक प्रसिद्ध केली. दैनिक वृत्तपत्रांचे संपादक हात राखून वागत असताना किर्लोस्कर मासिकाने मात्र सामाजिक हिताच्या एका प्रश्नाकडे साऱ्यांचे लक्ष वेधून घेतले. अर्थात, किर्लोस्करच्या सामाजिक जबाबदारी पुढाकार घेऊन पार पाडणाऱ्या परंपरेशी ते सुसंगतच होते. सामाजिक कामाचा विचार करणाऱ्या माझ्यासारख्या सामान्य माणसाने मात्र दैनिकांची वागणूक लक्षात घेऊन निराश होऊ नये आणि आशा सोडू नये असा धडा या निमित्ताने मला मिळाला.

राजकारण, सहकारी साखर कारखानदारी, साखर उद्योग हे खरे तर दैनिक वृत्तपत्रांचे प्राधान्याचे विषय! परंतु आर्थिक हितसंबंध आडवे यायला लागले की, निर्भीड पत्रकारिता देखील गुंडाळुन बाजुला ठेवली जाते असा अनुभव या निमित्ताने आला. किर्लोस्कर मासिकाने मात्र एप्रिल २००५ च्या अंकात खास लेख म्हणून माझी टिपणी प्रसिद्ध केली. जीवननिष्ठ, समाजनिष्ठ, शेतीनिष्ठ अशा चळवळींना किर्लोस्करने आपल्या अंकातून नेहमीच प्राधान्य दिले आहे. त्यांच हे समाजप्रबोधनाचं काम निश्चितच वाखाणण्यासारखं आहे.

सहकारी उद्योग डबघाईला का आला? याची शहानिशा दैनिक वृत्तपत्रांचे संपादक करीत नाहीत, अनुदान, कर्ज, पॅकेजेस, मदतीच्या रुपाने हजारो कोटी रुपये सहकारी साखर कारखान्यांचे संचालक व चेअरमन लाटत असताना त्याविषयी कोठे विरोधी सूरही, ही दैनिक वृत्तपत्रे व त्यांचे वार्ताहार उमटवीत नाहीत. उलट जनतेची दिशाभूलच करण्यात ते मशगूल असतात. अशा स्थितीत 'साखर उद्योगाचे कोडकौतुक थांबवा' हा लेख किर्लोस्करने छापून साखर कारखानदारीतील गैरप्रकार चव्हाट्यावर आणण्यास मोठीच मदत केली आहे.

त्या लेखाच्या शेवटी भ्रष्टाचाराला नाहीसे करायचे असेल, तर मातब्बर साखर उद्योगातील सम्राटांवर जनहित याचिका दाखल करण्याशिवाय आता गत्यंतर नाही, असा निष्कर्ष मी काढला होता. माझा हा अभ्यासू लेख वाचून साखरसम्राट अस्वस्थ झाले. अनेकांनी किर्लोस्कर मासिकाच्या ऑफिसशी संपर्क साधून अजून अंक विकत घेतले व आपल्या नेत्यांना वाचायला दिले. काहींनी अंकाच्या झेरॉक्स प्रती काढून सर्वत्र वाटल्या. आणखी एक आश्चर्य म्हणजे सहकारी साखर उद्योगाला पाठीशी घालणाऱ्या कृषी उद्योगाशी संबंधित दिल्लीच्या एका जेष्ठ नेत्याने किर्लोस्कर मासिकाचा अंक आपल्या चेल्याच्या अंगावर फेकून मारत, 'आतातरी शहाण्यासारखे वागा' असा सल्लाही त्यांना दिला. एकूणच ह्या अंकाने महाराष्ट्रातील सहकारी साखर उद्योगात प्रचंड खळबळ माजवली. अनेकांनी प्रत्यक्ष भेटून, फोनवर बोलून, पत्र पाठवून, मी परखडपणे लिहिल्याबद्दल माझी प्रशंसा केली. काहीजणांनी तर मीच जनहित याचिका दाखल करावी, असा सल्लाही दिला.

सहकारी साखर कारखाना उभा करण्यासाठी फक्त दहा टक्के भांडवल शेतकऱ्यांचे असते व नव्वद टक्के भांडवल जनतेच्या कररुपाने शासनाकडे जमा होणाऱ्या पैशातून उभे केले जाते. मात्र साखर उद्योगांतील भ्रष्टाचार आणि गैरव्यवस्थापन सामान्य माणूस उदासीनतेने पाहत राहतो. आपला याच्याशी काही संबंध आहे असे शहरी करदात्याला वाटतदेखील नाही. या उदासीनतेनेच साखरसम्राटांचे फावते.

किर्लोस्कर मासिकांतून प्रसिद्ध झालेल्या माझ्या खास लेखामुळे आणि अनेकांच्या आग्रहाने मीच का जनहित याचिका दाखल करु नये, असा प्रश्न माझ्या मनात निर्माण झाला. त्याबाबत मी अनेक ज्येष्ठ वकिलांशी चर्चाही केली; पण त्यांची भलीमोठी फी पाहून माझा धीरच खचला.

हायकोर्टात फक्त केस दाखल होईपर्यंतची फी लाखाच्या पुढे होती. आता काय करायचे हा गंभीर प्रश्न माझ्यासमोर उभा राहिला. स्वत:च जनहित याचिका दाखल करून ती कोर्टात लढविणे यासाठी भरपूर पैशांची जरुरी होती. सगळे हिशोब लाखाच्या पुढेच होते. ते माझ्या एकट्याच्या आवाक्यातले नव्हते.

शेवटी माझ्या मनात एक विचार आला, आपण जी माहिती गोळा केली आहे त्यावर एक सविस्तर टिपणी तयार करावी, सोबत किर्लोस्करचा अंक जोडावा आणि हायकोर्टाच्या मुख्य न्यायाधीशांना एक पत्र पाठवावे. माझ्या टिपणीतील मुद्दे व त्याच मुद्यांच्या आधारे महाराष्ट्र शासनास त्याचे स्पष्टीकरण कोर्टाने विचारावे, ह्या विचाराने मी एक सविस्तर टिपणी तयार केली, माहितीच्या अधिकाराखाली मिळवलेली माहिती त्यास जोडली, किर्लोस्करचा अंकही जोडला आणि तारीख १५ जून २००५ रोजी सगळी कागदपत्रे हायकोर्टाला साध्या पोस्टाने पाठवून दिली.

तारीख २६ एप्रिल २००६ रोजी माझ्या पत्राबाबत खुलासा करण्यासाठी मला हायकोर्टात हजर राहण्याचे कोर्टाचे पत्र आले. मी स्वत: हायकोर्टात हजर राहिलो. मराठीतून युक्तिवाद केला. त्यादिवशी कोर्टात काय घडले याची थोडक्यात माहिती होण्यासाठी २७ एप्रिल २००६ रोजीच्या लोकमतमध्ये आलेली बातमीच पुढे देत आहे......

साखर आयुक्तांना खुलासा करण्याचे आदेश..... साखर कारखान्यातील गैरव्यवहार

मुंबई दि. २६ (प्रतिनिधी) : राज्यातील साखर कारखानदार राजकीय हितसंबंधाचा लाभ घेऊन खोटी कारणे देतात आणि लाखो रुपयांचा सरकारी निधी हस्तगत करतात. या आरोपांवर सविस्तर खुलासा करण्याचे आदेश मुंबई उच्च न्यायलयाचे मुख्य न्यायमूर्ती क्षितिज व्यास व न्यायमूर्ती धनंजय चंद्रचूड यांनी आज दिले.

पुण्यातील अशोक कुलकर्णी यांनी मुख्य न्यायाधीशांना पाठविलेल्या साखर कारखान्यातील गैरव्यवहाराबाबतच्या पत्राचे रूपांतर न्यायालयाने स्यू मोटो जनहित याचिकेत केले आहे. आज सकाळी या याचिकेवर न्यायालयात सुनावणी झाली. न्या. चंद्रचूड यांनी पत्र व अहवालातील मुद्दे गंभीर असून त्यावर कायदेशीरदृष्ट्या चर्चा होण्याची गरज आहे, असे सांगितले. कारखान्यांना परवानगी देण्यातील नियम व तरतुदी आणि याचिकेतील आरोप यावर माहिती देण्याचे आदेश खंडपीठाने आयुक्तांना दिले आहेत.

युक्तिवाद करताना कुलकर्णी यांनी न्यायालयाला सांगितले की, गेल्या कित्येक वर्षांपासून राज्यात शंभरहून अधिक असलेल्या कारखान्यांमध्ये गलथानपणाचा आणि फसवणुकीचा व्यवहार चालू आहे. केंद्र व राज्य सरकारकडून कोट्यवधींचा निधी साखर कारखानदारांसाठी मंजूर केला जातो; पण ज्या ठिकाणी ऊसच पिकत नसेल किंवा उसाचे उत्पादन पुरेसे नसेल त्या ठिकाणी कारखाने सुरू करण्याची परवानगी देण्याची काहीच गरज नसते; पण साखर आयुक्त आणि प्रस्थापित राजकीय नेते या बाबींकडे डोळेझाक करतात. साखर कारखानदारी मंत्र्यांच्याच हातामध्ये असल्यामुळे त्यातील गैरव्यवस्थापन व भ्रष्टाचारी कारभारावर कधीही प्रकाशझोत पडत नाही. याच कारणांमुळे जे कारखाने कधीचेच बंद पडायला हवेत आणि ज्या कारखान्यांमध्ये आज रखवालदारही नाही, अशा कारखान्यांनादेखील सरकारकडून लाखो रुपयांचे कर्ज व आर्थिक साहाय्य बहाल केले आहे.

सकाळ, लोकसत्ता, लोकमत, महाराष्ट्र टाईम्स, पुढारी, इंडियन एक्सप्रेस, सामना, अशा दैनिकांत रकानेच्या कराने भरून 'मुंबई हायकोर्टात जनहित याचिका.... साखरसम्राटांचे धाबे दणाणले.... साखर आयुक्तांना प्रतिज्ञापत्र सादर करण्याचे आदेश....' अशा मथळ्याखाली बातम्या प्रसिद्ध झाल्या.

सामान्य शेतकऱ्यांच्या हितासाठी 'नाबार्ड' ने काही ठोस भूमिका घेण्याची मागणी करणे आणि भ्रष्ट व्यवहार व गैरकामामुळे सोयीस्करपणे 'आजारी' पडलेल्या साखर कारखान्यांसाठी 'पॅकेज'ची मागणी करणे यात फार मोठा फरक आहे. शेतकऱ्यांच्या हितासाठी साखर कारखाने कितपत प्रामाणिकपणे चालविले जात आहेत, याचा लेखाजोखा करण्याची वेळ आली आहे. केवळ राजकीय स्पर्धेतून, वैयक्तिक स्वार्थातून उभे राहिलेले व शेतकऱ्यांची पिळवणूक करून पुन्हा 'आजारी' पडलेले कारखाने सरकारने का पोसायचे? त्यांच्या आजारपणाची खरी कारणे शोधायला नकोत का? शेतकऱ्यांच्या पैशाचा आणि शासकिय निधींचा वापर करून उभारण्यात आलेल्या साखर कारखान्यांची स्थिती का व कोणामुळे बिघडली? हे न पाहता त्यांना सरसकट मदत देणे मुळीच समर्थनीय नाही. 'आजारी' कारखान्यांसाठी मदत








देणे एकवेळ समजू शकते; पण सर्वच साखर कारखान्यांसाठी मदत देणे, पॅकेज देणे हे फारच झाले!

सहकारी क्षेत्रातील काही साखर कारखाने अतिशय उत्तम चालले आहेत. खाजगी क्षेत्रालाही लाजवेल अशी त्यांची कार्यपद्धती आहे. अशा कारखान्यांचा आदर्श तथाकथित 'आजारी ' कारखान्यांनी का घेऊ नये? अनेक सहकारी साखर कारखान्यांची स्थिती आज शोचनीय बनलेली आहे. काहीतर बेवारस झाले आहेत. शासन त्यांचेच असले आणि सहकारी क्षेत्राबाबत सर्वांनाच सहानभूती असली, तरी सरकारी साखर कारखान्यांना दिला जाणारा पैसा जनतेचा आहे, त्याचा वापर योग्य प्रकारे होतो का नाही, हे पाहण्याचा अधिकार जनतेला आहे. सहकारसम्राटांचे हितसंबंध जपण्यापेक्षा सर्वसामान्य शेतकऱ्यांच्या व जनतेच्या हितासाठी त्याचा वापर झाला पाहिजे. सामान्य शेतकऱ्याला उसाला रास्त भाव मिळाला पाहिजे, असे मी कोर्टाच्या निदर्शनास आणले.

तारीख १२ जुलै २००६ रोजी ॲड. रमेश डी. सोनी (ॲमेकस क्युरी) यांनी माझ्या टिपणीला कायद्याच्या चौकटीत बसवून, त्यांचा अहवाल कोर्टाला सादर केला. त्यावर मी स्वत: व श्री. सोनी यांनी युक्तिवाद केला.

आमचा युक्तिवाद व अहवाल यावरुन स्पष्ट होणारे चित्र पाहता नव्या साखर कारखान्यांना परवानगी देण्यास मनाई करणारा आदेश द्यायला हवा, याविषयी आपली खात्री झाली असल्याचे न्यायमूर्ती आर. के. लोढा आणि न्यायमूर्ती डॉ. धनंजय चंद्रचूड यांनी नमूद केले आणि राज्यात कोणताही नवीन सहकारी साखर कारखाना सुरू करण्याची परवानगी देण्यास राज्य सरकार आणि साखर आयुक्त यांना मनाई करणारा अंतरिम आदेश मुंबई उच्च न्यायालयाने दिला. सोनी यांनी सहकारी साखर कारखान्यातील भ्रष्टाचाराबाबत गंभीर दखल घेण्याची गरज न्यायमूर्तींच्या खंडपीठापुढे मांडली.

न्यायालयाने साखर आयुक्त यांना सोनी यांच्या अहवालासंबंधी सविस्तर माहिती देणारे प्रतिज्ञापत्र दोन आठवड्यात दाखल करण्याचे आदेश दिले. सध्या न्यायालयात पुढील कारवाई चालू असून, कोर्टाच्या माध्यमातून सामान्य शेतकऱ्यांना व कामगारांना न्याय मिळण्याची आशा आहे. आपल्या देशात न्यायव्यवस्था किती जिवंत व कार्यक्षम आहे याचाच अनुभव माझ्यासारख्या सामान्य माणसाला ह्या एकूणच प्रकरणावरून आला आहे.

मार्क्सवादी विचारसरणीनुसार शासनव्यवस्था विलयास जाणे अभिप्रेत असून, तो क्रांतीचा सर्वोत्तम क्षण समजला जातो. आपण एकविसाव्या शतकात पदार्पण करताना भ्रष्टाचाराने शासनव्यवस्था विलयास गेलेली आहे आणि त्यामुळे सहकाराबरोबरच सर्वच क्षेत्रात मोठीच वाताहात झाली आहे. राजकीय गुन्हेगारी ही आता सामान्य माणसाच्या जीवनाचा भागच झाली आहे आणि गंभीर म्हणजे त्याचं कुणाला सोयरसुतक राहिलेलं नाही. अत्युच्चपदावर काम करणारे अनेक अधिकारी, मंत्री आता तुरुंगाची हवा खाताना दिसतात. सर्व थरातील लोक ह्या राजकीय गुन्हेगारांची चर्चा चवीने करताना दिसतात. वाढत्या गुन्हेगारीच्या नावाने बोटंही मोडतात; पण त्याबाबतच्या उपाययोजनांच्या अभावाबाबत शासनाला क्वचितच जाब विचारतात. शासनकर्ते तर आपण त्या गावचेच नाही असा अविर्भाव आणतात. आपली सर्वच प्रसिद्धी माध्यमं या वास्तवाकडे अपवादानेच गंभीरपणे पाहतात. संपूर्ण शासनव्यवस्थेलाच कीड लागल्यामुळे भ्रष्टाचाराच्या संघटित गुन्हेगारीनं राज्यात खोलवर पाय रोवले आहेत. मात्र ही परिस्थिती प्रयत्नशील दिसत नाही. त्यांच्यातील अनास्था आणि इच्छाशक्तीचा अभाव यामुळे भ्रष्टाचाराशी सामना करायला सर्वच कमालीचे कमी पडत आहेत.

नुकताच नोबेल पुरस्कार मिळालेल्या 'मॅक्सवेल कोएन्सी' यांनी एका महत्त्वाचा प्रश्न उपस्थित केला आहे. ते म्हणतात, 'अशा वाईट परिवर्तनाचं वारं कितीही सुसाट वाहिलं, तरी त्याच्या वेदना मात्र फक्त सामान्य माणसाला सोसाव्या लागतात.'

राजकीय नेत्यांचा स्वार्थाने बरबटलेला चेहरा पाहून कोएन्सी यांचा विश्वास सामान्य माणसावरच आहे.

कारण शेवटी सर्व मुल्यांचं अधिष्ठान सामान्य माणूसच आहे. सामान्य माणसाला स्वार्थी राजकारण्यांनी कितीही मारलं, तरी तो मरत नाही, हे अंतिम सत्य आहे. आपल्या इतिहासात असे शेकडो दाखले आहेत की, प्रसंगी सामान्यातल्या सामान्य माणसाच्या निर्णयाने इतिहास बदलला आहे. म्हणून कोएन्सी यांच्या विचाराने प्रभावित होऊन माझ्यासारख्या सामान्य माणसानं सहकारी साखर उद्योगाच्या भ्रष्टाचाराबाबत शेवटचा उपाय म्हणून ही जनहित याचिका दाखल केली आहे.








मी ह्या याचिकेद्वारे मा. कोर्टास खालील मागण्या केल्या आहेत -

राज्यातील सर्व सहकारी साखर कारखान्यांची, त्यांची स्थापना झाल्यापासूनच्या कालावधीतील भ्रष्टाचाराची, गैरकारभाराची सखोल चौकशी, निपःक्ष आयोगामार्फत करण्यात यावी. त्यासाठी इन्क्वायरी ॲक्ट मधील तरतुदींनुसार हायकोर्ट अथवा सुप्रीम कोर्टाच्या कमीत कमी तीन न्यायाधीशांचा चौकशी आयोग नेमण्यात यावा.

सहकार चळवळ व साखर कारखानदारीतील भ्रष्टाचार, गैरव्यवस्थापन, अकार्यक्षमता, अनाचार, राजकीय हस्तक्षेप व राजकारणासाठी वापर इत्यादी बाबींची सखोल चौकशी करुन त्यास जबाबदार व दोषी असणाऱ्या संचालक मंडळावर, अधिकारी, पदाधिकारी इत्यादीं विरुद्ध कडक कारवाई करण्यात यावी व साखर कारखान्याचे आणि पर्यायाने सभासदांचे आणि करदात्यांचे झालेले नुकसान त्यांची खाजगी मालमत्ता जप्त करून वसूल करावे.

ज्या भागात कधीही पुरेसा ऊस उपलब्ध होणार नाही हे माहीत असूनही ज्यांनी नवीन कारखाने काढले, ऊस नसताना उत्पादनवाढ केली, राज्यसरकारचे व वित्तीय संस्थांचे करोडो रुपये बुडविले, करोडो रुपयांचे व्याज बुडविले, त्या सर्व कारखान्यांच्या संचालक मंडळावर तसेच त्यांना साखर कारखाना उभा करण्यास, विस्तारवाढ करण्यास ज्या अधिकाऱ्यांनी शिफारस केली, त्यांच्यावर व राज्यसरकारमधील संबंधित अधिकाऱ्यांवर नुकसान भरपाई वसुलीसाठी सर्व प्रकारची फौजदारी व दिवाणी कारवाई करण्यात यावी.

जे कारखाने चांगले चालत आहेत अथवा सर्व साखर कारखान्यांसाठी दुरुस्ती करुन चालू शकतील अशा सर्व साखर कारखान्यांसाठी तातडीने वास्तववादी अशी पुनर्वसन योजना तयार करण्यात यावी व तिची अंमलबजावणी करत असताना शिस्तीचे काटेकोर पालन करण्यात यावे. त्यासाठी एक स्वतंत्र नियंत्रण समिती स्थापन करण्यात यावी. त्या समितीत राजकीय हस्तक्षेप नसावा व त्या समितीस तिची अंमलबजावणी, निरीक्षण, पुनर्विचार इत्यादी बाबतीत पूर्ण अधिकार देण्यात यावेत.

राज्याच्या सहकारी साखर कारखान्यांवर नियंत्रण ठेवणारे साखर आयुक्त कार्यालय पूर्णपणे अकार्यक्षम असून त्यांची कार्यपद्धती सदोष व भ्रष्टाचाराने बरबटलेली आहे. त्यासाठी साखर आयुक्तालयाची पुनर्रचना करून तेथे पारदर्शी, कार्यक्षम व शिस्तनिष्ठ कारभार असणे आवश्यक आहे. सबब ज्येष्ठ अधिकाऱ्यांच्या समितीमार्फत आयुक्तालयाच्या पुनर्रचनेचा प्रस्ताव तयार करण्यात येऊन, त्याप्रमाणे दुरुस्ती करण्यात यावी.

साखर कारखानदारीचे वाढते महत्त्व व व्याप्ती लक्षात घेता सहकार खात्यांचे विभाजन करून, स्वतंत्र असे साखर खाते निर्माण करण्यात यावे.

माझा विश्वास आहे, ह्या जनहित याचिकेच्या माध्यमातून सामान्य शेतकऱ्यांना व कामगारांना निश्चितच न्याय मिळेल. आपण सर्वजण एकामागून एक असल्या भ्रष्टाचाराच्या, गैरकारभाराच्या चक्रव्यूहात सापडत असतो. त्या चक्रव्यूहातून बाहेर पडण्याची वाट बंद झाली आहे असेही आपणांस केव्हातरी वाटते. अशावेळी स्वस्थ बसलो तर संपलेच! पण धीर सोडला नाही व वाट काढण्याची खटपट चालू ठेवली, तर आपल्याला त्या चक्रव्यूहातून बाहेर पडायला बारीकशी फट तरी मिळेल. अशीच एक फट मला सापडली. ती म्हणजे किर्लोस्कर मासिक! किर्लोस्कर मासिकाच्या संपादकांच्या सहकार्यानेच मी हे भव्य दिव्य करु शकलो. त्यांच्या निर्भीडतेचे हे एक मोठे प्रतीकच आहे.

(किर्लोस्कर, मार्च २००७)

☑ ☑ ☑

- माहितीचा आधिकार
- महिलांचे विविध शोषणापासून संरक्षण
- स्थानिक स्वराज्य संस्थात महिलांचे प्रतिनिधित्व

आदि अनेक कायदे होत आहेत. मुख्य प्रश्न पक्षातीत जनजागरणाचा व जनसंघटन यांचा आहे.




अनुक्रमणिका





## ▶ समीक्षण - चिंतन ◀

# कुरुक्षेत्रीच्या युद्धाचा वेगळा वेध

अ० द० मराठे

महाभारत हे आर्षकाव्य कोणालाही लोभात पाडणारे आहे. मग ते मूळ संस्कृत वाचणारा असो की भाषांतरित वाचणारा असो. कालिदास म्हणतो, 'कामी स्वतां पश्यति।' (शाकुंतल २.२) वाचणाऱ्या प्रत्येक 'कामीला' त्यात 'स्वता' दिसतेच. आधुनिक अण्वस्त्रांपासून तो राज्यशास्त्रांपर्यंत, वाचणाऱ्याला त्याच्या बौद्धिक मगदुराप्रमाणे काही तरी मिळतेच. महाभारताच्या चिकित्सक आवृत्तीचे मुख्य संपादक डॉ. वि. सी. सुखटणकर महाभारताविषयी म्हणतात, 'Next to the Vedas, it is the most valuable product of the entire literature of ancient India, so rich in notable works - Venerable for its antiquity, it is one of the most inspiring monuments of the world and an inexhaustible mine for the investigation of the religion, mythology, legends, philosophy, law, costom, and political and social institutions of ancient India. (Prolegomena, ३).

अशा या महाभारताकडे एका वेगळ्याच दृष्टीने श्री. विश्वास दांडेकर बघतात. ती दृष्टी आहे व्यूहात्मक राजकीय डावपेचांची. हे आपले राजकीय वर्चस्व वाढविणे आपल्याच राज्याला (किंवा देशाला) आर्थिक सत्ता बनविणे यासाठी अन्य राज्यातील (किंवा देशातील) नैसर्गिक साधनसंपत्तीचा बळजबरीने ताबा मिळविणे हा आचार काही आधुनिक काळातील नाही, तो महाभारतकाळापूर्वीपासून आहे. त्याकाळी तो एखाद्या भूभागापुरता किंवा प्रदेशापुरता मर्यादित होता; आज तो जागतिक बनला आहे. दांडेकरांच्या या लेखनात 'इति ह आस' केंद्रस्थानी आहे. त्याला भूगोल, राज्यशास्त्र, अर्थशास्त्र, समाजशास्त्र आणि युद्धशास्त्र यांची जोड आहे. महाभारतकथेमागच्या इतिहासाचा वेध घ्यायचा म्हटल्यावर महाभारताकडे बघण्याची दृष्टीच बदलावी लागते. या अभ्यासात भावुकता, भाषेचा फुलोरा, व्यक्तीपूजा, चमत्कारांवर श्रद्धा आणि त्यांचे समर्थन किंवा अतार्किक स्पष्टीकरण या गोष्टी पूर्णपणे दूर ठेवाव्या लागतात. अभिनिवेष बाजूला सारून बौद्धिक कसोटीवर उतरेल असेच विवेचन करावे लागते. दांडेकर यात किती यशस्वी झाले आहेत याचा विचार करण्यापूर्वी हे विवेचन सारांश रूपाने जाणून घेणे आवश्यक आहे.

प्राचीन भारतात (प्रस्तुत ठिकाणी महाभारत काळी) गणराज्य नावाची एक राज्यव्यवस्था होती. आधुनिक लोकशाहीचे हे आद्य व प्राथमिक रूप होते. ही गणतंत्रे स्वयंपूर्ण आणि संपन्न होती. पशुपालन, शेती आणि आनुषंगिक उत्पादने आणि त्यांचा व्यापार एवढ्यावर या गणराज्यांच्या गरजा भागत होत्या. प्रत्येक काळी आणि स्थळी समाजात जिज्ञासु, साहसी, महत्त्वाकांक्षी आणि अनुपलब्धाचा शोध घेणारी माणसे असतातच. असलेल्याचा प्रसार, विस्तार करण्याची, नवीन गोष्टींचा शोध घेण्याची गरज त्यांच्या बुद्धीला भासत असते. त्यातून नव्या नैसर्गिक संपत्तीचा शोध घेणे, त्यातून नवी उत्पादने करणे, जुनी तंत्रे सुधारत प्रगत बनविणे, यांची गरज भासत असते. मात्र त्यातून संपत्तीची वाढ, आर्थिक हितसंबंध या गोष्टी अपरिहार्यपणे येतात. परिणामी प्रादेशिक मर्यादा आणि अधिकारलालसा विस्तारत जातात.

तांबे आणि लोखंड या खनिज धातूंच्या प्रदेशावर किंवा प्रदेशांवर एकाच व्यक्तीचा अंमल ही पद्धत अर्थात राजा, सम्राट या एकाधिकार पद्धतीचा प्रादुर्भाव झाला. या राजे सम्राटांनी गणराज्ये नष्ट करून साम्राज्ये स्थापन केली. असेच एक साम्राज्य होते मगधाधिपती जरासंधाचे. मात्र ही साम्राज्यनिर्मिती परंपरेला मान्य नव्हती. त्यामुळे जरासंधाने खालसा केलेली (किंवा करविलेली) अंधक, वृष्णी, कुक्कुर, भोज या जमातींच्या यादव संघाचे गणराज्य पुन्हा प्रस्थापित करण्याचे प्रयत्न झाले. या प्रयत्नांचा नेता होता वृष्णी गणातील कृष्ण.

यादवांचे हे गणराज्य मथुरा व आजूबाजूच्या

अनुक्रमणिका








व्रजप्रदेश या भूभागात होते. तेथे कंस हा कुक्कुर गणातील राजा होता. त्याला जरासंधाचा पाठिंबा होता. जरासंधाने आपल्या अस्ति आणि प्राप्ति या दोन मुली देऊन त्याला जावई करून घेतले होते. या घटनेचा राजकीय अर्थ असा की जरासंधाचा कंसाला पाठिंबा होता आणि त्याला भारताचा एकछत्री सम्राट व्हायचे होते. येथे थोडा भूगोलाचा विचार करणे आवश्यक आहे. मगधाच्या पश्चिमेला पांचालांची राज्यसत्ता होती. तिच्या वायव्येला कुरूंची राजसत्ता होती. कुरु आणि पांचाल यांच्यामध्ये पाचर मारल्यासारखे यादवांचे गणराज्य होते. कंस या राजाच्या रूपाने जर ही पाचर घट्ट होत असेल तर पांचालांवर मगधाचा दबाव निर्माण होणार होता. मगधाने पांचालावर हल्ला केला तर कंसाचे मथुरेचे राज्य पांचालांचे पार्ष्णिग्राही शत्रु म्हणून उपयुक्त होणार होते. जरासंधाचा साम्राज्य-विस्ताराचा असा व्यूह होता. कंसाला जावई करण्यामागे हे अंतस्थ राजकारण असेल!

कंसाने यादवगणराज्य पद्धतीचा सभाध्यक्ष असलेल्या उग्रसेनाला कैद केले. नंद-वसुदेव या ग्रामप्रमुखांवर निर्बंध लादले. कंसामुळे आपल्या गणराज्याचे राजेशाहीत रूपांतर व्हावे हे वृष्णी संघाच्या काही तरुणांना पटले नाही. त्यांनी संधी साधून कृष्णाच्या नेतृत्वाखाली कंसाला ठार मारून पुन्हा गणराज्य स्थापन केले. मात्र याची फार मोठी किंमत यादवांना द्यावी लागली. कंसाचा मृत्यू हा जरासंधाच्या दृष्टीने केवळ जावयाचा मृत्यू नव्हता; तर त्याच्या राजेशाहीच्या विस्तारप्रयत्नांना अचानक पडलेली ती खीळ होती. त्याने सूड घेण्यासाठी यादवांवर सैन्य पाठवले. या छोट्या सैन्याचा यादवांनी पराभव केला. मात्र याहून मोठा प्रतिकार करणे यादवांना शक्य नव्हते. त्यांना मथुरा-व्रजभूमी सोडून पश्चिम किनाऱ्याच्या बाजूला सोरठ येथे स्थलांतर करावे लागले. हा प्रदेश यादवांच्या पशुपालन, शेती या उपजीविकेच्या साधनांना अनुकूल तर होताच; पण व्यापार हा एक नवा व्यवसाय इथे यादवांना लाभला. इथे स्थिरस्थावर होण्यात दीर्घकाळ गेला. पण हा भाग जरासंधाच्या आक्रमणापासून पूर्ण सुरक्षित राहिला. सोरठवर हल्ला करून यादवांना नष्ट करणे जरासंधाला भौगोलिकदृष्ट्या अवघड होते. मात्र तितकेच व त्याच कारणांनी जरासंधावर हल्ला करून त्याला ठार मारणे यादवांनाही अशक्य होते. यासाठी यादवांना कुरुसाम्राज्यावर अवलंबून राहणे भाग होते. पण कुरुराज्य यादवांच्या सांगण्यावरून जरासंधावर थोडेच हल्ला करणार होते! कृष्णाला संधीची वाट पाहत थांबणे आवश्यक होते.

कुंती पांडवांना घेऊन हस्तिनापुराला आली. पांडव वयाने लहान होते. त्यांच्या आवश्यक शिक्षणाची सोय कौरव राजपुत्रांसह झाली. मात्र कौरव पांडव भावंडात या काळापासून वैराची बीजे रुजू लागली होती. पांडवांमधील भीमाला मारण्याचा प्रयत्नही झाला. पांडव मोठे झाल्यावर आणि ते प्रजाजनांत प्रिय ठरू लागल्यावर त्यांचा पद्धतशीर काटा काढण्याचा प्रयत्न झाला. तो होता वारणावत येथे लाक्षागृहात पांडवांना जाळून मारण्याचा. कृष्णाचे हेर त्याला हस्तिनापुराच्या वार्ता देत होते. पांडव लाक्षागृहातून सुखरूप बाहेर पडले आणि द्रौपदी स्वयंवराला पांचाल देशात गेले. ही वार्ता कृष्णाला कळली आणि त्याने ही संधी साधली. पांडवांशी संधान बांधायला तो ससैन्य द्रौपदीस्वयंवराला उपस्थित राहिला.

हस्तिनापुरच्या कुरू साम्राज्याला वारस नव्हता. युवराजपदावर असलेल्या भीष्माने घेतलेला ब्रह्मचर्याचा निर्णय राज्य डोळ्यासमोर न ठेवता पिता डोळ्यासमोर ठेवून घेतला होता. शंतनु-सत्यवतीचा मुलगा चित्रांगद युद्धात मारला गेला होता. धाकटा विचित्रवीर्य अती कामुकतेमुळे क्षयरोगी होऊन निपुत्रिक मरण पावला होता. त्यामुळे हस्तिनापुरला वारस राहिला नाही. विचित्रवीर्याच्या विधवांना नियोगाने दोन पुत्र झाले; पण त्यातील थोरला धृतराष्ट्र अंध म्हणून राज्याधिकारी होण्यास अपात्र ठरला. दुसरा मुलगा पांडू राज्याधिकारी झाला, पण त्याला काही अगम्य रोग होता. धृतराष्ट्र-पांडु हे सुद्धा दीर्घकाळ निपुत्रिक होते. तशातच पांडु एकाएकी राज्यत्याग करून कुंती-माद्री यांच्यासह वनात गेला. तिथे त्याला नियोगातून कुंतीपासून तीन व माद्रीपासून दोन असे पाच पुत्र झाले. धृतराष्ट्र तोवर निपुत्रिकच होता. पुढे त्याला दुर्योधनादी पुत्र झाले. पण ते युधिष्ठिराहून लहान होते. कुंती मुलांसह हस्तिनापुरात आली आणि राज्य कुणाचे हा प्रश्न उपस्थित झाला.

पांडूला आणि धृतराष्ट्राला दीर्घकाळ मूल नव्हते. पांडू राजा होता. त्याने नियोगाने पुत्रोत्पत्तीची कल्पना मांडली असती तर गांधारीसाठी पांडूची नियुक्ती होऊन राज्य पांडूच्या हातून गेले असते. धृतराष्ट्राचे दुसरे लग्न करून दिले असते तरी तेच झाले असते. अशा परिस्थितीत पांडू वनात गेला आणि

स्वपत्न्यांना नियुक्तीने पुत्रप्राप्ती करून घेतली. कुंती पांडवांना घेऊन परत आल्यावर 'राज्य कुणाचे?' हा प्रश्न पुढे आला. दुर्योधनाच्या दृष्टीने पांडू राज्यत्याग करून वनात गेला हा मुद्दा निर्णायक होता. एकदा राज्य त्यागले म्हणजे अभिषिक्त राजाचे सर्व अधिकार संपले. पांडूच्या पश्चात् धृतराष्ट्र सत्तेवर होता. त्यामुळे पुढच्या पिढीत 'मी राजा; युधिष्ठिर नाही.' हे दुर्योधनाचे म्हणणे होते. पांडवांची बाजू योग्य की दुर्योधनाची याचे योग्य उत्तर कोणाकडेच नव्हते. अशा परिस्थितीत दुर्योधन पांडवांचा द्वेष करु लागला हे अगदी नैसर्गिक होते. धृतराष्ट्राची त्याला फूस होती हे स्वाभाविक होते. या विषयात घराण्यात दुहीची बीजे अपरिहार्य आहेत हे जाणून, कोणाची बाजू घेऊन त्याला खतपाणी घालण्यापेक्षा वाट पाहण्याच्या मार्गाने भीष्म गेला हे सुद्धा योग्य झाले.

वास्तवात लोकमानस, सैन्याचा कल आणि राजकीय स्थिती यांच्या दबावाखाली युधिष्ठिराला युवराजपद देण्याचा निर्णय धृतराष्ट्राला घ्यावा लागला! युधिष्ठिराने मोठ्या दूरदर्शीपणे राज्यात आपले बस्तान बसवले आणि त्याच वेळी धृतराष्ट्र, दुर्योधन, सर्व पांडवांचा एकाच वेळी काटा काढण्याचे कारस्थान रचू लागले. राजकारणाच्या या तीव्र आणि अटीतटीच्या कलहात धृतराष्ट्र-दुर्योधन पांडवांना लाक्षागृहात मारण्याचा प्रयत्न तर फसलाच; पण कुरुंशी शत्रुत्व असलेल्या पांचालांचा - द्रुपद राजाचा - घसघशीत पाठिंबा पांडवाना मिळाला. नेमका याच वेळी कृष्ण या राजकीय तंट्यात घुसला. द्रुपदाच्या दबावाने पांडवांना इंद्रप्रस्थाचे राज्य तोडून द्यावे लागले. ते संपन्न करण्यात त्यांना कृष्णाची मदत मिळाली.

आता पराक्रमी पांडवांना हाताशी धरून जरासंधाचा काटा काढण्याचा डाव कृष्णाने आखला. कृष्णाच्या सल्ल्या-नुसार पांडवांनी राजसूय यज्ञ केला. तत्पूर्वी कृष्णाने कपटयुक्तीने जरासंधाचा वध केला. त्याच्या कैदेतील सर्व राजांना मुक्त करून त्यांना कायमचे उपकृत केले. जरासंधाच्या मुलाला - सहदेवाला- राज्य देऊन आपला अंकित बनवला. राजसूय यज्ञात जरासंधपक्षीय, चेदीचा राजा, शिशुपालाला आकस्मिकपणे ठार मारून जरासंधाचा प्रभाव पूर्ण नष्ट केला. दांडेकरांच्या शब्दात 'एकाच फटक्यात कृष्णाने यादवांचा बलाढ्य शत्रू संपवला, केवळ मित्रपक्ष नव्हे; तर यादवांच्या व व्यक्तिशः कृष्णाच्या उपकाराखाली असलेली इंद्रप्रस्थाची पांडवसत्ता भारताची सम्राट झाली.'

जरासंधपक्षीय राजांनी शिशुपालाच्या नेतृत्वाखाली राजसूय यज्ञात कृष्णाला मारण्याची तयारी ठेवली होती. आणि त्याच वेळी शिशुपालाचा भाऊ शाल्व याने द्वारकेवर चाल करून जायचे असे ठरवले होते. शिशुपालवधामुळे त्याच्या पक्षाच्या राजांचे धैर्य गळाठले आणि ते गप्प बसले. शाल्वाची द्वारकेवर स्वारी हा मात्र कृष्णाला बसलेला अनपेक्षित हादरा होता. कृष्णाने शाल्वाला ठार केला. कृष्णाचे राजकारण आकार घेत होते. दांडेकरांच्या भाषेत 'पांडवांचे राज्य स्थापन झाले, जरासंध ठार झाला, मगध मित्रदेश झाला. पांडव राजसूय यशस्वी करून सम्राट झाले, शिशुपाल मारला गेला. शाल्व मारला जाऊन यादवांचा उत्तरेकडचा मार्ग सुरळीत झाला. यादवांचा दबदबा वाढला.' पांडवांचे बळ वाढवायचे, उत्तर पांचाल द्रुपदाला परत मिळवून द्यायचा, सोरठ स्वतःकडे ठेवत मथुरा पुन्हा व्यापायची असे कृष्णाचे राजकारण होते. पण त्याला हादरा देणारी दुसरी घटना घडली, ती म्हणजे धर्मराज आपले राज्य द्यूतात गमावून बसला.

द्यूत खेळण्यामागे धर्मराजाचा उद्देश हस्तिनापुरचे दुर्योधनाचे राज्य जिंकून घेणे हा होता. द्यूत जिंकण्याचे कौशल्य युधिष्ठिराकडे नव्हते. मात्र जुगाऱ्याचा उन्माद त्याच्याकडे पुरेपूर होता. त्या उन्मादात तो इंद्रप्रस्थाचे राज्य गमावून तर बसलाच; पण तेरा वर्षांसाठी राज्यभ्रष्ट मात्र झाला. यामुळे कृष्णाने हाताशी धरलेले पांडव हातचे गेले. जरासंधाचे मांडलिक असलेले राजे शिशुपाल, शाल्व यांच्या वधामुळे हादरून पांडवांचे मांडलिक झाले होते ते दुर्योधनाला जाऊन मिळाले. पांडवांना हाताशी धरल्याने कृष्ण आणि यादव दुर्योधनाचे शत्रू बनले. कृष्णाचे चार पावले पुढे सरकलेले राजकारण मागे आले. ते पुढे नेण्यासाठी त्याला किमान तेरा वर्षे थांबणे भाग पडले.

युधिष्ठिर-शकुनी यांच्यातील द्यूत हे द्यूताच्या प्रचलित नियमांना अनुसरून झाले, ते कपटद्यूत नव्हते. तसेच ते फाशांनी खेळले नाही. कपटद्यूत फाशांनी खेळणे शक्य नाही. तिथे लबाडी लक्षात येते. ही द्यूतक्रीडा अक्ष म्हणजे बेहड्याच्या फळांनी केली गेली. द्यूत खेळायला विशिष्ट पद्धतीने बांधलेली सभागृहे असत. प्रथम खेळणाऱ्याने भांड्यातील फळे मुठीने उचलून आखलेल्या जागेत टाकत लावलेल्या पणाचा उच्चार करायचा. प्रतिस्पर्ध्याने एका दृष्टिक्षेपात ती पडलेली फळे

अनुक्रमणिका

मोजायची आणि आपला पण सांगत आणखी बेहडे घेऊन खाली टाकायचे. दोघांनी टाकलेली फळे गोळा करून चार चारच्या राशीत मोजायची. फळांच्या संख्येला चारने निःशेष भाग गेला तर दुसऱ्यांदा खेळणारा जिंकला. उलट १-२-३ अशी कितीही उरली तर प्रथम खेळणारा जिंकला. (याचा अर्थ असा की एका दृष्टिक्षेपात फळे मोजणे, त्यांची संख्या सम होईल अशा हिशोबाने झटकन् नेमकी फळे घेऊन ती टाकणे हे कौशल्य द्यूत जिंकण्यास आवश्यक होते.) द्यूताचा अधिक स्थिरावलेला भाग असा होता, प्रथम खेळणाऱ्याने बेहडे टाकायचे. प्रतिस्पर्ध्याने त्यातील कमीतकमी बारा बेहडे हाताच्या पंजाचा एकच झटका मारून बाजूला करायचे. या बेहेड्यांची सुद्धा संख्या चारने निःशेष भाग जाणारी असली तर प्रतिस्पर्धी जिंकला.

दोघांच्याही पणाचे मूल्य समान किंवा समकक्ष असणे आवश्यक. जाहीर केलेला पण जिंकणाऱ्याला देण्याची व्यवस्था पूर्ण करीपर्यंत द्यूतसभा सोडून जाण्याची हरणाऱ्याला परवानगी नव्हती. द्यूत युधिष्ठिर आणि दुर्योधन यात झाले; मात्र दुर्योधनाने आपले डाव खेळायला शकुनीला बसवले होते. युधिष्ठिर सुद्धा आपल्या वतीने कोणाला खेळवायला बसवू शकत होता. राजाच्या दरबारात असे सवेतन कितव (जुगारी) नेमलेले असत. द्यूत हा त्याकाळी युद्धाला पर्याय किंवा अहिंसक युद्ध होते.

युधिष्ठिराने पहिल्या द्यूतात २० वेळा पण लावले आणि ते सर्व हरला. अनुद्यूतात एकच पण होता आणि खेळीही एकच होती. युधिष्ठिराने वनवासात असताना गौप्यस्फोट करीत सांगितले की मी दुर्योधनाचे सर्व राज्य हिरावून घेण्यासाठी द्यूताचा प्रस्ताव त्याच्यापुढे मांडला होता. (दुर्योधनाचा प्रस्ताव स्वीकारला होता?)

पांडव वनात गेले ते द्रौपदीव्यतिरिक्त आपल्या बायका त्यांच्या त्यांच्या घरी पोचवून गेले. पांडवांच्या निवासाचे वन कौरव राज्यापासून फार दूर नव्हते. त्यामुळे युधिष्ठिराला दुर्योधनाच्या हालचालीच्या बातम्या हेरांकडून मिळत होत्या. युधिष्ठिर हा नेभळट, मूर्ख सदैव आपल्याच पायावर धोंडा पाडवून घेणारा असा नव्हता. (स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर पाकिस्तान निर्मिती, पूर्वबंगालमध्ये झालेली हिंदूंची कत्तल, आणि काश्मीरचा निर्माण झालेला तिढा या घटनांचे खापर नेहरू-गांधी यांच्या माथ्यावर फोडले गेले. वल्लभभाई पटेल पोलादपुरुष ठरले आणि गांधी-नेहरूंशी युधिष्ठिराचे साम्य कल्पून युधिष्ठिराला बदनाम केले गेले.) वास्तवात युधिष्ठिर पक्का आतल्या गाठीचा आणि मुरब्बी राजकारणी होता. दूरगामी परिणामांचा विचार करून निर्णय घेणारा होता. वनवासात त्याने अर्जुनाला धनुर्विद्येतील प्रावीण्य वाढवायला लावले. त्या काळातील माफियांना भीमाकडून नष्ट करविले. आगामी युद्धासाठी मित्र मिळविले. तेरा वर्षांनी राजधानीत जाताच दुर्योधन मुकाट्याने राज्य परत देईल या भाबड्या स्वप्नात तो राहिला नव्हता. वनातच त्याने अक्षद्यूत आणि फाशांचे द्यूत यांत प्राविण्य मिळवून ठेवले. म्हणजेच द्यूताने अथवा युद्धाने राज्य परत मिळविण्याची पूर्ण तयारी त्याने केली होती. युधिष्ठिराचा दोष एकच - अट्टल जुगारी मनोवृत्ती!

दुर्योधनाचे चित्रसुद्धा दुष्ट पुरुषाचे रंगवले जाते तसे नव्हते. तो प्रजाहितदक्ष होता. पांडवांच्या प्रजेला त्याने पांडवांचा विसर पडायला लावले होते. (हा विचार प्रथम भारवीच्या 'किरातार्जुनीय' महाकाव्यात दिसतो) मृत्यूच्या क्षणापर्यंत तो सम्राटाला साजेसे वागला. पांडव परत आल्यावर त्याने चांद्रवर्ष-सौरवर्ष हा वाद पुढे करून पांडवांना राज्य परत देण्याचे नाकारले व युद्धाचा स्वीकार केला. हे सम्राटाला साजेसेच होते. कोणताच सम्राट शत्रूपुढे हार मानत नसतो. युधिष्ठिराची मागणी, पांडवपक्षीय राजांचा दबाव, कृष्ण-शिष्टाई या सर्व पर्यायांना नाकारून त्याने युद्ध केले.

बारा वर्षांचा वनवास पूर्ण झाल्यावर पांडवांना एक वर्ष अज्ञातवासात रहायचे होते. कौरवांना वाटले होते की हा काळ पांडव पांचाल किंवा यादवराज्यात राहतील. पण पांडवांनी आपल्या सर्व सासरवाड्या टाळल्या व ते विराट राजाच्या मत्स्यदेशात (आजचा जयपूर ते अलवार भाग) जाऊन राहिले. दुर्योधनाच्या हेरांना त्यांचा पत्ता लागला नाही. कीचकवध करण्याची पद्धत जेव्हा दुर्योधनाला समजली तेव्हा त्याला पांडवांचा पत्ता लागला. विराटाचे गोधन पळवण्यासाठी म्हणून कौरव मत्स्यदेशात गेले. तिथे पांडवांनी (भीम-अर्जुन) त्यांचा पराभव केला. नंतर विराटासमोर प्रकट झाले. पुढे अज्ञातवासाचा काळ चांद्रवर्षाप्रमाणे की सौरवर्षाप्रमाणे हा वाद निर्माण झाला. युद्ध अटळ ठरले. विराटाच्या राजधनीत उत्तरा-अभिमन्यू विवाह ठरला. युद्धाच्या तयारीने पांडवपक्षीय राजे लग्नाला आले. विराटाने त्यांना उपलव्य नगर जानोसा म्हणून दिले!

युद्धाचे उत्तरदायित्व कौरवांवर टाकायचे आणि पांडव केवळ नाइलाज म्हणून लढाईला उद्युक्त झाले अशी भूमिका सर्वप्रथम पक्की केली आणि तिचा प्रसारही सुरु केला! प्रथम द्रुपदाचा पुरोहित कौरवांकडे गेला तो चर्चेचे गुऱ्हाळ मांडायला. त्याला बोलणी लांबवत ठेवून वेळ काढण्याची, फूट पाडण्याची कामगिरी दिली होती. धृतराष्ट्राने हा डाव उधळून लावला. कौरवांचा दूत संजय पांडवांकडे उलट निरोप घेऊन आला. त्याच्या बरोबर धर्माचा निरोप धृतराष्ट्राकडे गेला. अशाप्रकारे उभयपक्षी वाटाघाटींच्या निमित्ताने वेळ काढत युद्धतयारी सुरु झाली. सर्वात शेवटी कृष्णशिष्टाई झाली.

संजयाबरोबर निरोप देताना युधिष्ठिराने इंद्रप्रस्थाचे आपले राज्य परत द्या आणि ते जमणार नसेल तर पाच पांडवांना पाच गावे द्या अशी विनवणी केली. ही मागणी बावळटपणाची, कचखाऊ नव्हती तर अत्यंत बेरकीपणाची होती ! ही गावे होती कुशस्थळ, वृकस्थळ, आसंदी आणि वारणावत व पाचवे कोणतेही एक. (चिकित्सक आवृत्तीवरुन) इथे दांडेकर १७६१ मधील मराठ्यांच्या अबदालीशी झालेल्या युद्धाची सविस्तर तुलना करीत सांगतात की ही पाच गावे पांडवांना मिळाली असती तर हस्तिनापूरचे यमुनेच्या पश्चिमेचे दळणवळण पार तुटून हस्तिनापूर पांडवांच्या हातात अलगद पडले असते. पूर्वेला पांचाल, अग्नेयेला चेदी, नैऋत्येला मत्स्य या पांडवपक्षीय राज्यांनी दुर्योधनाची नाकेबंदी केली असती आणि हस्तिनापूरवरची त्याची सत्ता संपुष्टात आली असती. दुर्योधन हा डाव न जाणण्याइतका कच्चा नव्हता. त्याने उत्तर दिले, 'सुईच्या टोकावर राहील एवढीसुद्धा भूमी मिळणार नाही.' आता युद्ध अटळ झाले.

युद्धाची भूमी आपणास अनुकूल निवडणे आपला इरादा शत्रूला कळू न देणे या डावपेचांत युधिष्ठिर उजवा ठरला. धृष्टद्युम्न या एकाच सेनापतीच्या नेतृत्वाखाली पांडव लढले. यामुळे त्यांचे रणव्यूह शेवटपर्यंत एकसंध ठरले. दुर्योधनाला पांडवांच्या डावपेचांची अटकळ उशिरा आली. सेनापती बदलते राहिल्याने डावपेचही बदलते राहिले आणि या विषम युद्धात दुर्योधनाचा विषम पराभव झाला.

दुर्योधनाचा अंत करण्याच्या वेळी युधिष्ठिराची जुगारी वृत्ती उसळून आली. त्याने दुर्योधनाला पाच पांडवांपैकी कोणाशीही लढ असे आव्हान दिले. सुदैवाने भीम व दुर्योधन असेच युद्ध झाले मात्र त्यात भीमाने दुर्योधनाला ठार न करण्याची चूक केली आणि अश्वत्थामा-कृप यांनी पांडवांचा निर्वंश केला. 'जयोऽयम जायाकारो भगवन् प्रतिभाति मे।' असे युधिष्ठिराला आणि अंतिम क्षणी कृष्णालाही वाटले.

हे युद्ध अठरा औक्षहिणी अशा अत्युक्त संख्येत लढले गेले नाही. मात्र हे युद्ध विस्तीर्ण रणभूमीवर आणि विस्तीर्ण भौगिलिक अक्षावर लढले गेले. त्यात झालेला नरसंहार आजवरच्या कोणत्याही युद्धापेक्षा अधिक झाला. त्यामुळे त्याला प्रसिद्धी मिळाली आणि त्यावर युद्धगाथा Saga रचली गेली. तिचेच रुपांतर आजच्या महाभारतात झाले आहे.

इथवर दांडेकरांच्या विवेचनाचा सारांश दिला आहे. त्यात अनेक तपशील देणे शक्य झाले आहे. त्यामुळे काही वाचकांच्या मनात अनेक शंका येतील. त्यांचे निराकरण होण्यासाठी जिज्ञासूंनी मूळ ग्रंथ वाचावा हे योग्य. मराठी वाचकांच्या अत्यंत जिव्हाळ्याचा विषय बनलेल्या कर्णाविषयी या पुस्तकात थोडेच विवेचन येते. कुंतीला दुर्वासाने मंत्र दिले व त्यांच्या जपाने तिच्यासमोर सूर्य, यम, वायु, इंद्र, अश्विनौ प्रकट होऊन त्यांनी कुंतीला व माद्रीला पुत्रप्राप्ती करुन दिली, असल्या चमत्कारांना या पुस्तकात थारा नाही. पांडव ही कुंतीची, नियोगज अपत्ये आहेत एवढेच येथे म्हटले आहे. नियोग करणाऱ्या पुरुषांची नावे पांडु व कुंती यांनी कधीही उघड केली नाहीत आणि त्याकाळी तशी आवश्यकता सुद्धा नव्हती. कुंतीला कुमारी अवस्थेत मुलगा झाला असेल; पण या कानीन पुत्राचे नाव ती प्रथेप्रमाणे विवाहाच्या वेळी जाहीर करीत नाही. तो पुत्र तिने नदीत सोडला असेल तर त्याचे पुढे काय झाले हे तिला कळणे अशक्यच होते. प्रचलित कथेनुसार कर्ण हा आपला मुलगा आहे हे कुंतीला त्याच्या जन्मजात कवचकुंडलांमुळे कळते. दांडेकरांच्या प्रतिपादनात कोणत्याच चमत्कारांना स्थान नसल्याने या कर्णाच्या कवचकुंडलाच्या भारुडाला इथे स्थान नाही. दुर्योधनाकडे कर्णाचे स्थान आहे ते त्याच्या धनुर्विद्येतील कौशल्यामुळे. धनुर्विद्याकुशल माणसे त्याकाळी दुर्मिळ होती. त्यामुळे अनेकदा पराभूत होऊनही कर्णाचे स्थान दुर्योधनाकडे अबाधित होते.

श्री. दांडेकर यांना प्रा. नरहर कुरुंदकरांचा सहवास दीर्घकाळ लाभला. त्या सहवासात झालेल्या गप्पा, चर्चा यांचा उपयोग त्यांना या पुस्तकलेखनात झाला. इरावती कर्वे यांच्या 'युगान्त' पुस्तकानेही त्यांना प्रेरणा दिली. त्यांच्या लेखन-शैलीचा प्रभाव दांडेकरांवर कुठे कुठे जाणवतो. कुरुंदकरांनी

महाभारत या विषयावर लेखन केले, म्हणण्यापेक्षा महाभारतावर लिहिलेल्या प्रसिद्ध पुस्तकावर त्यांच्या पद्धतीने मतप्रदर्शन करणारे लेखन केले. या लेखनाचे संकलन असलेले 'व्यासांचे शिल्प' हे पुस्तक २५-९-०२ मध्ये प्रसिद्ध झाले. दांडेकरांच्या विवेचनाचा कुरुंदकरी गाभा ज्यात आहे असा यातील लेख म्हणजे 'राष्ट्रनिर्माता भगवान श्रीकृष्ण' या लेखाशी 'धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे' मधील प्रतिपादनाची तुलना केली तर दांडेकरांवरील कुरुंदकरांचा प्रभाव स्पष्ट होईल आणि दांडेकर त्या आधारावर किती पुढे गेले हेसुद्धा स्पष्ट होईल.

कृष्णाच्या खोड्या व लबाड्या यांचा ओझरता उल्लेख दांडेकरांच्या लेखनात आहे. मात्र कृष्णाच्या 'लबाड्या' या त्याच्या उद्दिष्टपूर्तीसाठी होत्या हे दांडेकरांना दाखवायचे असल्याने त्या 'लबाड्या' या सदरात ते घेत नाही. कम्युनिष्ट कवी सुरेश भट सुद्धा 'आज गोकुळात रंग खेळतो हरी' अशी कविता करतात याचा उल्लेख दोघेही करतात. कवी असलेल्या कम्युनिष्टाने कायम कम्युनिझम- प्रचाराच्या कविता रचाव्यात आणि परंपरेशी कधीच नाते ठेवू नये असा अर्थ यातून सूचित होतो. त्यामुळे हा उल्लेख दांडेकरांनी टाळला असता तर बरे झाले असते असे वाटते. कृष्णाच्या कलाक्षेत्रातील प्रभावावरसुद्धा दोघांचे पूर्ण एकमत आहे. रुक्मिणीस्वयंवरावर मराठीत रचलेल्या काव्यांचाच कुरुंदकर उल्लेख करतात; तर दांडेकर त्यांची संख्या देत त्यात अधिक अचूकता आणतात. कुरुंदकर 'उग्रसेन' हे व्यक्तिनाम नसून राज्यपद्धतीचे नाव आहे असे म्हणतात. दांडेकर ते गणराज्य पद्धतीचे वा त्यांच्या सभाध्यक्षांचे नाव असावे अशी नोंद करतात. दोघांचीही ही मते अगदी योग्य वाटतात. कारण उग्रसेन याचा अर्थ उग्रा सेना यस्य स: असा विशेषणात्मक होऊ शकतो. मुख्यत्वेकरून कृषि-पशुपालक असलेल्या गणाने आपले शौर्य अभिमानाने दाखवायला असे नाव धारण करणे अगदी स्वाभाविक आहे. काश्मीरमध्ये एसमर्ग भागात फिरताना, तिथे रस्ते बांधणाऱ्या एका लष्करी तुकडीने जागोजाग आपला उल्लेख मोठ्या अभिमानाने 'सबसे खविस' 'जाँबाज' असा केलेला दिसला. रुक्मिणीहरणाची पार्श्वभूमी आणि त्यामागील राजकारण यांचा उल्लेख दोन्ही ठिकाणी समान आहे. कंसवधानंतर जरासंधाच्या मोठ्या सैन्याचा प्रतिकार करता येणार नाही म्हणून स्थलांतर करायचे या कल्पनेचा दांडेकर उत्तम विस्तार करतात. कृष्ण कौरवांशी मैत्री न करता पांडवांशी का करतो या मागील कृष्णसूत्र दांडेकर तर्कशुद्ध पद्धतीने उलगडून दाखवतात. अर्जुनाने केलेल्या सुभद्राहरणाला कृष्णाचीच प्रेरणा होती. या निमित्ताने यादव वंशातील व्यक्ती पुढेमागे इंद्रप्रस्थ-हस्तिनापुरची वारस होऊ शकेल ही कृष्णाची दृष्टी होती असे कुरुंदकर म्हणतात. यादवांचा नाश झाल्यावर अर्जुनाने यादववंशीय व्रजाला मथुरेचे राज्य दिले आणि यादवांना पुन्हा मथुरा मिळाली याचा उल्लेख कुरुंदकरांनी केला आहे. दांडेकरांच्या म्हणण्याप्रमाणे महाभारत युद्ध संपल्यावर पांडवांनी व्रजभूमी एका वृष्णी तरुणाला आमंत्रित करून दिली. बुद्धापूर्वी अनेक शतके कृष्ण होऊन गेला; कौरव-पांडव युद्धात सहभागी झालेल्या राजांच्या वंशजांची राज्ये बुद्धकाळात होती या कुरुंदकरांनी दिलेल्या माहितीचा उपयोग कौरव-पांडव युद्ध ही ऐतिहासिक घटना आहे हे अधोरेखित करायला दांडेकरांनी करायला हवा होता. कृष्णाची पांडवांशी पहिली भेट होते तेव्हा कृष्ण कंसवधाची माहिती देतो आणि कंसवध करणाऱ्या मंडळींचे नेतृत्व मी केले असे सांगतो. दांडेकर या गोष्टीचा स्पष्ट उल्लेख करीत नाहीत; तर ती गृहीत धरतात. कदाचित् तसे केल्याने लेखनाला कादंबरीची कळा येण्याचा धोका त्यांना वाटला असेल आणि या कारणासाठी त्यांनी हा उल्लेख टाळला असेल तर ते अभिनंदनाला पात्र आहेत. द्वारकेवर कालयवन, पौंड्र, सौंध यांचे पण हल्ले झाले आणि त्यांचेही उल्लेख दांडेकर पूर्वोक्त कारणासाठीच करीत नसावेत. जरासंधपुत्राचे सहदेव हे नाव मात्र येणे आवश्यक वाटते. एकूण असे म्हणावेसे वाटते की दांडेकरांनी आपला बहुपदरी व्यासंग आणि प्रतिमा यांच्या आधारे कुरुंदकरांचे विचार अधिक पुढे नेत त्यांना एक ठाम, तर्कशुद्ध स्वरुप दिले. महाभारताचे एक नवे विवेचन मराठीत प्रथमच आणले. कुरुंदकरांचे प्रातिभ विचार वाऱ्यावर विरु दिले नाहीत. एका लेखकाचे विचार दुसऱ्या लेखकाने संपन्न करून मांडणे ही गोष्टच दुर्मिळ आहे; विचार खोडण्याचे काम कोणीही करु शकतो!

जरासंध वधाला जाण्यापूर्वी कृष्णाने गिरिव्रज येथे थोडे सैन्य ठेवले होते ते जरासंध सेनेचा प्रसंगी प्रतिकार करायला म्हणून ठेवले होते; तसेच त्या सेनेला हुलकावणी देऊन 'कात्रज' करायला ठेवले असेल का? असा प्रश्न दांडेकरांना कोणी विचारला (आणि ती शक्यता आहे) तर दांडेकरांकडून वाचकाला एक नवी दृष्टी मिळाल्याचे ते गमक








म्हणता येईल.

रामायण महाभारतात अनेक स्थळे संदिग्ध आहेत. प्रस्तुत पुस्तक वाचताना हे प्रकर्षाने जाणवले. उदा. यादवांनी द्वारकेला स्थलांतर केल्यानंतर मथुरेचे गणराज्य कोणाकडे गेले? भारतीय महायुद्धानंतर पांडवांनी तिथे वृष्णी संघातील तरुणाला नेमले; पण त्यापूर्वी तिथे जरासंधाची राजवट होती का? जरासंधाच्या मृत्यूनंतर तिथे कोणाची सत्ता होती? नागलोक हे आजच्या नागालँडमधून भारतभर गेले का? कालियामर्दन जर कृष्णाच्या तरुणपणी झाले असेल तर त्यात कंसाचा सहभाग किंवा भूमिका राजा म्हणून काय होती? कालियाचा कंसानेच काटा का काढला नाही? कालिया हा नागजमातीचा माणूस वृष्णींना - वसुदेव, कृष्ण या आपल्या प्रतिस्पर्ध्यांना उपद्रव देत होता आणि कंस तो चालू राहू देत होता का? कंस साम्राज्यशाहीचा पुरस्कर्ता कधी व कोणत्या प्रेरणेने झाला? या प्रश्नांना ठाम उत्तरे नाहीत. शक्यता मात्र अनेक आहेत. त्यांचा आधार घेऊन काही मतभेद दांडेकरांच्या प्रतिपादनाच्या संदर्भात व्यक्त करतो.

१. कालिया हा नाग नावाच्या जमातीचा आहे हे म्हणणे अगदी योग्य आहे आणि या 'उपऱ्याचे' कृष्णाने मर्दन केले इथपर्यंत हे विवेचन योग्य आहे. कंसाची त्याला फूस असेल असेही म्हणता येईल. मात्र कालियामर्दन, पूतनावध, यमलोद्धारण, गोवर्धनोद्धारण या घटनांना लोकतत्त्वीय पैलू आहेत हे रा. चिं. ढेरे यांनी दाखवून दिले आहे. आणि ते अधिक स्वीकार्य वाटते (लोकसंस्कृतीची क्षितिजें). नाग, बालग्रह, यक्ष या क्रूर देवतांच्या उपासनेहून कृष्णाची भक्ती श्रेष्ठ असे या कथांचे प्रयोजन उल्लिखित पुस्तकात त्यांनी केले आहे. कालियादमन कथेचा आणखी एक पैलू आहे. कृष्ण हा गरुडवाहन विष्णूचा अवतार मानला आहे. नरकासूर वधाला तो गरुडावर स्वार होऊन गेल्याचे प्रसिद्ध आहे. डॉ. सदाशिव अंबादास डांगे यांच्या Legends in the Mahabharata या पुस्तकातील प्रतिपादनावरून असे दिसते की नाग व गरुड हे एकाच भ्रातृसंघातील लोक होते. नाग हे नागाचा टॉटम (totem) धारण करणारे आणि मंत्राने विष उतरविण्याची विषबाधा जाणणारे होते. गारुड (किंवा गारुडी) हे गरुडचिन्ह धारण करणारे व अमृतविद्या जाणणारे लोक होते. या दोघांमधील झगड्याच्या कथा महाभारत व इतर पुराणात आहेत. अशाच एखाद्या कथेचा कालियादमन हा भाग असावा.

२. गोवर्धनोद्धारण याविषयी 'भारतीय संस्कृति-कोशावरुन' असे दिसते की अन्नकूट आणि गोवर्धन एकरूप आहेत. इंद्रयागाला विरोध ही गोवर्धनोद्धारणाची प्रेरणा आहे. यज्ञात तुपासारखी सामग्री नष्ट करण्यापेक्षा अन्न गोळा करून वाटणे अधिक उपयुक्त असे कृष्णाला वाटले असेल, असे अन्नकूट या कल्पनेवरुन फारतर म्हणता येईल. या कथेचा आणखी एक महत्त्वाचा पैलू आहे. तो म्हणजे इंद्र या वैदिक देवतेचा उत्तरकाली झालेला श्रेष्ठत्वाचा ऱ्हास. रामायण महाभारतात इंद्र हे एक उपमान (standard of comparison) झाल्याचे ठायी ठायी दिसते. रामायणातील अहल्याकथेत इंद्राचा लिंगच्छेद (castration) केला आहे. तेव्हा गोवर्धनोद्धारण प्रसंगाकडे सुद्धा इतिहास म्हणून बघण्यापेक्षा एखा दैवताचा ऱ्हास आणि दुसऱ्या दैवताचा उत्कर्ष या दृष्टीने बघावे असे माझे मत आहे. कृष्णाचे बालपण संदिग्ध आहे; म्हणूनच त्याच्या या कालखंडाला खोड्या, लबाड्या, रासक्रीडा; मनमोहन, मुरलीमोहन, गिरिधरनागर अशी मधुराभक्तीतील तत्त्वे यांचे परिमाण मिळाले आणि भारतीय संस्कृतीची अनेक अंगे पुष्ट झाली ! (प्रकरण १ व २ पहा.)

अनेकदा लेखक आपल्या स्वीकृत कल्पनेचा इतका गुलाम बनतो की त्यामुळे तो तार्किकता विसरून वहावत जातो. (उदा. पृ. १३८-१३९ वरील श्री.दा.पेंडसे) अत्यंत अभिनंदनीय गोष्ट अशी की दांडेकरांनी वरील दोन्ही प्रसंगी आपण कल्पनेची ओढाताण केली असण्याची शक्यता प्रांजलपणे व्यक्त केली आहे, आणि लोकनेता ही कृष्णाची घडण कशी झाली हा इतिहास धूसर असल्याचे मान्य केले आहे.

पृ. ७६ ते ७८ वर दांडेकरांनी केस ओढणे, केसात पाच पाट काढणे याविषयी विवेचन केले आहे. त्याला पुष्टी देणारी काही माहिती देतो.

१. व्यक्तीचे केस ओढणे ही क्रिया व्यक्तीला अगतिक करून स्वत: सुरक्षित राहण्याचा उपाय अशी दुहेरी आहे. व्यक्तीच्या मागून जाऊन केस ओढले की ती व्यक्ती केस तुटत राहण्याच्या वेदना टाळायला पुढे जात नाही आणि केस ओढण्यावर कसलाच वार करु शकत नाही. ती व्यक्ती अक्षरश: मुठीत येते. त्यामुळे केशाकर्षणाचा अपमानाशी संबंध येतोच. याला प्रत्यंतर प्रमाण 'वेणीसंहार' नाटकात

मिळते. नाटकाची कथावस्तु द्रौपदीच्या केशाकर्षणाचा सूड आहेच; पण दृष्टद्युम्न द्रोणांचे केस पकडून शिरच्छेद करतो ही घटना अस्वत्थाम्याच्या जिव्हारी लागते.

मयि जीवति मत्तात: केशग्रहमवाप्तवान्
कथमन्ये करिष्यन्ति पुत्रेभ्य: पुत्रिण: स्पृहाम् ।।३.३१

हा श्लोक केशग्रहण म्हणजे घोर अपमान हे सिद्ध करण्यास पुरेसा आहे.

४. जयद्रथाचा शिरच्छेद न करता त्याच्या केसांत पाच पाट काढले इथे मात्र अपमानाचा भाग नाही असे म्हणावेसे वाटते. केस कापून गोटा करणे हे मृत्यूचे प्रतीक आहे. केसामध्ये प्राणतत्त्व असते ही कल्पना दांडेकर म्हणतात तशी जागतिक आहे. त्यामुळे केशच्छेद मृत्यूचे प्रतीक आहे हे विविध पातळ्यांवर दिसते. १. मृत्यूनंतर माणूस स्वर्गात जातो. स्वर्गात देव असतात. ब्राह्मण भूदेव आहेत. त्यामुळे ते विशेषत: पौरोहित्य करणारे - पूर्ण केशवपन केलेल्या अवस्थेत राहत आणि इहलोकीचा संबंध दाखविण्यापुरती शिखा-शेंडी धारण करीत. २. यज्ञकार्य ही अलौलिक पातळीवरची क्रिया असल्याने यज्ञदीक्षा घेणाऱ्या यजमानाचे क्षौर करून नंतर त्याला पुनर्जन्म देत. मुंजीत बटूचे क्षर करून त्याला अमृतजन्म देतात. ४. मृताचे श्राद्ध करण्यापूर्वी श्राद्धिविधी करणारा क्षौर करून स्वर्गस्थ मृताच्या पातळीवर जाऊन त्याला अन्नपाणी पुरवतो. ५. विधवा स्त्रीचे केशवपन करणे हा सती जाण्याला पर्याय असावा असे माझे मत आहे. या गोष्टींचा विचार करता जयद्रथाचे केस भादरणे हा त्याला दिलेला प्रतीकात्मक मृत्यूच आहे. कदाचित् पाच पाट काढले म्हणजे पंचप्राण काढले आणि पाच ठिकाणी केस ठेवले म्हणचे पंचप्राण ठेवले अशी ही प्रतीकात्मकता असेल. शरीरावर केस असणे आणि ते कापणे यामागे विविध धारणा आहेत. लोकसंस्कृतीत एकच उपमान विविध सादृश्यांसाठी वापरले जाते. केस हे त्यापैकी एक आहे. केसांविषयीच्या या धारणेची चर्चा डॉ. स. अं. डांगे यांच्या Legends in the Mahabharat आणि 'अश्वत्थाची पाने' या ग्रंथात आहे.

५. पृ. २२ वर तलवारीला पाणी देणे या वाक्प्रचाराचा उल्लेख आहे आणि तो धार लावणे या क्रियेशी समानार्थक आहे असे म्हटले आहे. धार लावणे हा लक्षणेने येणारा लक्ष्यार्थ आहे. आणि पाणी देणे ही लोखंडावर संस्कार करण्याची वास्तव प्रक्रिया आहे. तापलेले लोखंड सोमल (आर्सेनिक) विषाच्या पाण्यात बुडवून काढले की ते कडक बनते, मात्र ते झटकन् तुटतेही. तलवार लवचिक, धारदार, वजनाला हलकी पण मजबूत व्हावी म्हणून लोखंडावर विविध प्राण्यांच्या रक्ताची व रसायनांची प्रक्रिया करीत असे कळते. यातून तलवारीला पाणी देणे हा वाक्प्रचार आला.

६. जमिनीवर बाण पसरून त्यावर भीष्मांनी प्रायोपवेशन केले (पृ. ११५) असे भीष्मांच्या शरशय्येविषयी म्हटले आहे. वास्तवात ती शय्या शर नावाच्या गवताची होती असे प्रतिपादन करणारा एक लेख 'नवभारत' मासिकात (१९७८ ते ८० दरम्यान) वाचल्याचे आठवते.

प्रस्तुत पुस्तकातील विवेचन हे मानवी लालसा, तिला साथ देणारा भूगोल आणि खनिजसंपत्ती या त्रयीच्या शाश्वत व्यापारावर आधारलेले आहे. साहजिकच या विवेचनात जागोजाग मुघल, शिवाजी, औरंगजेब, पेशवे यांच्या युद्धातील डावपेचांपासून दुसरे महायुद्ध, भारतपाक युद्धे, बांगलादेश लढा, गोवा कारवाई या आधुनिक युद्धांपर्यंतचे संदर्भ जागोजाग येतात. आणि वाचकाला या गोष्टींचे त्रिकालाबाधित्व जाणवून देत राहतात. अशा लेखनात अभिनिवेश येण्याचा धोका मोठा असतो. दांडेकरांनी तो कुठेही येऊ दिलेला नाही. स्वतःला सोयीस्कर अर्थ काढण्याच्या दोषापासून त्यांनी आपणाला दूर ठेवले आहे. आपली विधाने ते सावधपणे करीत नाहीत तर संभाव्य सत्य म्हणून करतात. गिरनार डोंगरमालेच्या आसपासचा प्रदेश ही यादवभूमी हे गृहीत धरण्यास आज तरी प्रत्यवाय नसावा. किंवा 'या भूभागासाठी फार प्राचीन काळी 'भारत' ही संज्ञा असेल किंवा नसेलही' (मनोगत) अशा त्यांच्या वाक्यांमधून आपली विधाने भविष्यात पुरावे मिळाले तर सुधारण्याची त्यांनी मनोवृत्ती दिसते. 'अर्थस्य पुरुषो दास:।' या प्रसिद्ध वाक्याचा अर्थ दांडेकर 'प्रत्येकजण आपापल्या राजकारणाचा गुलाम असतो' असा सांगतात; मात्र ते 'मनोगतात'. कारण त्याचा दुसरा अर्थ निघू शकतो याची त्यांना जाणीव आहे. आणि तो अर्थ त्यांच्या प्रतिपादनाचा गाभा नाही की लेखनाची प्रेरणा नाही. मात्र प्रत्येकाच्या भूमिकेमागे स्वार्थ ही प्रेरणा असते ही पार्श्वभूमी ते दाखवून देतात. प्रस्तुत पुस्तकाच्या प्रतिपाद्याचे ते अनेक वर्षे चिंतन करीत होते आणि ते त्यांच्या अनेक वाक्यांमधून वारंवार प्रकट होते. १. अवतार म्हणून चित्र पाहण्यापेक्षा मानवी कर्तृत्व म्हणून न्याहाळले म्हणजे त्याची भव्यता कितीतरी मोठी आहे हे








लक्षात येईल. २. विजेता पक्ष इतिहासावर आपला ठसा वाजवीपेक्षा जरा जास्त ठळक उमटवतो. ३. सत्ताकारण एकपदरी कधी नसतेच. ४. हितसंबंध गुंतलेले असल्याने नातेसंबंध बाजूला सारले गेले. ५. कुलस्त्रीला जुगारात पणाला लावणारी मंडळी कुलस्त्रीच्या अपमानासाठी महायुद्ध करीत नसतात. अशासारखी जागोजाग मिळणारी वाक्ये ही काही सुवचने, सुभाषिते सिद्धांत अशा स्वरूपाची म्हणता येणार नाहीत. पण ती निदिध्यासातून आलेली असल्याने प्रतिपादनाला ठामपणा देतात. अशा वाक्यांतून दांडेकरांची अनाग्राही वास्तव अंशी दृष्टी स्पष्ट होते.

प्रस्तुत पुस्तक लिहिताना दांडेकरांनी प्राचीन भारतीय इतिहासविषयक कित्येक नवे मुद्दे गृहीत धरून प्रतिपादन केले आहे. मात्र कित्येक वाचकांना ते अज्ञात आहेत. यासाठी देशमुख प्रकाशनाच्या प्रथेला अनुसरून 'एस्' (कै. डॉ. सुलोचना देशमुख) या मुद्रेने रवींद्र गोडबोले यांनी 'पार्श्वभूमी' लिहिली आहे. त्यात मांडलेले महत्त्वाचे सिद्धांत असे आहेत. - भारतीय इतिहासाच्या पद्धतशीर लेखनाचा प्रारंभ इंग्रजी राज्यात झाला. संस्कृतज्ञ झालेल्या पाश्चात्त्य पंडितांनी वेद, रामायण, महाभारत यांच्या अभ्यासातून ऋग्वेदाचा काळ इ. स. पू. ४००० हा ठरवला. मात्र त्यामुळे वेद बायबलपेक्षाही प्राचीन ठरू लागल्याचे दिसताच तो इ.स.पू. २००० ते १५०० झाला. या दुराभिमानापुढे वेदातील खगोलशास्त्रीय उल्लेख थोतांड ठरले. वेदांची निर्मिती भारतात भारतीय ऋषींनी केली हे मानणे अडचणीचे ठरू लागल्यावर इंडोयुरोपीय भाषागट हा सिद्धांत पुढे करून आर्य भारतात आले व त्यांनी येथील द्रविडांना हरवून येथे आपली वसाहत केली हा सिद्धांत मांडला गेला. मोहेन् जो दडो आणि हडाप्पा या भूमिगत गावांचा शोध लागल्यावर आर्य आक्रमणाचा सिद्धांत लटपटायला लागला. तो स्थिर करण्यासाठी त्यात सोयीस्कर बदल झाले. इतिहासाचा अभ्यास जसजसा वाढत चालला आणि सिंधुसंस्कृतीचा विस्तार उजेडात येऊ लागला तसतसे पाश्चात्त्यांचे सिद्धांत विसंगत व्हायला लागले. आणि त्यांचे दुराभिमान वाढायला लागले. पुरातत्त्वीय फोरेन्सिक विज्ञानाने तर या सिद्धांताचा फोलपणा पुरेपूर उघडा पाडला. प्राचीन भारतीय इतिहासाचे पुनर्लेखन आवश्यक झाले. मात्र त्यात वसाहतवादी, साम्यवादी, हिंदुत्ववादी असे गट, तट, प्रत्येकाचे दुराग्रह हे सर्व आले. इतिहासलेखन बाजूला पडले. या वादांत भेदभाव दिसत नाही तो फक्त नावे ठेवण्यात! त्यामुळे काही युरोपीय विद्वान हिंदुत्ववादी ठरतात; तर समुद्रपर्यटन निषिद्ध मानणारे हिंदु 'वसाहतवादी' बनतात! रथ, घोडा, लोखंडाचा वापर, द्यूतमंडल, राजसभा अशा काही पुराव्यांच्या आधारे श्री. गोडबोले महाभारत आणि सिंधु-संस्कृतीचा संबंध असावा असे अनाग्राही प्रतिपादन करतात.

महाभारताच्या अभ्यासाला भूगोलाची जोड असल्याने येथे एकूण पाच नकाशे व पंधरा सिंधुसंस्कृतीच्या अवशेषांची चित्रे दिली आहे. पुस्तकाची सजावट चांगली आहे. मुखपृष्ठावर जुन्या खांबांची गुंतागुंतीची रचना आहे. त्यांच्या माथ्यावर महाल असेल का असा विचार करताच तळाशी उघडे पडलेले खडक आणि त्यातून सैरावैरा वाहणारा पण क्षीण झरा आहे. त्या खांबांच्या भव्यतेला साजेसा शीर्षकाचा अक्षरविन्यास आहे. महाभारताच्या अभ्यासाचे व स्वरूपाचे हे प्रतीक दाद देण्याजोगेच आहे. संपूर्ण पुस्तक वाचनीय आणि संग्राह्य आहे. मात्र खटकणारी गोष्ट एकच - अनेक मुद्रणदोष! मराठीत अनेक प्रकाशक असे आहेत की जे एकही मुद्रणदोष येऊ देत नाहीत. देशमुख प्रकाशन त्या पठडीतील असावे ही शुभेच्छा.

☑☑☑

**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे**
लेखक : विश्वास दांडेकर
प्रकाशक : देशमुख आणि कंपनी, पुणे, २००६
मूल्य : रु. तीनशे

बहवो यत्र नेतारः
सर्वे पण्डितमानिनः।
सर्वे महत्त्वमिच्छन्ति
तद् राष्ट्रम् अवसीदति।।

- महाभारत

# जीर्णोद्धार - लेखांक ११
# 'सुखाचा मूलमंत्र' : नारायण हरी आपटे

श्री० मा० मराठे

१

एकोणिसावे शतक संपून विसावे शतक उजाडले आणि महाराष्ट्रात इंग्रजी राजवट सुरु झाल्यापासून जी आधुनिकता पसरत चालली होती तीमधील एक महत्त्वाचा भाग जो राष्ट्रवाद, त्याला अभूतपूर्व भरती आली. व्हाईसरॉय कर्झनने बंगालच्या फाळणीची घोषणा केली. आणि बंगालमध्ये स्वदेशीची मोठी चळवळ उभी राहिली. स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण यांच्या सहाय्याने आपण परकीय राज्यकर्त्यांना नमवू शकतो या विश्वासाने लोकांनी राष्ट्रीय शिक्षण देणाऱ्या शाळा काढल्या. परदेशी कपडे गोळा करुन त्यांच्या होळ्या केल्या. परकीय साखर वर्ज्य केली. आणि स्वदेशी कापड, स्वदेशी वस्तू वापरण्याच्या प्रतिज्ञा केल्या. इतक्याने भागले नाही. काही सुशिक्षित तरुण क्रांतीच्या वाटेने जाऊ लागले. बाँबचे कारखाने काढले, हालअपेष्टा सोसून व पैसे साठवून त्यांनी पिस्तुले व काडतुसे पैदा केली. निशाणबाजीचा सराव रानावनात किंवा वैराण जागी जाऊन करु लागले. हे दिव्यदाहक व्रत आचरावयाचे तर मन व शरीर दोन्ही खंबीर आणि बळकट हवीत. म्हणून बलोपासना सुरु झाली. नमस्कार, जोरबैठका, पळणे, दगडी व कडे चढणे-उतरणे, आखाड्यात उतरून कुस्ती करणे अशा उद्योगात शाळा-महाविद्यालयातील मुले शरीर कमावू लागली.

बंगालमधील हा वर्तनक्रम महाराष्ट्रातही पसरला, 'स्वदेश-स्वधर्म-स्वभाषादिकांचा जगी उत्कर्ष व्हावा असे हेतू साचा' हे ध्येयवाक्य स्वीकारुन अनेक विद्यार्थी स्वदेशीच्या चळवळीत उतरले. परदेशी कपडे मिरवणूक काढून गोळा केले आणि त्यांची रास रचून तिला आग लावण्याचे कार्यक्रम झाले. तळेगावला 'समर्थ' विद्यालय म्हणून राष्ट्रीय शाळा सुरु झाली. सावरकरांनी अभिनव भारत ही क्रांतिकारी संघटना काढली. स्वत: विलायतेला गेले आणि शत्रूच्या राजधानीत गुप्तकटाची बांधणी केली. तेथून वीस पिस्तुले महाराष्ट्रात पाठविली. बलोपासनेची आवड सर्वत्र फैलावली. महाराष्ट्रात गावोगावी तालमी, आखाडे होतेच. पण सुशिक्षित तरुणात व्यायाम-बाजीकडे उपहासानेच पाहिले जाई. आता सुशिक्षितांनी तालमी घातल्या व नमस्कार, जोरजोडी, मल्लखांब यांचे धडे ते गिरवू लागे. १९०५ सालापासून १० सालापर्यंतचा काळ महाराष्ट्रात मोठ्या उत्साहाचा, नव्या उमेदीचा आणि उंच उसळी मारून आकाशातले तारे वेचून आणण्याची हिम्मत धरण्याचा होता.

पण १९०७ साली डिसेंबरात सुरत येथे भरलेल्या काँग्रेसच्या अधिवेशनात दंगल झाली आणि जहाल व मवाळ या पक्षात फूट निर्माण झाली. सरकारने ही संधी साधून जहालपक्षीयांना वेचून नेस्तनाबूत करण्याचा निश्चय केला. शि.म. परांजपे व टिळक यांना शिक्षा झाल्या. जहाल वर्तमानपत्रांकडून जबरदस्त जामीन मागण्यात आला आणि बरीच वर्तमानपत्रे बंद पडली. तळेगावचे 'समर्थ विद्यालय' सरकारने हुकुम काढून बंद केले. राष्ट्रप्रेमाचा वसा घेऊन व पारिपाठीय शिक्षण सोडून जी मुले समर्थ विद्यालयात आली होती ती उघडी पडली. पण १९०९ च्या डिसेंबरात नाशिकला किर्लोस्कर नाटक मंडळीचा 'शारदा' नाटकाचा खेळ लागला असता जॅक्सनचा खून झाला व त्यानंतर सरकारी दडपशाहीचा जो दणका महाराष्ट्राला बसला त्याने सगळेच हबकून गेले. लो. टिळकांचे चित्र घरात लावण्यालाही बंदी करण्यात आली. अनेकांची वतने व खाजगी मालमत्ता जप्त झाल्या. क्रांतिकारकांचा व त्यांच्याशी संबंध असणाऱ्यांचा जो अमानुष छळ झाला त्यामुळे भीतीचे वातावरण तयार झाले. तालमीत जाणाऱ्या प्रत्येक मनुष्याकडे पोलिस संशयाने पाहत व त्याचा जाब घेत. परिणाम असा झाला की राष्ट्रीय चळवळ मरगळली. १९१० नंतर जी परिस्थिती महाराष्ट्रात होती तिचे यथार्थ वर्णन न. चिं. केळकर यांनी 'गतगोष्टी' या त्यांच्या आत्मचरित्रात केले आहे. 'वात झालेला माणूस हातपाय झाडीत बरळत राहतो व नंतर बेशुद्ध होतो निपचित पडतो तशी महाराष्ट्राची स्थिती झाली.'

यानंतर १९१४ साली लो. टिळक मंडालेच्या तुरुंगातून सुटून महाराष्ट्रात परतले व चळवळीचे रूपच बदलले. दरम्यान मोर्ले-मिंटो सुधारणा १९०९ साली जाहीर होऊन अंमलात आल्या. बंगालची फाळणी रद्द झाली. कलकत्त्याहून उठवून

राजधानी दिल्लीला नेण्यात आली. क्रांतिकारी चळवळी-मागील ईर्षा त्या प्रमाणात कमी झाली. गुप्त कट रचा, पोलिसांपासून सावध रहा, पोलिसांची मारहाण, छळ, जाबजबाब घेणे यांची धास्ती बाळगा, चोरून शस्त्रे जमवा अशा गोष्टीत पैसा, बुद्धी व वेळ खर्चण्यापेक्षा उजळ माथ्याने सार्वजनिक चळवळ करणे अधिक सोयीचे वाटू लागले. तरुण सुशिक्षितांच्या या इच्छेला वाट करून देण्यासाठी लो. टिळकांनी स्वराज्य संघाच्या प्रचाराचे दौरे, ठिकठिकाणी होणाऱ्या जंगी सभा, गावोगावी काढलेल्या स्वराज्य संघाच्या शाखा यांनी वातावरण दुमदुमून गेले.

हे जरी झाले तरी ज्यांना स्वदेशी चळवळीचे ओज, पिळदारपणा, बलोपासना आणि व्रतस्थपणा यांचे वळण पडले होते, किंवा चटक लागली होती असे म्हणा, त्यांना हा बदललेला काळ मिळमिळीत वाटत होता. क्रांतिकार्य हे न झेपणारे आहे, असे पटले असले तरी गुप्त चळवळीबरोबर त्या चळवळीला अभिप्रेत असणारी तेजस्वी आणि उग्र प्रकृती, व्रतस्थ वृत्ती व शरीरसाधना सोडून देण्याचे काही कारण नाही, असे त्यांना वाटत होते. त्यांनी 'व्यायाम' नावाचे मासिक चालविले होते व त्या मासिकातून नारायण हरी आपटे यांची 'सुखाचा मूलमंत्र' ही बोधप्रद कादंबरी प्रकरणशः प्रसिद्ध होत होती.

२

नारायण हरी आपटे (१८८९-१९७१) यांना ऐन कुमार वयातच स्वदेशप्रेम जडले. 'तीस कोटी प्रजेवर सहा हजार मैलांवरून आलेला इंग्रज दिमाखाने सत्ता गाजवीत होता' याचे दारुण वैषम्य वाटले. त्यांनी घर व शिक्षण सोडले आणि १९०४ ते १९१२ अशी आठ-नऊ वर्षे उत्तर हिंदुस्थानचा पायी प्रवास केला. त्या प्रवासात ते राजस्थानातील एका ख्रिश्चन कुटुंबात काही दिवस राहिले, एका अमेरिकन स्त्री फोटोग्राफरशी त्यांची मैत्री झाली व तिच्या आधाराने अमेरिकेत जाण्याचा प्रयत्न त्यांनी करून पाहिला. त्यांच्या कथा-कादंबऱ्यांवरून ते सनातनी नसले तरी कट्टर हिंदुत्ववादी व जुन्या चालीरीतींचा अभिमान बाळगणारे असावेत, असा समज होतो. पण तसे काही नव्हते, हे त्यांच्या आयुष्यपटावरून कळून येते.

आपट्यांनी नाना तऱ्हेचे लेखन केले व त्यात अनेक प्रयोग देखील केले. त्यांनी 'पाच ते पाच'नावाची एक कादंबरी लिहिली आहे. एका जुन्या चालीरीती पाळणाऱ्या कुटुंबात एका दिवशी पहाटे पाच वाजल्यापासून दुसऱ्या दिवशी पहाटे पाच वाजेपर्यंतच्या चोवीस तासात कसे भयंकर वादळ घोंघावले व घरातील सर्व जणांच्या समजूतदारपणामुळे शांतही झाले याचे वर्णन तासातासातील घटनांची नोंद घेत केलेले आहे. कादंबरीत काहीसा कृत्रिमपणा या वेळापत्रकामुळे आला आहे हे खरे; तरी त्यामुळे कुटुंबावर गुदरलेल्या गंभीर प्रसंगाची व प्रत्येक व्यक्तीच्या अंतरंगात जी घुसळण चालली होती तिची तीव्रता व गांभीर्य बोथट होत नाही. मात्र ही फार नंतरची गोष्ट झाली. १९४६ सालातली.

आपट्यांच्या काही कादंबऱ्या व गोष्टी त्यांच्या त्यांच्या काळात खूप गाजल्या. 'पहाटेपूर्वीचा काळोख', 'रजपुतांचा भीष्म', 'ऐरणीवरील हिरा' या कादंबऱ्या अतिशय लोकप्रिय होत्या. त्यातील सत्प्रवृत्त व आदर्शवादी व्यक्ती बहुधा सांकेतिक रीतीने वर्तन करीत असल्या तरी कादंबऱ्यात बोध आणि रंजन यांचा जो चविष्ट मेळ घातलेला असे, त्यामुळे वाचनीयता हा किमान गुण त्यांच्या ठिकाणी खचितच असे. नारायण हरी यांच्या 'न पटणारी गोष्ट' या कादंबरीवर प्रभातने 'कुंकू' हा अतिलोकप्रिय बोलपट काढला. खरे तर बोलपटाचा (कादंबरीचा) विषय बहुतेक कालबाह्य झाला होता. पण लोभ, लंपटपणा, स्वाभिमान, जिद्द, लढाऊपणा हे मनुष्याचे सनातन गुणदोष त्या कालबाह्य झालेल्या विषयाच्या अनुषंगाने इतक्या प्रभावीपणे चित्रित केले होते की, विषयाचे शिळेपण विसरून लोकांनी त्या चित्रपटाला डोक्यावर घेतले.

आपट्यांनी विपुल लेखन केले. १९२० सालानंतर त्या वेळी पुरोगामी समजल्या जाणाऱ्या 'किर्लोस्कर खबर' या मासिकाच्या संपादक मंडळात ते होते. नोकरदार मध्यमवर्गीयांना 'उद्योग, उत्साह व उन्नती' यांचे धडे देणे, हे या मासिकाने आपले कर्तव्य मानले होते. या विशेषांना उपकारक होईल असा संसार कशा रीतीने करावा, हे सांगणारी 'गृहसौख्य' व 'सुगरणीचा संसार' ही चवदार पुस्तके ना. ह. आपट्यांनी लिहिली. 'गृहसौख्या'च्या १२ आवृत्त्या निघाल्या. विवाहप्रसंगी आहेर म्हणून द्यायला अतिशय उपयोगी आहे, असेही सांगितले आहे.

'नाथमाधव' यांच्या प्रमाणेच नारायण हरी यांनीही आपली उपजिविका केवळ लेखणीच्या जोरावर केली. साताऱ्यापासून जवळच कोरेगाव नावाच्या ठिकाणी ते राहत. 'आपटे आणि मंडळी' या नावाने त्यांनी स्वतःची प्रकाशन संस्था काढली होती. पुढे पुण्याच्या हरि विनायक दात्ये यांनी आपट्यांच्या पुस्तकांचे अधिकार मिळविले व १९६९ सालापर्यंत नव्या आवृत्त्या ते काढीत होते.

धोंडो नारायण विद्वांस या गृहस्थांनी 'व्यायाम' हे मासिक १९१५ साली बडोदे येथून सुरु केले. हे मासिक जवळजवळ तीस वर्षे चालले. मासिकाच्या पहिल्याच वर्षी 'सुखाचा मूलमंत्र' ही कादंबरी मासिकातून प्रसिद्ध होऊ लागली. आपटे सांगतात की, 'ही कथा 'व्यायामा'त क्रमश: येत असतानाच ती लोकप्रिय होत गेली. हे पुस्तक विद्यार्थ्यांच्या हातात गेले पाहिजे, अशी पत्रे लेखकाला येऊ लागली. म्हणून इ.स. १९२४ साली पुस्तकरुपाने समाजापुढे हा मूलमंत्र ठेवण्यात आला. थोरामोठ्यांच्या आशीर्वादाने या पुस्तकाच्या अनेक आवृत्त्या निघत राहिल्या. (१९६९ च्या आवृत्तीतील 'लेखकाचे मनोगत'.)

१९२९ साली पुस्तकाची तिसरी आवृत्ती निघाली. त्या वेळच्या निवेदनात आपटे सांगतात की, तरुण विद्यार्थीवर्ग या ग्रंथास आपला जिव्हाळ्याचा सन्मित्र समजतात. त्याच्या वाचनाने, श्रवणाने, अभ्यासाने अनेक विद्यार्थ्यांच्या वर्तनात कल्पनातीत फरक पडला असून त्यांची आयुष्ये विशेष सुखकर झाली आहेत. केवळ या पुस्तकामुळेच किती जणांना तरी व्यायामाची गोडी लागून ब्रह्मचर्याची महती कळली आहे. किती ठिकाणी तरी व्यायामशाळा स्थापन झाल्या आहेत. तात्पर्य, अनेक मार्गांनी हे पुस्तक महाराष्ट्राच्या उपयोगी पडले आहे.

१९६९ च्या आवृत्तीस प्रा. व. दि. कुलकर्णी यांची प्रस्तावना आहे. तीत ते सांगतात की, एके काळी नारायण हरी आपटे यांची ही कादंबरी अगदी गाजलेली होती. शाळेत शिकत असताना या कादंबरीवर आम्हा विद्यार्थ्यांच्या उड्या पडत. तिचे सामुदायिक वाचन होत असे. एवढेच नव्हे तर त्या कादंबरीतल्या शिकवणुकीप्रमाणे वागण्याची शपथही कित्येक विद्यार्थी घेत असत.

या पुस्तकाला घसघशीत सरकारी आश्रय देखील लाभला होता. मुंबई, वऱ्हाड, मध्यप्रांत व इतर प्रांतांच्या विचारवंतांनी हे पुस्तक पुरवणी वाचनासाठी व शालेय ग्रंथालयासाठी मंजूर केले होते. बक्षीस म्हणून हे पुस्तक यावे अशी प्रथाच पडून गेली. यावरुन या 'मूलमंत्रा'ची लोकप्रियता व प्रभाव दिसून येतो.

१९६९ साली या पुस्तकाची शेवटची आवृत्ती निघाली, म्हणजे पुस्तक फार जुने झाले असे म्हणता येत नाही. पण हे पुस्तक ज्यांनी वाचले आहे, अशा व्यक्ती तुरळकच भेटतात. आजकाल व्यायाम, आरोग्य, बांधेसूदपणा, वजन-नियंत्रण अशा गोष्टींचे महात्म्य वाढले आहे. शहरातून कोपऱ्याकोपऱ्यावर आधुनिक तालीमखाने स्थापन झाले असून हजारो रुपये शुल्क भरुन लोक तेथे बलोपासना करीत आहेत. आमच्या ओळखीतील काही बलोपासकांना आम्ही ते पुस्तक वाचायला दिले. परंतु त्यांना पुस्तकात काही स्वारस्य वाटले नाही. 'व्यायम हा सुखाचा शाश्वत मूलमंत्र आहे' यावर पूर्ण विश्वास ठेवणाऱ्या मंडळींनाही त्याच मूलमंत्राचे बोधप्रद निरुपण करणारी कादंबरी वाचनीय का वाटू नये? ज्या कालखंडाच्या आशा-आकांक्षांना डोळ्यासमोर ठेवून व्यायामाचे महत्त्व आपट्यांनी आळविले त्या आशा-आकांक्षा आमच्या सध्याच्या जीवनक्रमातून इतक्या हद्दपार झाल्या आहेत की, व्यायामाची किंमत माहीत असणारे सुजाण लोकही ती कादंबरी वाचू शकत नाहीत.

## ३

पुण्यापासून दक्षिणेला शंभर मैलांवर एका नदीच्या कवेत आणि धोंडे बांधून रचलेल्या मारुतीच्या देवळाचे बाशिंग कपाळावर मिरविणाऱ्या टेकडीला उशाशी घेऊन सारंगपूर हे मध्यम वस्तीचे शहर पहुडले होते. शहरापर्यंत आगगाडी पोचली होती व इंग्रजी शिक्षण देणारी शाळाही होती. शाळा व आगगाडी दोन्ही घड्याळाला धरून चालणाऱ्या असल्याने घड्याळाची शिस्त लोकात पसरत होती व हाताला घड्याळ बांधणारी तुरळक माणसेही आढळू लागली होती. चहाची आवड अशिक्षितातही होती आणि चहाला चिवड्याची जोड जेणारे एखाददुसरे उपहारगृह धंदा करीत होते. 'विक्रम-शशिकला' सारखी फाजील नाटके करणाऱ्या नाटकमंडळ्यांना भरघोस आश्रय मिळत होता. पुण्या-मुंबईसारख्या शहरातील महाविद्यालयातून शिकून आलेले पालक आपल्याला आवडणाऱ्या रेनॉल्ड्सच्या उन्मादक कादंबऱ्या मुलांनी वाचू नयेत यासाठी कडीकुलुपात बंद ठेवीत होते.

अशा या विलायती चूर्षींकडे निग्रहने पाठ फिरवून पारंपरिक सदाचाराचा कडवा आग्रह धरणारी काही घरे सारंगपुरात होती. सहस्रबुद्ध्यांचे कुटुंब त्यापैकीच होते. व्रतस्थ आचरणातून शील व शरीर यांचे संगोपन करणे, हे या कुटुंबाचे ब्रीद होते. घरातल्या तुळयांवर नीतिवचने लिहिलेले फलक बसविले होते. सारवणाने अंगण तुकतुकीत ठेवलेले असे. अंगणात एका बाजूला कुटुंबातला तरुण मुलगा बळवंत भल्या पहाटे पाच-पाचशे सूर्यनमस्कार घालत असे. असा सडकून व्यायाम झाल्यावर तो व कुटुंबातील सर्व माणसे घरच्या गाईचे पाव-पाव शेर दूध पीत असत. 'चहा हे दारुइतकेच घातक पेय








आहे' अशी त्यांची खात्री होती.

बळवंत हा अतिशय सद्‌वर्तनी मुलगा होता. तो बहुधा १९-२० वर्षांचा असेल. पण उपहारगृहातील अमंगल व तामसी खाद्यांकडे तो अजिबात वळत नसे. छचोर कादंबऱ्या व शृंगारिक नाटके यांचा त्याला मनस्वी तिटकारा होता. स्वच्छ व टापटिपीची राहणी, सुदृढ शरीरयष्टीसाठी झपाटून व्यायाम, देशाच्या उज्ज्वल भवितव्याविषयी मोठमोठे बेत ठरवीत समवयस्क मित्रांसमवेत दोन-चार मैलांचा फेरफटका आणि पहाटे लवकर उठण्यासाठी रात्री लवकर बिछान्यात शांत झोप, असा त्याचा स्वच्छ धुवून चापून-चोपून वाळत टाकलेल्या शुभ्र पंचासारखा बिनसुरकुतलेला दिनक्रम होता. साफ ठेवलेल्या नेटक्या खोलीत चटईवर हरिणाजिन पसरुन तो एकाग्र चित्ताने अभ्यास करीत असे. इतके सर्व असूनही गेली दोन वर्षे तो मॅट्रिकला नापास होत होता.

आधुनिक टीकापद्धतीत प्रतियोगी (दी अदर) ही संकल्पना महत्त्वाची गणली जाते. 'क' या व्यक्तीचे बरे-वाईट विशेष ठसठशीतपणे दिसून यावेत यासाठी 'ख' नावाची हुबेहुब विशेष असणारी दुसरी व्यक्ती चितारलेली असते. अशा वेळी 'ख' ला 'क' चा प्रतियोगी म्हणतात. इथे बळवंत हा सात्त्विक व व्रतस्थ आहे; म्हणून त्याचा प्रतियोगी जोशी हा चैनी, व्यसनी, बेशिस्त आणि अभ्यासात हुशार, काव्याची आवड असणारा, नाटकांचा चाहता असा आहे. बळवंत सूर्योदयापूर्वी उठतो तर मुकुंद (व त्याचे कुटुंबही) सूर्य कासराभर वर आल्यावर उठतो. बळवंतला चहाचा तिटकारा तर मुकुंदाला चहावाचून दिवस व्यर्थ गेला असे वाटणार. मुकुंदाला उपहारगृहात जाण्याची चटक, विड्याकाड्या, सिगारेटींचा षोक, रेनॉल्डस्‌च्या चटोर कादंबऱ्या वाचण्याचा नाद, व्यायामाचा तिरस्कार, स्वच्छता नीटनेटकेपणा यांचा काच वाटत असे. सारांश बळवंताच्या दृष्टीने ज्या गोष्टी परम त्याज्य त्यांचे मुकुंदाला पराकाष्ठेचे आकर्षण.

अशा या दोन परस्परविरोधी आकर्षण केंद्रांच्या मध्ये मुकुंदा व बळवंत यांची मित्रमंडळी लटकत होती. बळवंताला वाटत होते की, या आपल्या मित्रांना आपल्या आदर्शवादी विचारांकडे ओढून घेतले पाहिजे व त्यांच्या सहाय्याने गावोगावी व्यायाममंडळे काढून व्यायामाचा प्रसार करणाऱ्या संस्थांची संघटना उभारली पाहिजे. मित्रांच्या त्या टोळीपैकी नागेश हर्णे व प्रभाकर चिपळूणकर हे बळवंताचे कट्टर अनुयायी बनले. त्या तिघांनी सारंगपुरात तालीम काढली व शाळकरी मुलांना व्यायमाची आवड लावण्याचे काम हाती घेतले. टोळीतील बाकीची मुले या उद्योगापासून लांबच राहिली व आपापले आयुष्य आपापल्या कुवतीनुसार जगू लागली.

मुकुंदाला बळवंताच्या आदर्शवादाशी काहीच देणे-घेणे नव्हते. आपला मार्ग अभ्यास, विद्वत्ता, साहित्य यांच्या अंगाने उत्कर्ष साधण्याचा आहे, असे त्याचे त्याने ठरविले होते. ही साधना करण्यासाठी जाग्रणे, चहाविडी सारखी किरकोळ व्यसने, उपहारगृहे नाट्यगृहे यांना भेटी या गोष्टी अपरिहार्य आहेत व तसे करण्यास काही वाईट नाही, असे त्याला प्रामाणिकपणे वाटे. अडचण असी होती की, या सगळ्यासाठी पैसे लागतात. ते मुकुंदाकडे नव्हते. सारंगपुरातील माधव देशपांडे हा मुकुंदाचा मित्र होता. तो मुकुंदाप्रमाणेच शिक्षणासाठी पुण्यात राहत होता व त्याचे वडील व्यवसायाने डॉक्टर आणि पैशाने धनत्तर असल्याने त्याची संगत मिळवून त्याच्या पैशाने चैनीत राहण्याची इच्छा मुकुंदा बाळगून होता. पुण्यात असताना, बळवंताच्या प्रभावक्षेत्रातून बाहेर असल्यामुळे माधव मुकुंदाच्या जाळ्यात अडकत असे व सुट्टीत घरी गेला की, त्याची ओढाताण होई.

अखेर एका निर्णायक प्रसंगामुळे माधवची खात्री पटली की, चैनीचे, आळसाचे, प्रत्येक प्रलोभनाच्या मागे धावण्याचे आयुष्य कितीही भुरळ पाडणारे असले तरी कर्मठ, सात्विक व बलोपासक जीवनक्रमच आणीबाणीच्या क्षणी उपयोगाला येतो. माधव व मुकुंद यांच्या देखत एक मुलगी विहिरीत पाणी काढण्यासाठी उतरली असता, पाय घसरुन पाण्यात पडली आणि बुडून मेली. माधवला पोहता येत नसल्यामुळे व मुकुंदाच्या ठिकाणी प्रसंगावधान व धाडस नसल्यामुळे ते त्या मुलीला वाचवू शकले नाहीत. या प्रसंगाची हाय खाऊन आणि पश्चात्तापाने होरपळून माधव सन्मार्गाकडे वळला. त्याने मुकुंदाची संगत सोडली व तो बळवंत आणि त्याचे सोबती यांच्यात सामील होण्याची आस बाळगू लागला.

तथापि, माधवला तावून सुलाखून व तपासून घेतल्याखेरीज आपल्या कळपात घ्यायचे नाही असे बळवंताने ठरविले होते. बळवंताचे मित्र नागेश व प्रभाकर आता पुण्यात शिकायला आले होते व बळवंत मुंबईला डॉक्टरीचे शिक्षण घेण्यास गेला होता. पुण्यात प्लेगची साथ आली आणि नागेश व प्रभाकर दोघांनाही प्लेगची लागण झाली. बळवंताला पुण्यात पोचायला उशीर लागला, पण दरम्यानच्या दिवसात माधवने दोघांची जिवापाड शुश्रूषा केली. इथे त्याचा पुरता कस लागला व बळवंताच्या संवगड्यात त्याला कायमचे स्थान मिळाले.

बळवंत, माधव व त्यांचे मित्र यांनी 'महाराष्ट्र व्यायाम प्रसारक मंडळ' काढण्याचा बेत केला. इकडे मुकुंदा त्याच्या व्यसनात, बेताल जगण्यात गुरफटून अधःपतनाच्या शेवटच्या टप्प्यावर पोचला, त्याच्या संसाराची धुळधाण झाली. बायको वारली. त्याने बळवंताला आपल्याला उपरती झाल्याचे कळविले आणि तोही राष्ट्रकार्यात दाखल झाला.

४

कादंबरीच्या उद्देशाला अनुसरून व स्वरूपाला अनुकूल अशी कथनशैली आपट्यांनी वापरली आहे. कीर्तनकार पूर्वरंगात आध्यात्मिक विचार सांगणारा एखादा अभंग निरुपणाला घेतो आणि उत्तररंगात तो विचार समजावून सांगणारे दृष्टांतपर आख्यान नाना तपशीलांनी खुलवत रंगवून सांगतो. 'सुखाच्या मूलमंत्रा'त तसेच घडते. तुला तरतरीत बुद्धी, आनंदी चित्तवृत्ती, निरोगी शरीर, कडकडीत भूक आणि शांत निद्रा पाहिजे ना? तर व्यायाम कर. हा कल्पवृक्ष तुझ्या सर्व इच्छा पुऱ्या करील. हा सुखाचा मूलमंत्र श्रोत्यांच्या मनावर बिंबविण्यासाठी बळवंत व त्याचा मित्रमेळा यांचे आख्यान रचले आहे.

कीर्तनकारबुवा आणि श्रोते यांच्यात एक विश्वासाचे नाते असते. आपण करीत असलेल्या उपदेशाला व निरुपणाला कोणाचा विरोध नाही याची बुवांना खात्री असते. त्यामुळेच, मधूनमधून कथाकथनाच्या बाहेर जाऊन बुवा श्रोत्यांशी जवळीक साधणारा संवाद करतात किंवा त्यांचे लक्ष महत्त्वाच्या मुद्द्याकडे लक्ष वेधून घेण्यासाठी त्यांना साद घालतात. त्यातून कीर्तनात वेगळा जिव्हाळा निर्माण होतो. 'सुखाचा मूलमंत्रा'त अशा आवाहनांच्या जागा बऱ्याच आहेत. 'वाचकांनो, डोळे मिटा झाले!' 'अप्रबुद्ध माते!... तरीही सोन्याला चहा पाजण्याचे कौतुक, अं!' 'दुर्दैवी समाजा, तुला तुझे हित केव्हा कळणार?' अशी संबोधनपर वाक्ये अधूनमधून येतात. कधीकधी मुलांना कसे वाढवावे, त्यांना चांगल्या सवयी लागण्यासाठी काय करावे, ज्यांचा आदर्श मानावा असे पुढारी कोणते (यात म. गांधींचा उल्लेख नाही) अशा विषयांवर लांबच लांब व्याख्याने घातली आहेत. कीर्तनात हा अघळपघळपणा चालतो, कारण ऐकणारे बुवांच्या पूर्ण कह्यात गेलेले असतात. आपट्यांनी ही कीर्तनाची धाटणी बेमालूम साधली आहे. त्यामुळे 'चहाचे व्यसन दारूच्या व्यसनाइतकेच घातुक आहे' अशी एरवी हास्यास्पद वाटणारी अतिशयोक्तीही खपून जाते.

कीर्तनकार आपल्या निरूपणात पुष्कळदा भरपूर पण अवांतर तपशील देतो. त्यामुळे कथेला काहीसा भाबडेपणा व त्यामुळेच बराचसा गोडवा येतो. कादंबरीत एक प्रसंग असा आहे, की बळवंत व त्याचे खेळगडी पहाटे, चांदण्यात फिरायला गेले. अशा वेळी इतर तालीमबाजांचा खोळंबा होऊ नये म्हणून त्यांनी रखवालदाराकडे तालमीची किल्ली दिली. ही किरकोळ गोष्ट आहे. हा फालतू तपशीलही आपटे आवर्जून देतात. त्यामुळे वाचकाला उगीचच वाटते की फिरायला जाणाऱ्यांच्या टोळीबरोबर आपणही आहोत.

माधवला पश्चात्ताप झाला आणि आपल्या अनिष्ट सवयींना सोडचिठ्ठी देऊन तो चांगल्या सवयी लागाव्यात अशी खटपट करू लागला. परतु अंगी बाणलेले दुर्गुण त्याला पुनःपुनः खाली खेचण्याचा प्रयत्न करीतच होते. प्रत्येक वेळी मोहाला बळी पडताना माधवला ठोकर बसली व तो सन्मार्गावर आला. याचे तपशील आपट्यांनी फार बारकाव्याने भरले आहेत. सिगारेटचे दुर्व्यसन सोडण्याचा निश्चय केल्यानंतरही एका रात्री माधवला सिगारेट ओढण्याची अनिवार इच्छा झाली आणि तो बिडीवाल्याच्या दुकानावर गेला. 'त्याने शरमेने इकडे-तिकडे पाहत व पैशाकरिता खिसा चाचपीत, 'सिझर सिगरेटची पैटी आहे का ?' असा प्रश्न केला. विडीवाल्याने विडी वळत उत्तर दिले, 'नाही साहेब, आमचे हे देशी मालाचे दुकान आहे. नमुना घेऊन बघा' असे म्हणून त्याने एक विडी व काड्याची पेटी माधवापुढे केली. तोच जवळून कोठे तरी नागेश चालल्याचे माधवास वाटले. वास्तविक तो निव्वळ भास होता; किंबहुना त्याच्या साशंक मनाने त्यास तसे भासविले होते. पण तेवढ्याने तो किती भयभीत झाला! त्याने चटकन् आपली पाठ रस्त्याकडे केली. आणि म्हटले, 'छे! मी रस्त्यावर नाही विडी ओढीत. दोन पैशाच्या तुमच्या फर्स्टक्लास नरम विड्या द्या म्हणजे झाले.' असे म्हणून खिशातून एक दुहेरी पैसा म्हणून काढून दुकानदाराच्या अंगावर फेकला. वास्तविक तो दुहेरी पैसा नसून रुपया होता. भांबावल्यामुळे माधवास ते समजले नाही. विडीवाल्याने मात्र दुंड्या ऐवजी आपल्याला काही निराळे मिळाले आहे, हे तेव्हाच ओळखले आणि त्या हर्षात त्याने नरम मालाऐवजी कडक माल माधवाचे हातात दिला!

काही तपशील फारच रोचक होतात. उदा मुकुंदाच्या खोलीचे वर्णन 'कधी न झाडलेला, कधीही उन्ह न दाखविलेला कुबट व घामट बिछाना अस्ताव्यस्त पसरला होता. बिछान्याखाली फाटक्या चटया अंथरल्या होत्या व त्यावर सर्वत्र

वारंवार ओढून टाकलेली विड्यांची थोटके व जळक्या काड्या पडल्या होत्या. एका ठिकाणी कधी कधी विडा खाऊन थुंकलेल्या पिंकांचे रंगीत काम दिसत होते...'

पौराणिक कथातील नायकाचा प्रतियोगी दुर्गुणांचा पुतळाच असतो, असे नाही. त्याच्याही ठिकाणी काही स्पृहणीय गुण असतात. रावण विद्वान होता. कंसाचे आपल्या बहिणीवर निरतिशय प्रेम होते. पौराणिक कथातील हा तोल आपट्यांनी जाणीवपूर्वक सांभाळलेला दिसतो. खरे तर मुकुंदाला वाईट ठरविण्यासाठी कितीतरी दुर्गुण आपटे त्याला चिकटवू शकले असते. 'पण लक्षात कोण घेतो?' या कादंबरीत हरिभाऊ आपट्यांनी शंकरमामंजीला लबाड, बदफैली, भ्रष्टाचारी, स्वार्थी व क्रूर करुन टाकले आहे; त्याप्रमाणे ना.ह. देखील मुकुंदा वेश्यागमनी आणि दारुडा असल्याचे दाखवू शकले असते. (ही कादंबरी कुमारांसाठी आहे याचे भान असल्यानेही कदाचित त्यांनी असे उत्तान दुर्गुण दाखविले नसतील.) आपटे तसे करीत नाहीत. मुकुंद माधवला घेऊन एका गाणारणीच्या माडीवर जातो, असा प्रसंग त्यांनी वर्णिला आहे. काही दुष्प्रवृत्तींचे त्यांनी सूचन केले आहे. उदा. मुकुंदाला (बहुधा) मुष्टीमैथुनाची सवय आहे. एक-दोन ठिकाणी मुकुंद दोन पुरुषांमधील आकर्षणाचा कुत्सित उल्लेख करतो. (वाहवा! वाहवा! माधवराव, बळवंतरावांवर अगदी कुर्बान आहेत बुवा! काही भानगड नाही ना?) पौराणिक कथांतून रावण-कंसासारखे प्रतियोगी नायकाकडून मारले गेल्यावर त्यांची प्राणज्योत नायकात विलीन होते. तीच गोष्टी 'सुखाच्या मूलमंत्रा'त होते. मुकुंद बळवंताने काढलेल्या व्यायामाच्या चळवळीला पाचशे रुपयांची देणगी देतो व व्यायाम न करण्याचे तोटे स्वतःच्या उदाहरणावरुन समजावून सांगणारी व्याख्याने देतो.

५

'सुखाच्या मूलमंत्रा'ला लाभलेली उदंड लोकप्रियता व किमान तीस वर्षे तरी त्या कादंबरीने कुमारवयातील वाचकांवर टाकलेला प्रभाव यांचे बीज निरूपणाची शैली आणि सरळ, साधे व बाळबोध कथानक यांच्यातच केवळ आहे, असे आम्हाला वाटत नाही. ज्या काळात व ज्या सामाजिक स्थितीत ही कादंबरी लिहिली गेली त्या काळाची व स्थितीची नस या कादंबरीने पकडली हे ध्यानात घेतले पाहिजे.

हे अगदी स्पष्ट आहे की, हा वाचकवर्ग ब्राह्मण आहे. नाही तरी १९१५ पासून ४५ पर्यंतच्या वाचकात ब्राह्मणेतर सुशिक्षित फारच थोडे आढळले असते. कादंबरीतील सर्व प्रमुख पात्रे ब्राह्मणच आहेत. मुळात शाळकरी मुलांच्या गटात तुकाराम जाधव, व्यंकटेश हिंगे, विष्णू सोनार अशी काही ब्राह्मणेतर मुले असल्याचेही दिसते. पण पहिल्या प्रकरणानंतर त्यांचा उल्लेख फक्त एकदाच येतो. ('त्या भोमेश्वराची (व्यंकटेश हिंगे) विष्णूची व तुकारामाची काय स्थिती आहे?')

हे सर्व जण आपापतः ब्राह्मण म्हणून जन्माला आले, इतक्या पुरतेच त्यांचे ब्राह्मणत्व नाही. आपण ब्राह्मण असल्यामुळे आपल्याकडे काही इतिहासदत्त कार्य आले आहे, अशी त्यांची धारणा आहे. ब्राह्मण असलेल्या रामदासांच्या मार्गदर्शनाने शिवाजी महाराजांनी महाराष्ट्रात चातुर्वर्ण्याची घडी पुनः बसविली, असे इतिहासाचार्य राजवाडे वारंवार सांगत होते. बळवंतालाही त्याचा सवंगडी 'आधुनिक रामदास' असे एकदा संबोधतो, सर्व समाजाला शीलसंवर्धन व सुदृढ शरीर यांची शिकवण देण्यासाठी 'महाराष्ट्र व्यायाम मंडळ' काढतो.

पुढे शिवरामपंत दामल्यांनी असे मंडळ पुण्याला टिळक रस्त्यावर काढले, हे प्रसिद्धच आहे. सारांश कादंबरीतील जगाचा केंद्रबिंदू ब्राह्मण-समाज आहे व साऱ्या समाजाला आदर्श वर्तणुकीचा धडा घालून देण्याचे काम आपले आहे, असी त्या ब्राह्मण वर्गाने खूणगाठ बांधली आहे. सारांश, कादंबरीतील जग हे ब्राह्मणांचे असले तरी आपल्या कोषाच्या बाहेर जाऊन राष्ट्रगुरु होण्याची आकंक्षा त्या वर्गाने मनाशी बाळगली आहे.

असे असले तरी ह्या ब्राह्मणात आपण वेढ्यात सापडलो आहोत, आपली कुचंबणा होत आहे, आपल्या योग्यतेनुसर जशा प्रकारचे नेतृत्व आपणाकडे चालून यायला हवे होते, तसे नेतृत्व आपल्याला दिले जात नाही अशी रुखरुख या कादंबरीतील पात्रांच्या तोंडून कधीकधी व्यक्त होताना दिसते. 'परवा धुळवडीच्या दिवशी आपण मुसलमान मोहल्ल्यातून जात असता आपला जो अपमान झाला, त्याचे तुम्हाला स्मरण नसेल, पण मला चांगले आहे.' 'परवा या माधवच्या गाईला एका मराठ्याच्या मुलाने चाबकाचा तडाखा दिला. याला म्हणे मोठा राग आला. काय उपयोग? तो पोरगा होता सशक्त.' व्यायामाचा आपट्यांनी सांगितलेला मंत्र सर्वांसाठी असला तरी प्रथम तो ब्राह्मणांनी जीवनात उतरवावयाचा आहे. 'त्यापरि विप्रे धर्मा जागुनी, नमस्कार बहु घालावे' असे या तरुण मंडळींच्या ब्रीद गीतात म्हटलेच आहे. (प्रा. व. दि. कुलकर्णी यांनी 'सुखाच्या मूलमंत्रा'च्या ६९

सालच्या आवृत्तीला जी प्रस्तावना लिहिली आहे तीत हा मंत्र जो जाणतो त्याला विप्र म्हणावे अशी मखलाशी कालक्रमानुसार केली आहे.

व्यायाम हा पौरुषप्राप्तीचा उपाय आहे. बंगालच्या फाळणीच्या विरोधात जी मोठी चळवळ झाली त्या काळात बंगाल भद्र समाज (ब्राह्मण, वैद्य व कायस्थ) शरीर-सामर्थ्य कमाविण्याच्या मागे लागला होता. इंग्रजांचे राज्य बंगालमध्ये स्थापन झाले तेव्हापासून इंग्रज या भद्रलोकांची म्हणजे बंगाली बाबूंची 'एफेमिनेट' म्हणजे 'बायकी' म्हणून अवहेलना करीत आले होते. बंगालची फाळणी झाल्यानंतर तर अशा निंदेला ऊत आला. बंगालचा गव्हर्नर सर ब्रॉमफिल्ड फुल्लर याने एका भाषणात सांगितले होते की, 'बायकी बंगाली बाबूंपेक्षा तगडे मुसलमान आम्हाला जवळचे वाटतात.' फाळणीविरोधी चळवळ मुसलमानांच्या विरोधात नव्हती तरी त्या चळवळीत हिंदू-मुसलमाननांच्या वैरभावाचा एक गुप्त विचार-प्रवाह होताच. असे सांगण्याचा मुद्दा हा की, बंगालच्या फाळणीनंतर आखाडे, कवायत, व्यायाम यांचा सोस भद्रलोकात वाढला.

आपण पूर्वी पाहिलेच आहे की, १८७० ते १९२० या काळात महाराष्ट्र व बंगाल यांच्यातील संबंध फारच घनिष्ट झाले होते. बंगालमधील चळवळीला महाराष्ट्राने प्रचंड पाठिंबा दिला होता. बंगालमध्ये शिवाजी-उत्सव साजरा होत होता. नागपूर - वऱ्हाडकडचे विद्यार्थी कलकत्त्याला शिकावयास जात होते. त्यामुळे भद्रलोकांना लागलेला पौरुषाचा ध्यास महाराष्ट्रातील ब्राह्मणातही पसरत चालला. (आम्ही जेव्हा ब्राह्मण असा उल्लेख करतो तेव्हा त्यात प्रभू, पाठारे वगैरे सुशिक्षित व पांढरपेशा जातींचाही समावेश असतो.) 'ब्रह्मचर्य हेच जीवन व वीर्यनाश हाच मृत्यू' हे त्या काळातले दुसरे गाजलेले पुस्तक पौरुषाच्या उपासनेचाच संदेश देत होते. मुसलमान मर्दानी आहेत. ते जास्त बायका करतात, त्यांना मुलेही जास्त होतात, मुसलमानांची संख्या वेगाने वाढत असून काही वर्षात त्याची संख्या हिंदूंपेक्षा जास्त होईल, अशा आशयाचे लेख बंगाली वर्तमानपत्रात येत आणि त्याचे पडसाद मराठी वृत्तपत्रात उमटत. मुसलमानांची कुटुंबे मोठी असतात याचा उपरोधिक उल्लेख 'सुखाचा मूलमंत्र' या कादंबरीत असा आला आहे. 'तोच कोणी एका मियां शिरजोरखां सहकुटुंब तेथे येऊन थडकले. त्यांचे हसन, हुसेन, गुलाब, प्यारी ही कच्चीबच्ची बिबीकी स्वारी व आकंठ भरेल इतका संसार होता.' पोलिस, त्यांचा जुलुम व त्यांच्या दडपशाहीमुळे दीन झालेली रयत हा त्या काळातला कायमचा अनुभव होता. महाराष्ट्रीय सशस्त्र क्रांतिकारकांचे उच्छेद करण्यासाठी पोलिसांनी अघोरी उपाययोजना चालविली होती. त्यामुळे पोलिसांची जबरदस्त धास्ती हा त्यावेळच्या समाजाचा स्वभावविशेष झाला होता. पोलिसांच्या शिरजोरीला ताठपणे उत्तर देणारा मनुष्य वीरपुरुष समजला जाईल. प्रस्तुत कादंबरीत असा एक प्रसंग दाखविला आहे. कथानायक बळवंत आगगाडीच्या एका डब्यात शिरला, डब्यात खेचाखेच गर्दी होती. त्यातही एक धटिंगण पोलिस सारे बाक अडवून पसरला होता.तेव्हा बळवंताने त्या शिपुरड्यांच्या सणसणीत थोबाडीत लगावली आणि बाक मोकळे करून घेतले.

पौरुषाचा ऱ्हास होण्याची भीती हे देखील नाटके व गाणेबजावणे यांच्या तिरस्कारामागचे एक कारण होते. या छंदामुळे जागरण होते, रसिकाच्या मनातील शृंगारभावना चेतविल्या जातात व त्यामुळे वीर्यनाश होतो. अशी त्या तिटकाऱ्यामागची कारणपरंपरा होती. त्या काळातील राष्ट्रीय कीर्तनकार या तऱ्हेचा उपदेश आवेशाने व त्वेषाने करीत असत. हे खरे आहे की, या कलांचा अभ्यास व व्यवसाय करणाऱ्यात ब्राह्मणच मोठ्या संख्येने होते व त्यांनी प्राविण्यही मिळविले होते. पण राजकीय आणि वैचारिक नेतृत्व करणाऱ्यात या कलांची फारशी चहा नव्हती. लो. टिळकांना नाटक व गाणे यांचे वावडे होते असा प्रवाद सर्वदूर पसरला होता. बडोद्यातील राज्यसुधारणेवर लिहिताना इतिहासाचार्यांनी सयाजीराव महाराजांना सल्ला दिला होता की, गवई, वादक, आणि नाटकमंडळ्या यांना संस्थानात पाऊल ठेवू देऊ नये.

व्यायाम व शीलसंवर्धन या स्पृहणीय व शाश्वत कर्तव्यांचा उपदेश या कादंबरीने केलाच पण ज्या समाजाला उद्देशून हा उपदेश होता त्या समाजाच्या मनातील स्पंदनांना या पुस्तकाने शब्दरूप दिले होते. त्या समाजाशी नाते सांगणाऱ्या पिढ्या जोपर्यंत होत्या तोपर्यंत म्हणजे सुमारे ३०-३५ वर्षे या कादंबरीचा प्रभाव टिकून होता. आताच्या पिढीला व्यायामाचा छंद आहे, पण तो त्या पिढ्यांच्या सुखलोलुप वृत्तीचा भाग आहे. आपट्यांना अभिप्रेत असणाऱ्या पिढीच्या मनोवस्थेशी या पिढीची नाळ जोडलेली नाही.

## ६

कादंबरीत जो ब्राह्मणसमाज रंगविला आहे त्याच्या ठिकाणी काहीशा परस्परविरोधी अशा दोन भावना दिसून येतात. आपली कोंडी झाली आहे व आपल्या कर्तृत्वाला अनुरूप असा मान आपल्याला लाभत नाही, ही एक भावना.






ही कोंडी करणाऱ्यांपैकी प्रमुख म्हणजे परकी राजवट व त्या राजवटीच्या आश्रयाने उद्दाम वर्तन करणारे मुसलमान. येथे हे लक्षात घेणे जरूर आहे की, १८९३ सालापासून महाराष्ट्रात हिंदू-मुसलमानांचे दंगे होऊ लागले आणि १९०९ साली मोर्से-मिंटो सुधारणांनी मुसलमानांना स्वतंत्र मतदारसंघ दिले.

आपण वेढ्यात सापडलो आहोत, आपण घुसमटत आहोत या मनोभूमिकेमुळे आपटयांनी वर्णिलेल्या समाजात लोभस व कौटुंबिक एकोपा निर्माण झालेला दिसतो. उदा. मुकुंदाच्या दुर्वर्तनाबद्दल बळवंताचे वडील बंधू मुकुंदाच्या वडिलांना सावधगिरीचा इशारा देतात. मुकुंदाच्या वडिलांना त्याचा राग येत नाही किंवा 'तुम्हाला काय त्यांचे?' असा उद्धट प्रश्नही ते विचारीत नाहीत. 'आम्ही लवकरच त्याचे लग्न करतो आहोत (म्हणजे तो सुधारेल)' असे उत्तर ते देतात. दुसरे उदाहरण असे की, मुकुंदाची बायको आजारी पडली तेव्हा बळवंत व मुकुंद यांची तेढ विकोपाला गेली होती. तरीही तिच्यावर उपकार करण्याची गळ बळवंताला घालताना मुकुंदाने संकोच केला नाही आणि बळवंतानेही उपचारांची पराकाष्ठा केली. असे पुष्कळ प्रसंग सांगता येतील.

या ब्राह्मणवर्गाच्या ठिकाणी उद्भवलेली दुसरी भावना अशी की, आपण आपल्या आदर्श वर्तनाने समाजात आपल्याविषयी पूज्यभाव जागृत करावयाचा आणि राष्ट्रगुरुचे स्थान मिळवावयाचे. बळवंत व त्याचे सहकारी तारुण्यसुलभ विकार बाजूला ठेवून व प्रलोभनांचा निग्रहाने त्याग करून व्रतस्थ राहण्याचा संकल्प धरतात. ही साधी गोष्ट नव्हे किंवा क्षणिक ऊर्मी नव्हे. अध्यात्मिक उन्नतीसाठी एखादा साधक असे करीलही; पण समाजमनस्कता आणि सार्वजनिक ध्येयवादासाठी असा कर्मठपणा पत्करणे हा अवघड निश्चय आहे. समाजाच्या गुरुचे पद आपणास मिळावे या आकांक्षेने हे तरुण तो वसा घेत झाले. (याचा अर्थ असा नाही की प्रत्येक ब्राह्मण किंवा ब्राह्मण जातीतील बहुतेक लोक सच्चरित व सुदृढ होते. अनेक पुढाऱ्यांना अशी स्थिती यावी असे वाटत होते, इतकाच त्याचा मतलब आहे).

स्वातंत्र्योत्तर काळात मुख्यत: गांधीहत्येच्या निमित्ताने ब्राह्मणातीलच विचारवंतांनी ब्राह्मणांच्या या मानसिकतेची धिक्कारयुक्त मीमांसा करण्यास सुरुवात केली. टिळकांच्या मृत्यूनंतर ब्राह्मणांना जी घुसमटल्याची भावना झाली तिला अतिरेकी व हिंस्र वळण लागून गांधीजींचा खून झाला असा स्वरूपाचे ते विश्लेषण होते. कोंडी झाल्याच्या भावनेतून निर्माण झालेला कौटुंबिक एकोपा कितीही लोभस वाटला तरी त्याच्या मुळाशी विखार असल्यामुळे त्याचा परिणाम ब्राह्मणजात एकूण मराठी समाजापासून वेगळी पडण्याकडे होत आहे. समाजाचे गुरु किंवा मार्गदर्शक होण्याची आकांक्षा कदाचित भाबडी व हळवे करणारी असली तरी तिच्या पोटाशी अहंकार आहे व सेवावृत्ती नाही. त्यामुळे ब्राह्मणेतर जाती ब्राह्मणांना गुरु किंवा आदर्श म्हणून स्वीकार करणार नाहीत, असा ह्या विचारवंतांचा आग्रही युक्तिवाद होता.

एकविसाव्या शतकाच्या सुरुवातीला परिस्थिती पूर्ण पालटली आहे. 'सुखाचा मूलमंत्र' या कादंबरीची जी मुख्य शिकवण आहे, ती वरपांगी तरी सर्वदूर पसरल्यासारखी दिसते. व्यायाम हा अनेक तरुण-तरुणींच्या दिनक्रमाचा भाग झाला आहे. गिर्यारोहणाला अभिमानास्पद छंदाची जागा मिळाली आहे. नीतिमत्ता व सदाचार यांचे अभ्यासक्रम शाळातून चालत असतात. अध्यात्मपर व नित्युपदेशक धडे देणाऱ्या दूरदर्शन-वाहिन्या लोकप्रिय आहेत. कोणत्या ना कोणत्या सेवाभावी संस्थेच्या कार्यक्रमात भाग घेणे प्रतिष्ठेचे समजले जाते. सारांश 'सुखाचा मूलमंत्रा'ने ज्या उपक्रमांचा आग्रह धरला होता त्यांची अंमलबजावणी उत्साहाने होत आहे.

परंतु मूलमंत्राचे रहस्य समाजात असणारा कौटुंबिक एकोपा आणि व्रतस्थ आचरण यात होते. या दोन्ही बाबी विरळा होत आहेत. दोरा तुटून मणी सांडून जावेत व घरंगळत जवळ आल्यास परस्परांना कोपरखळी देऊन बाजूला सरावेत तशा विखुरलेल्या व्यक्तींचा जथा म्हणून माणसे जगत आहेत. मूलमंत्रातील उपक्रमांना भरती आली आहे पण त्याचे रहस्य निसटून गेले आहे. हें चांगले की वाईट हे ठरवण्याचा इथे हेतू नाही. असे होणे भांडवलशाहीच्या विकासक्रमानुसार अपरिहार्यही असेल. एके काळी लोकप्रिय व कुमारमनांवर प्रभाव टाकणारे पुस्तक आता स्मरणातूनही का गेले असावे याचा हा शोध आहे.

(टीप - याच स्वरूपाचा लेख प्रस्तुत लेखकाने 'औदुंबर' मासिकाच्या २००२ च्या दिवाळी अंकात लिहिला होता.)

☑☑☑

शरीरम् आद्यम्
खलु धर्मसाधनम् ।





# Jigsaw कोडे...



मुखपृष्ठ : रेखांकन
नितीन सोहनी

हे उत्तर असू शकेल काय ?

आणि Jigsaw चे तुकडेच आपले आकार रंगरूप सतत बदलत असतील तर ?





अनुक्रमणिका

(मुखपृष्ठ क्र० २ वरुन)

हुषार, चतुरच. खुद्द स्त्रियांच्याच मनात हिचा वास अदृष्यपणे खोल घट्ट रुजलेला. अनेक राजवटी आल्या आणि गेल्या. पण प्रत्येक काळात बाईतलं बाईपण वेगवेगळ्या प्रकारे तिच्या माणूसपणावर कुरघोडी करीत राहिलं. भोगत असलेल्या अमानवी व्यवस्थेचा हा असाच क्रम, पुढं व्यवस्थित चालता ठेवणारा पुरुष जन्माला घालण्यात तिलाही सुरक्षितता वाटते. संसार प्रपंचाची हाव तिलाच असते. सुंदर दिसण्याचा आग्रह आणि त्या खटाटोपावर बेतलेले मोठमोठे व्यवसाय स्पर्धा तिच्यासाठीच. आपल्याच (बाई) जातीत सतत लढत स्वतःवर पुरुषी व्यवस्थेचं साम्राज्य ओढवून घेणारी ती हीच बाई. सरळ, साधी, अज्ञानी... !

गर्भात असल्यापासून ती चिवट आहे म्हणतात. जाणतेपणी तिला जिवंत जाळली, जन्मतःच तिचा जिवंत गोळा मडक्यात लिंपून टाकला, कुरुप, विद्रुप करून अर्धपोटी राबवून घेतली. मारझोड, टोमणे साधीच बाब. ती फक्त देह आहे जणू. केवळ देह असलेल्या तिच्या जगण्याला वळण देणारा मालक समाजव्यवस्था आहे. तिच्यावरील सत्तेचं षडयंत्र ती आजही ओळखू शकत नाही. शोषण विरहित समाजाचं स्वप्नं बघणाऱ्या मार्क्सच्या तत्त्वज्ञानात आजही कायमच 'डाव्यां'च्या ही डावीकडे असणाऱ्या या बाईचे दिवस कधी उगवणार आहेत...?

तरी बरंच काही होऊनही ती आहेच. संपता संपता जगतेय, नवीन बाईमाणसात. 'माणूस' होण्याच्या प्रयत्नात नवा पिंड घडतोय तिचा. शेतात, कारखान्यात, रस्त्यावर, माजघरात, झोपडी, हवेलीतले असतील वेगळ्या रंगाचे हे मणी. पण एकाच बाईपणाच्या धाग्यात ओवलेले.

गोष्ट कुठून सुरु झाली बरं... ! तर ते १९९९ साल होतं. वयानं पन्नाशी गाठली होती. जगण्यातला 'अर्थ आणि कारण' तसंच 'समाज आणि कारण' एवढंच नव्हे, त्यातलं राजकारणही स्पष्ट समजू लागलं होतं. ती सती जाणारी केशवपन होणारी, मुलग्याला जन्माला घालण्याच्या अग्रहातून 'स्वतःलाच' मिटवणारी बाई, नवऱ्याचं घराणं, संस्कृती, प्रतिष्ठा आपल्या जगण्यातून जतन करीत होती. आतून गुदमरत होती. या गुदमरणाऱ्या असंख्य आदीम मनांचा पीळ आपल्या मानेभोवती पडल्याची भावना भयंकर त्रास देत होती. मुक्ती नव्हती. जीव तडफडत होता. की त्या माझ्यात जिवंत होऊन माझ्या माध्यमातून विद्रोहात होत्या ? कुणास ठाऊक पण मी त्या सगळ्यांशी प्रामाणिक होते. पूर्णपणे.

आता साठीकडे आले असताना काळ खूप बदललाय असं नाही. पण चाळीस पन्नाशीत असताना माझं लखलखतं सत्त्व नोकरीतल्या कामात, घरी-दारी कोणतीही तडजोड करायला तयार नव्हतं. संपूर्ण व्यवस्थेची मोडतोड होण्याची निकड जाणवत होती. हा सगळा अल्ला गदारोळ घेऊन मुलांना शिकवायला म्हणून उभं राहिल्यावर अपण स्वतःच एक मूल्य झालो असल्याची अनोखी जाणीव होत होती. अर्थात, त्याला कामकाजात, व्यवहारात मान्यता न मिळता बाजूला पडल्यासारखं वाटत होतं. 'सत्याची जात' मनातून दिवसेंदिवस ठळक, उजळ होत होती.

तरीही महाविद्यालयीन स्तरावर अध्यापन करणाऱ्या आजच्या प्राध्यापक स्त्रीवर अजूनही व्यवस्थेचं गारुड आहेच. इतिहास घडवून गेलेल्या आणि समतेच्या नावानं गाजत असलेल्या विळ्या हातोड्याचं निशाण, आजही तिच्या काळजावर उमटत नाही. नवीन विवाह झालेली अध्यापिका, महाविद्यालयाच्या विश्रांतिकेत बसून फावल्या वेळेत वहीवर मन लाऊन 'लक्ष लक्ष गोपद्म' रेखाटण्याचं व्रत करीत असेल, तर आजवर मन मारून जगलेली बाई 'डोकं'ही कसं हरवत चाललीय, त्याचा हा 'विज्ञाननिष्ठ (!) वातावरणातला ताजा पुरावाच म्हणायचा!'

जिल्हा वाचनालयाचे किंवा आयकर कार्यालयातील जिने चढत जाताना प्रत्येक वळणावर कोपऱ्यात भगवा रंग लावलेले दगड! वाचणाऱ्या, विचार करणाऱ्या, आयकर भरणाऱ्या पुरुषांना जर स्वच्छतेसाठी 'अशा दगडांचा' धाक बसवावा लागत असेल तर कुठल्यातरी आदीम-गूढ काळात वावरत असल्याची भयप्रद जाणीव झाल्याशिवाय राहत नाही. 'त्यांच्याच व्यवस्थेत' दुय्यम स्तरावर जगणाऱ्या बाईची फसवणूक करता करता, आपण आपलीही केवढी घोर फसवणूक करतोय याचं त्याला भान नाही एवढंच सत्य मग राहतं. हा अडाणी जत्रेतला असा हा समाज! (पुरुष!)

आपल्या कामासाठी परदेशी पुरस्कार मिळणाऱ्या 'अंनिस' वाल्यांना 'इथं' जराही मरण नाही, एवढं खरं. आता त्यांनी आपला मोर्चा दलित-पीडीत खेडुतांबरोबर पांढरपेशा 'विद्वान' स्त्री-पुरुषांकडेही वळवावा. हे खरं सर्वाधिक आव्हानात्मक!

पुरुषप्रधान व्यवस्थेला समता, सहजीवन, मैत्रभावनेचा अजूनही पत्ता कळू नये. २१ व्या शतकात येवूनही तो बिचारा ओझंच वाहतोय. मालकीपणाचं. बिचाराच खरं तर, पुरुषीपणाखाली दबलेला!

एकेकाळी त्यांची स्त्रियांना केशवपन करण्यासाठी जबरदस्ती. तर धावपळीच्या आजच्या दिवसात सुटसुटीत केस ठेवण्याची इच्छा बाळगल्यास, 'केसांना कात्री लावल्यास याद राख!' असं म्हणणारी ही दुधारी व्यवस्था! तो मालक म्हणावा तर बाईलाच भिणारा. शहाणा म्हणावं तर अडाणी आणि अमानुषपणाचं टोक गाठणारा. अधिकारी म्हणावं तर बायका बायकांतच फोडा आणि झोडाचं तंत्र अवलंबणारा. कसा हा कळत नाही की अपुरा, पोरका हा? एकटेपणाच्या भावनांनी भेदरलेला? षडयंत्रकारी?

केस कापण्याला, वाढविण्याला पसंती देईल, केसाच्या 'डोक्याची' मालक! म्हणूनच मनाचा मालक जेव्हा 'डोक्याचा'ही मालक व्हायला बघतो तेव्हा तरी सावध व्हायला पाहिजे. प्रश्न केवळ डोक्यावरच्या केसांचा नाही. आपल्या स्वतःच्या निर्णयाचा आणि तो न घेता येण्याचा आहे. या वरच्या गोष्टी निमित्त फक्त!

आज, साठीच्या दशकात आले असताना त्यावेळचा तो विद्रोह, सात्विक संताप आठवतो. 'रिले' नावाच्या खेळातल्यासारखी माझ्या अस्तित्वाची आणि माणूसपणाची छडी घेऊन मी जणू धावत होते. आता हिरीरीनं नवीन मुली येतायत या खेळात. समाधान आहेच. पण बाईनं माणूसपणाची छडी घेऊन धावणं काही कमी होत नाही. कितीही धावलं तरी गोल असलेल्या पृथ्वीवरचं क्षितीज दूरच रहावं, तशी ही व्यवस्था अजूनही शाबूत आहे. उगवणाऱ्या नवीन दिवसाबरोबर नवनवीन देवभोळेपणाच्या कृती शिकलेले स्त्रीपुरुष मन लाऊन श्रद्धेनं करतायत. स्त्रिया तर व्रतवैकल्याच्या, नवनवीन रीतीरिवाजाच्या अवडंबरात सामावून जाण्यासाठी जिवापाड धडपडतायत आणि 'अशा अंधारात, खाचखळग्यात' आम्हा काहीजणींचा (क्वचित जणांचाही) रिले जारीच आहे. विखुरलेल्या या बाईमाणसाचं 'स्वा'क्षरीकरण, सशक्तीकरण चालूच आहे. २१ व्या शतकात येऊनही बाईमाणसाच्या रिलेची धामधून. किती आश्चर्य आहे!





आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

# प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

| | सुधारित किंमत २० नोव्हेंबर २००६ पासून लागू |
|---|---|
| ❑ वैदिक संस्कृतीचा विकास (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु. |
| ❑ अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु. |
| ❑ पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ. सुमंत मुरंजन | १२० रु. |
| ❑ हिंदी साहित्यविचार । प्रा. प्यारेलाल गोहेल | २५ रु. |
| ❑ श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ | ६० रु. |
| ❑ संशोधन साधना । डॉ. वसंत स. जोशी | ६० रु. |
| ❑ तरंगयामिक व पुंजयामिक । मा. ग. टोळे | २० रु. |
| ❑ आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी | १५० रु. |
| ❑ वागीश्वरी । डॉ. गो. के. भट | ६० रु. |
| ❑ प्रस्थानभेद (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. वा. लेले | ५० रु. |
| ❑ गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे | ४० रु. |
| ❑ इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | १३० रु. |
| ❑ दासशूद्रांची गुलामगिरी (भाग २) । शरद पाटील | १५० रु. |
| ❑ शाहीर हैबती । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु. |
| ❑ गीताचिकित्सा । भाऊ धर्माधिकारी | १४० रु. |
| ❑ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु. |
| ❑ बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार । प. ल. वैद्य | ५० रु. |
| ❑ हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु. |
| ❑ पाच पुस्तक-परीक्षणे । वा. म. कुलकर्णी | ६० रु. |
| ❑ भेदविलोपन : एक आकलन । अशोक केळकर | ३० रु. |
| ❑ कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य । रा. भा. पाटणकर | १०० रु. |
| ❑ धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार । दि. के. बेडेकर | ३० रु. |
| ❑ आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार | १०० रु. |
| ❑ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार | १५० रु. |
| ❑ इहवाद आणि सर्वधर्मसमभाव । मे. पुं. रेगे | १२० रु. |
| ❑ प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा | २०० रु. |
| ❑ चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | १०० रु. |
| ❑ विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु. |
| ❑ नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन । द.ना. धनागरे | ४० रु. |
| ❑ प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु. |
| ❑ हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा (दुसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | २२५ रु. |
| ❑ पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास (दुसरी आवृत्ती) । प्रा. मे. पुं. रेगे | १६० रु. |

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही.पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता :* चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)

हे मासिक घ.वा. जोशी यांनी अक्षरसाहित्य, ३५, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.







अनुक्रमणिका